


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति-मंडळ पुरस्कृत )





वर्ष ४१ : अंक १६३

आक्टोबर-डिसेंबर : १९६७



संपादक :

के. नारायण काळे

महाराष्ट्र-साहित्य-परिषद : पुणे २

अनुक्रमणिका



महाराष्ट्रीय व्यापार व उद्योग यांच्या
उत्कर्षाबरोबरच महाराष्ट्र सारस्वताच्या
उत्कर्षात बँक सहभागी आहे व त्यासाठी
प्रयत्नशीलही आहे.



# दि
# बँक ऑफ महाराष्ट्र लिमिटेड

*आपली जिव्हाळ्याची बँक*

१९६ शाखांनिशी आपल्या सेवेस सदैव तत्पर.

सविस्तर माहितीसाठी आपल्या नजीकच्या शाखेला भेट द्या.

चिं. वि. जोग

*अध्यक्ष*

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ४१ अंक १६३ १९६७

☆

## या अंकात

☆



☆

## विभागीय संमेलनात संमत झालेले ठराव

**( १ ) दुखवटा** – १९६७ सालात निधन पावलेल्या पुढील व्यक्तींबद्दल दुखवटा व्यक्त करण्यात आला : दे. श्री. ऊर्फ नानासाहेब जोशी, गो. ब. पटवर्धन, ह. दा. वेलणकर, श्री. के. बेलवलकर, गो. म. जोशी, स. गो. बर्वे, रा. दा. देसाई, ना. म. भिडे, श. अ. गोपुजकर, अच्युत रानडे, विष्णुपंत पाळेकर ( अप्रबुद्ध ), बालगंधर्व, रामूभय्या दाते, द. भ. ऊर्फ आण्णासाहेब लोखंडे, शि. गो. भावे, अ. ह. गद्रे, वि. भा गोवंडे, अनंत खाजगीवाले, मो. रा. ढमढेरे.

**( २ ) लेखनविषयक नियमांबाबत** – मराठी साहित्य महामंडळाने १९६२ मध्ये घटकसंस्थांच्या सहकार्याने मराठीची लेखनविषयक नियमावली निश्चित केली. शासनाने व अनेक लेखकांनी व वृत्तपत्रांनी ती स्वीकारली. गेल्या पाच वर्षांच्या अवधीत त्या नियमानुसार लेखन करताना काही अडचणी व संदिग्धता अनुभवाला आली आहे. म्हणून या संमेलनाची महामंडळाला विनंती आहे की, याबाबत एक मार्गदर्शिका व लेखनदृष्ट्या संदिग्ध वाटणाऱ्या शब्दांचा कोश महामंडळाने लवकर तयार करावा.

मार्गदर्शिका व कोश तयार होईपर्यंत महामंडळाच्या नियमांबाबत, तसेच काही शब्दांबाबत कोणालाही ज्या अडचणी येतील त्यांचा विचार करण्यासाठी, शक्य तर त्यांचे निरसन करण्यासाठी, परिषदेने एक समिति नेमावी. या समितीने अडचणींबाबत वेळोवेळी महामंडळाला कळवीत जावे व समितीकडे येणाऱ्या प्रश्नांची महामंडळाच्या नियमांनुसार उत्तरे द्यावीत. या समितीच्या सूचनांचे स्वरूप तात्पुरत्या स्वरूपाचे राहील व लेखनाबाबत महामंडळाची मार्गदर्शिका व शब्दकोश ह्यांनाच सर्व घटकसंस्थांकडून प्रमाण मानले जाईल.

**सूचक :** दि. के बेडेकर,

अनुमोदक : स. शि. भावे

**( ३ ) माध्यमाबाबत**– महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांच्या अभ्यासक्रमातून पदवीपूर्व परीक्षेपासून पदव्युत्तर परीक्षांसह सर्व ज्ञानविज्ञान शाखांतून माध्यम म्हणून प्रादेशिक भाषांचा वापर शक्य तो त्वरित व्हावा.

**सूचक :** म. ना. अदवंत

अनुमोदक : चंद्रकुमार डांगे

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत]

वर्ष ४१ अंक १६३ १९६८

# संपादकीय

## भूकंप

ता. ११ डिसेंबर, १९६७ च्या ऐन पहाटेच्या वेळी, अखिल महाराष्ट्रातील आम जनता साखर झोपेत असताना तिला हादरून जागे करणारा धरणीकंपाचा धक्का बसला. तो जसा अकल्पित तसाच अद्भूतही होता. कारण अती प्राचीन काळी, ज्वालामुखीच्या स्फोटाने निर्माण झालेले हे दख्खनचे पठार भूकंपाच्या धोक्यापासून सर्वस्वी सुरक्षित आहे; अशी केवळ सर्व जनतेचीच नव्हे, तर तज्ज्ञ भूगर्भशास्त्रज्ञांचीही दृढ समजूत होती. यामुळे, त्या दिवशी आकस्मिकपणे बसलेल्या त्या धरणीकंपाच्या धक्क्याने, केवळ माणसांच्या शरीरांना आणि वसतिस्थानांनाच नव्हे; तर त्यांच्या धारणांना आणि विचारांनाही, त्याहूनही अधिक जबरदस्त धक्का दिला आहे. या धरणीकंपाने अपरिमित जीवित आणि वित्तहानी तर झालीच; पण त्याहूनही अधिक व्यापक आणि गूढ अशा अनेक समस्या आणि शंका, त्याने शास्त्रज्ञांपुढें उभ्या केल्या आहेत.

निसर्गाचे नियम समजावून घेऊन त्याच्या शक्तीवर प्रभाव गाजविण्याच्या, त्याचा आपल्या कामासाठी वापर करण्याच्या, मानवाच्या प्रयत्नांना व शोधांना निसर्गाने हे एक मोठे आव्हानच दिले आहे. परंतु त्यामुळे तो डगमगेल किंवा स्तिमित होईल अशी भीती नाही. " विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्यमानाः प्रारब्धमुत्तमजनाः न परित्यजन्ति, " या आपल्या गर्वोक्तीला अनुसरून, याही अद्भुत घटनेच्या कार्यकारणभावांचा छडा लावून, त्या ज्ञानाचा आपल्या भावी प्रगतीकरिता तो वापर केल्यावाचून राहाणार नाही; हे उघड आहे. अशी अनेक आव्हाने कित्येक शास्त्रीय शोधांची निमित्तकारणे झाली असल्याचा आजवरचा दाखला आहे; व त्याप्रमाणे या दुर्घटनेतूनही, तो काहीतरी शुभंकर आणि कल्याणप्रदच निर्माण करील; अशी शुभेच्छा कोणी व्यक्त केली, तर ते मानवाच्या चिरंजीव आशावादाशी सुसंगत आणि त्याला अनुसरूनच ठरेल.

हे सारे संभवनीय असले, तरी आज कोयनापरिसरातील केंद्रातून प्रसृत झालेल्या या धरणीकंपाने पश्चिम महाराष्ट्रावर सर्वत्र काळी छाया पसरवली आहे; आणि सातारा व रत्नागिरी जिल्ह्यातील काही तालुक्यांमधील रहिवाश्यांची अत्यंत दयनीय अवस्था झाली आहे, हे कठोर सत्य आहे. आधीच नापीक असलेल्या या प्रदेशातील अनेक गरीब कुटुंबे बेघर होऊन अन्नाला मोताद झाली आहेत. त्यांना आर्थिक साहाय्याइतकीच, सहानुभूतीची, धीराची, आश्वासनाची आवश्यकता आहे. सुदैवाने अशा प्रकारचे साहाय्य व सहानुभूती यांचा त्यांच्यावर चोहोबाजूंनी वर्षाव होत आहे; ही समाधानाची गोष्ट होय. या जिव्हाळ्याधाराने, त्यांना आपल्यावर ओढवलेल्या संकटाला तोंड देण्याला खास धीर आणि नैतिक बळ येईल.

अगदी काळ्याकुट्ट ढगालाही रुपेरी कडा असते, त्याप्रमाणे या भीषण अपघातातही दोन उल्लेखनीय विशेष प्रकाशात आले. एक, या अकल्पित संकटात सापडलेल्या माणसांकडून व्यक्त होणारे नीतिधैर्य; आणि दुसरा, अखिल भारताने संकटग्रस्तांबद्दल उत्स्फूर्तपणे प्रकट केलेला बंधुभाव आणि सौहार्द. भारतीय एकात्मतेच्या आणि शीलाच्या वास्तवत्वाविषयी संदेह निर्माण व्हावा अशी परिस्थिती देशात, वर वर सर्वत्र दिसत असता, अनाहूतपणे दिसलेले हे दृश्य, निःसंशय दिलासा देणारे आहे. आपल्या देशबांधवांच्या या सहृदय सहानुभूतीबद्दल कोयना परिसरांतील आपद्ग्रस्तांना निरंतर कृतज्ञता वाटेल.

या भूकंपाने बेघर झालेल्यांचे पुनर्वसन आणि त्यात ज्यांचे सर्वस्व नष्ट झाले आहे, त्यांना मिळणे आवश्यक असलेले आर्थिक साहाय्य; यांकरिता अमाप द्रव्याची गरज आहे. केंद्रीय शासन, राज्यशासने, उद्योगपती, व्यापारी, धनिक, देशातील व परदेशांतील धार्मिक आणि सार्वजनिक संस्था, स्वयंस्फूर्तीने या कार्याला हातभार लावण्यासाठी अहमहमिकेने पुढे सरसावताना दिसत आहेत; ही समा-

अनुक्रमणिका

धानाची गोष्ट होय. परंतु या कार्याकरिता केवढीही मोठी देणगी मिळाली तरी ती अधिक नाही; आणि कितीही लहान मिळाली तरी ती कमी अथवा उपेक्षणीय नाही; हे ध्यानात धरून, प्रत्येक व्यक्तीने त्याला आपापल्या कुवतीप्रमाणे होईल तो हातभार लावणे, हे तिचे कर्तव्य आहे. मराठी लेखक, कवी, नाटककार, प्रकाशक, पुस्तक विक्रेते, व वृत्तपत्र व्यवसायी, आपली या संबंधातली जबाबदारी जाणून भूकंपग्रस्तांना यथाशक्ती, अधिकात अधिक मदत करण्यास पुढे सरसावतील, असा विश्वास वाटतो.

### विज्ञान परिषदेचे दुसरे संमेलन—

ता. २–३–४ डिसेंबर १९६७ रोजी पुणे येथे भरलेले, मराठी विज्ञानपरिषदेचे दुसरे संमेलन अनेक दृष्टींनी संस्मरणीय ठरेल.

मराठी विज्ञानपरिषदेची स्थापना मुंबई येथे ता. २४ एप्रिल १९६६ या दिवशी झाली; आणि डिसेंबर १९६६ साली, तिच्यामार्फत, मुंबईत पहिले विज्ञानसंमेलन भरविण्यात आले. मराठीतून संघटितपणे विज्ञानप्रसार करता यावा; सर्व नागरिकांना विज्ञानाची माहिती व्हावी; आवड निर्माण व्हावी; व समाज चिकित्सक व्हावा; ही या परिषदेची उद्दिष्टे आहेत. आणि अशाप्रकारचे कार्य करण्यासाठी संमेलनाची योजना करणे, हे तिच्या त्या कार्यातील एक महत्त्वाचे अंग आहे.

आंतरराष्ट्रीय ख्यातीचे स्त्री-रोग तज्ज्ञ, पद्मभूषण डॉ. वि. ना. शिरोडकर, हे या पुणे येथे झालेल्या दुसऱ्या विज्ञानसंमेलनाचे अध्यक्ष होते. वेगवेगळ्या शास्त्रीय आणि तांत्रिक क्षेत्रात संस्मरणीय कार्य केलेल्या, डॉ. व. रा. खानोलकर, डॉ. श्री. स. जोशी, प्रा. ना. म. आठवले, व श्री. शं. रा. दाते, या चार शास्त्र-तंत्र-विशारदांचा परिषदेच्या वतीने त्यात गौरव करण्यात आला. संमेलनातील निबंधवाचन, परिसंवाद, व्याख्यान, इत्यादी सर्वच कार्यक्रम मुद्देसूद, नेटके, आणि सर्वसाधारण जिज्ञासूलाही आकर्षक व उद्बोधक वाटावे असे झाले; हे नमूद करणे अगत्याचे आहे.

विज्ञानसंमेलनाच्या या उद्घाटनाकरिता, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची योजना करण्यात आली यातील अभिप्राय लक्षणीय आहे. त्या योजकतेबद्दल परिषदेच्या कार्यकर्त्यांना धन्यवाद. ज्ञान आणि विज्ञान यांचा संगम आणि समवाय साधण्याचा हा उपक्रम सफल, तसाच सुफलही ठरो, ही इच्छा.

वैज्ञानिक उपयुक्तता आणि सफलता या दृष्टींनी या संमेलनाचे समालोचन करणे किंवा त्याचा आढावा घेणे, हा अधिकार त्या क्षेत्रांतील तज्ज्ञांचा आहे. साहित्यिकांचा तो विषय नव्हे. परंतु पुणे विद्यापीठाचे कुलगुरु, डॉ. ह. वि. पाटसकर यांनी म्हटल्याप्रमाणे, “ मराठी ही देशातील एक प्रमुख भाषा आहे. विज्ञानाच्या प्रगतीच्या दृष्टीनेही ती समृद्ध करणे जरूर आहे. आज जरी विज्ञानाचे शिक्षण इंग्रजी भाषेचेद्वारे देण्याची काही प्रमाणात जरूर असली तरी अधिक सुलभ रीतीने व जलद गतीने विज्ञानाचा प्रसार व्हावा म्हणून मराठी भाषेचे माध्यमातून त्या बाबतीचे शिक्षण देण्याची नितांत आवश्यकता आहे. ” ही वस्तुस्थिती असल्याकारणाने, वैज्ञानिकांप्रमाणेच साहित्यिकांनाही प्रस्तुतसारख्या उपक्रमाबद्दल आपुलकी व जिव्हाळा वाटावा हे अस्वाभाविक नाही. साहित्यिक व वैज्ञानिक, साहित्यपरिषद व विज्ञानपरिषद, यांची कार्यक्षेत्रे विशेषत्वाने वेगळी असली, तरी सामान्यतः ती हळूहळू एकमेकांशी इतकी संलग्न व परस्परसापेक्ष होऊ लागली आहेत की, त्यातील परस्परसंबंधांचे संशोधन हाही एक परिशीलनाचा विषय होत आहे. अशा स्थितीत एकमेकांच्या क्षेत्रांबद्दल परस्परांना निदान स्थूल परिचय तरी असणे, नुसते उपयुक्तच नव्हे तर अगत्याचेही आहे यांत दुमत असू शकत नाही.

भौतिक शास्त्राप्रमाणेच साहित्य आणि सामाजिकशास्त्रे याचा मूलाधार दार्शनिकदृष्टी हाच असल्याकारणाने त्यांना परस्पर साधारण अशी पुष्कळशी भूमिका आहे; व त्या अनिष्ठानावरून ,दोघांनीही संकलित केलेल्या विचारधनाचा विनिमय करण्याची कांही सोय, संधी आणि साधने अस्तित्वात आणता आली; तर ती दोघांनाही सारखीच उपकारक ठरण्याचा संभव आहे. परस्परांशी संघटित, संपर्क नसल्यामुळे आतापर्यंत त्यांचा योग्य व पुरेसा परस्पर-परिचय झालेला नाही व त्यामुळे एकमेकांच्या कार्याचा एकमेकांना व्हावा तसा उपयोग व फायदाही करता घेता आलेला नाही. उदाहरणार्थ महाराष्ट्र साहित्य परिषदेने वेगवेगळ्या भौतिक शास्त्राकरिता परिभाषा तयार करण्याचा उपक्रम गेली कित्येक वर्षे परिश्रमपूर्वक चालविला आहे. परंतु आतापर्यंत प्रस्तुत वैज्ञानिक परिषदेसारखी संघटना अस्तित्वात नसल्याकारणाने, त्या कार्यात सहभागी असलेल्या काही वैज्ञानिकाखेरीज इतरांना, त्या कार्याच्या स्वरूपाची माहिती असल्याची, किंवा त्याच्या उपयुक्ततेची त्यांनी दखल

घेतल्याची साक्ष फारशी दिसत नाही. त्याचप्रमाणे, उलट-पक्षी आज चाळीस वर्षे सृष्टिज्ञान मासिक पुण्यात प्रसिद्ध होत आहे; पण किती साहित्यिकांच्या वाचनात ते येत असेल हे हमखास सांगता येणे कठीण आहे.

असाच हाताजवळचाच आणखी दाखला घ्यावयाचा झाला तर माझा स्वतःचाच एक अनुभव सांगता येईल. आजकाल, कला आणि साहित्यविषयक चर्चेत 'आकार' हा शब्द पारिभाषिक संज्ञेच्या स्वरूपात वापरात येत असतो. परंतु बहुतेक वेळा, हा वापर इतका मोघम आणि संदिग्ध असतो की, त्याला दार्शनिक निश्चितता आहे असा दावा करता येणे प्रायः अशक्य असते. या संज्ञेला दार्शनिक निश्चितता आणि प्रतिष्ठा प्राप्त व्हावयाची असेल, तर तो वापर त्या पद्धतीने झाला पाहिजे, हे उघड आहे. आकार ( Form ) हा शब्द भौतिक शास्त्रातही वापरला जातो. तेथील त्याचा वापर व त्याने व्यक्त होणारा अर्थ या विषयीचे ज्ञान व माहिती साहित्यिकांना मिळाली, तर या संबंधांतील त्यांच्या कल्पनांना नेमकेपणा आणि नेटकेपणा येईल, अशी माझी समजूत आहे, व तिला अनुसरून, साहित्य परिषदेच्यावतीने, 'आकाराचे तर्कशास्त्र' (Logic of Form) या विषयावर वेगवेगळ्या भौतिक शास्त्रज्ञांकरवी एक व्याख्यानमाला घडवून आणावी; अशी माझी कल्पना होती. त्या दृष्टीने दीड दोन वर्षांमागे मी प्रयत्नही केला होता. परंतु वरील कारणानुळेच तेव्हा तो असफल ठरला. परंतु आता विज्ञान परिषद अस्तित्वात आलेली असल्यामुळे तिच्या किंवा साहित्यपरिषदेच्या द्वारा अशी व्याख्यानमाला घडवून आणणे तितकेसे कठीण पडणार नाही, असे वाटते.

पण ही उदाहरणे तपशिलाच्या बाबींची झाली. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी आपल्या उद्घाटनाच्या भाषणात या संबंधात अधिक मौलिक चिकित्सा केली आहे. ते म्हणतात :

"...ज्ञान हे मानवी जीवनाचे अनन्यसाधारण असे साधन आहे. निसर्गशक्तीचा जीवनार्थ वाढता उपयोग केल्यामुळेच मानव्य विकसित होत आहे.—विज्ञानाचे केवळ साधनमूल्य पटल्याने विज्ञानाची वाढ होते यात शंका नाही. पण या उपयुक्ततावादी दृष्टिकोणाने विज्ञानाच्या वाढीला बंधनही पडते. कारण ज्या संशोधनाचा व संशोधनातून निर्माण होणाऱ्या ज्ञानाचा जीवनसाधनेला प्रत्यक्ष उपयोग होत नसतो, त्या साधनेची माणूस उपेक्षा करतो व त्यामुळे एकंदरीत विज्ञानाची वाढ होण्यास पायबंद पडतो. याकरिता ज्ञानाचे सौन्दर्यमूल्य संस्कृतीत स्थिरावे लागते. ज्ञानाकरिता ज्ञान अशी धारणा ज्या संस्कृतीत मुरते तीच संस्कृती विशाल विज्ञानाचा पाया रचते. ग्रीक संस्कृतीने ज्ञानाकरिता ज्ञान होय, अशा ज्ञानाच्या स्वयंमूल्याची स्थापना केली, व ज्ञानाचे सौंदर्य ओळखले, म्हणून मध्य-युगाच्या शेवटी विज्ञानाच्या आराधनेचे पुनरुज्जीवन झाले...."

या प्रकारच्या व्यापक भूमिकेवरून, सामवायिक दृष्टि-कोणाने, साहित्य व विज्ञान यांचा संवाद व सहकार्य साधण्याचा प्रयत्न साहित्य व विज्ञान परिषदांकडून झाला, तर तो उभयतांनाही निःसंशय हितावह व प्रगतिकारक ठरेल.

## कै. बाबुराव पेंढारकर

उणी पुरी चाळीस वर्षे अनेक भूमिका गाजवून, शेवटी ता. ९ नोव्हेंबर १९६७ रोजी, बाबुराव पेंढारकर आपल्या असंख्य प्रेक्षकांचा, चहात्यांचा, स्नेह्यांचा, आणि कुटुंबियांचा, अखेरचा निरोप घेऊन कायमचे काळाच्या पड्याआड गेले....

चित्रपट आणि रंगभूमी ही बाबुरावांची खास कार्यक्षेत्रे. व्यवस्थापक म्हणून चित्रपट व्यवसायाच्या क्षेत्रात ते प्रथम चमकले. पण त्या व्यवसायात त्यांनी अढळ पद मिळविले ते नट या नात्याने. खलपुरुष ही त्यांची हातखंडा भूमिका. तत्कालिन प्रचलित खलपुरुषाच्या अवतारापेक्षा त्यांचा खलपुरुष प्रेक्षकांना एकदम वेगळा वाटला. यामुळे त्याने त्यांची अंतःकरणे काबीज केली. त्यांचा खलपुरुष माणूस होता : हाडामांसाचा, जिवंत व्यवहारी माणूस. आत्यंतिक ऊनोक्तीने, कमीत कमी अंगविक्षेपांनी व मोजक्या आविर्भावाने आपला आशय व्यक्त करणारा, किंबहुना करूनही अव्यक्त राखणारा, दुखावलेला, आतल्या गाठीचा, बुद्धिमान, कर्तबगार तिरकस स्वभावाचा माणूस. खलपुरुषाचा असा नमूना बाबुरावांनी आपल्या अभिनयाने निर्माण केला. प्रेक्षकांच्या अभिरुचीत ठसविला. मराठी चित्रपट सृष्टीत त्यांनी मिळविलेल्या या यशाला तोड नाही. रंगभूमीवरील त्यांच्या भूमिकाही उल्लेखनीय झाल्या; पण त्यांच्या गौरवातील बराच भाग चित्रपट-सृष्टीतील त्यांच्या कीर्तीच्या प्रभावलयातून परावर्तित झालेला होता.

चित्रपट हेच त्यांचे खरेखुरे कार्यक्षेत्र. त्यांच्या चित्रपट व नाट्यप्रयोग यांमधील भूमिकांनी त्यांना लोकप्रियता मिळवून दिली; पण त्यांच्या कामगिरीची खरी थोरवी आहे, ती त्यांनी चित्रपटाला साहित्याच्या सहकार्याची जोड मिळवून दिली यात; त्यांच्या त्या मार्मिकतेत— सहृदयतेत–रसिकतेत.

मराठी चित्रपटाला अखिल भारतीय प्रतिष्ठा मिळवून देणाऱ्या अग्रगण्य मराठी चित्रपट निर्मात्यांत बाबूरावांना स्थान आहे. दादासाहेब फाळक्यांनी भारतीय चित्रपट व्यवसायाचा पाया घातला. बाबूराव पेंटरांनी चित्रपटाला कलाकृतीची पदवी प्राप्त करून दिली; व्ही. शांतारामांनी त्याचा मान आणि त्याची शान वाढविली; तर बाबुराव पेंढारकरांनी त्याला सजीव आणि स्वाभाविक करण्याचे श्रेय मिळविले.

बाबुराव अत्यंत मितभाषी होते; आणि ऐकण्यासारखे दुसऱ्याचे बोलणे ते सावधान चित्ताने ऐकत असत. प्रत्येक तपशिलाबद्दल अंतर्मुख दृष्टीने चिंतन करण्याची सवय त्यांनी स्वतःला लावून घेतली होती. ते थोडे बोलले, तरी बोलत तेव्हा मुद्याचे, नेमके असेल तेच आणि तेवढेच बोलत. यामुळे ते फार व्यवहारचतुर, धूर्त, किंबहुना कावेबाज आणि आतल्या गाठीचे असावेत, असे अनेकांना वाटे. परंतु तो भ्रम होता. कोणत्याही खऱ्या कलावंताप्रमाणे ते सरळ मनाचे, भावुक, आणि भाबडेपणाने दुसऱ्यावर विश्वास ठेवणारे होते. त्यांच्या निकट परिचयात आलेला कोणीही लहान मोठा माणूस याबद्दलची ग्वाही देईल. भारतीय संस्कृती व मराठी बाणा यांचा त्यांना फार अभिमान असे. त्यांच्या चित्रपटांच्या विषयांत आणि मांडणीत याची साक्ष मिळते.

बाबुरावांचे आयुष्य हे कृतार्थ जीवनाचे एक उदाहरण आहे. त्यांनी सर्व ऐंद्रिय सुखोपभोगांचा कलावंताच्या कलंदर वृत्तीने अवीट अनुभव घेतला; आणि जीवनातील अपयश आणि पराभवही, वृत्तीत कडवटपणा न येऊ देता अलिप्तपणे पचविले; आपला रुबाब न सोडता, न बिघडू देता.

स्नेहशीलता हा त्यांच्या स्वभावाचा स्थायीभाव होता. श्रद्धा आणि निष्ठा हे त्यांचे प्रकृतिधर्म होते. प्रामाणिक परिश्रम ही त्यांची सहज वृत्ती होती. दिग्दर्शक आणि बरोबर भूमिका करणारा नट, या दोन्ही नात्यांनी माझा त्यांच्याशी निकटचा संबंध आला. त्यांच्याबरोबर दीर्घकालिन सहवास घडला. या निमित्ताने, कर्तव्यतत्परता, परिश्रमशीलता, श्रद्धा आणि खिलाडूवृत्ती, या त्यांच्या गुणांचा जो अनुभव आला तो अविस्मरणीय आहे.

कवि गोविंदांनी उल्लेखिलेल्या, ' मरणाने जगणाऱ्या ', समर्थांनी सांगितलेल्या, ' कीर्तिरूपाने उरणाऱ्या ', महा भागांत बाबुरावांचा अंतर्भाव होतो. त्यांचे असंख्य चहाते स्नेही, आणि भक्त आज महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही अनेक ठिकाणी, विखुरले आहेत. त्यांच्या मनात बाबूरावांचे त्यांच्या थोरवीला साजेल असे भव्य स्मारक व्हावे अशी इच्छा येत असणे स्वाभाविक आहे. या स्मारकाचे स्वरूप काय असावे याबद्दलची काही भवती न भवतीही चालू आहे, असे कळते. त्या विचार मंथनातून काय निष्पन्न होईल याची कल्पना नाही. परंतु चित्रपटाचा व्यवसाय आणि कला, व रंगभूमी आणि अभिनय यांविषयी बाबूरावांची जी व्यापक दृष्टी व मूलगामी निष्ठा होती, त्याची कांही तरी साक्ष मिळेल असे त्याचे प्रत्ययकारी स्वरूप राहील, अशी आशा आहे.

—के. नारायण काळे

# प्रादेशिक भाषा : शिक्षणाचे माध्यम

◆ मु. ग. पानसे ◆

भारताला स्वातंत्र्य मिळाले नसते तर सध्या ज्या प्रमाणावर शिक्षणाच्या माध्यमाविषयी ऊहापोह चालू आहे इतका विचार करण्याची संधी कदाचित अजूनही आपल्याला लाभली नसती. स्वतंत्र भारताने लोकशाही राज्यपद्धती स्वीकारली तेव्हाच लोकमताच्या अंतिम निर्णायकशक्तीला मान्यता दिली. लोकमत प्रचाराने प्रभावी बनवता येते. राजकीय पक्ष ते कार्य करीत असतात. पण लोकमत खरे ठोलस बनायचे असेल तर प्रत्येक व्यक्तीला स्वतंत्रपणे सारासार विचार करता येऊन आपले स्वतःचे मत असणे आणि ते निःसंकोचपणे व्यक्त करावेसे वाटणे याला महत्त्व आहे. विचाराला जसे अनुभवाने वजन येते तशी त्याला ज्ञानाने दिशा लागते. म्हणून लोकशाहीमध्ये लोकशिक्षणावर भर असणे स्वाभाविक आहे. ज्ञान ही एखाद्या दुसऱ्या वर्गाची मक्तेदारी नाही. ते सर्वांच्या मालकीचे धन असल्याने त्याचा समाजातल्या सर्व व्यक्तींना आपल्या कुवतीप्रमाणे उपयोग झाला पाहिजे. याची तीव्र जाणीव झाल्यामुळे मागासलेल्या जातीजमातींना अनेक सवलती देऊन शिक्षणाचा झपाट्याने प्रसार करण्याची मोहीम निघाली. खेडोपाडी कित्येक शाळा निघाल्या. जिल्हानिहायच नव्हे तर तालुक्याच्या ठिकाणीही अनेक महाविद्यालये सुरू झाली आणि मराठीचे महत्त्व पटविणारी चार विद्यापीठे महाराष्ट्रात वाढीला लागली.

## इंग्रजांची छाप

पूर्वीच्या इंग्रज राज्यकर्त्यांनी भारतामधल्या निरनिराळ्या भाषिक प्रदेशांमध्ये शिक्षणाचे माध्यम इंग्रजीच ठेवले हे त्यांच्या दृष्टीने रास्त होते. त्यांना आपल्या शासनात एकसूत्रीपणा राखायचा होता. शासनयंत्रणेच्या वेगवेगळ्या विभागांतल्या सर्व पातळ्यांवर आवश्यक ते माणूसबळ वाढवणे त्यांना क्रमप्राप्त होते. इंग्रजांचे राजकीय वर्चस्व आणि त्यांची शिक्षणपद्धती यांच्या योगाने त्यांच्या आचारविचारांची आपल्यावर फार मोठी छाप पडली आहे. अर्थात त्या शिस्तबद्ध शासनयंत्रणेची कार्यपद्धती समजल्यामुळे, आणि इंग्रजी भाषेतल्या ज्ञानभांडाराची कवाडे खुली झाल्याकारणाने आपण इतकी प्रगती साधू शकलो हे आपल्याला नाकारता येणार नाही. हे खरे असले तरी इंग्रजी विचारसरणीतून सर्व गोष्टी पाहण्याची सवय जडल्याने कालांतराने राजकीय स्वातंत्र्याप्रमाणेच आपण आपले वैचारिक स्वातंत्र्य गमावून बसलो आहोत. भारताला राजकीय स्वातंत्र्य मिळाले तेव्हा इंग्रजांची सत्ता नाहीशी झाली. इंग्रज येथून गेले तरी त्यांच्या विचारसरणीची दाट छाया आज वीस वर्षांनंतरही अजून मागे रेंगाळते आहे. त्याचे कारण असे की इंग्रजांनी घालून दिलेली शिक्षणपद्धती, अभ्यासक्रम, परीक्षापद्धती किंवा शिक्षणाचे माध्यम यांपैकी कशातही आपली गरज ओळखून जरूर तो बदल आपण केलेला नाही.

तसा बदल करायचे कोणाला सुचलेच नाही असा याचा अर्थ नव्हे. परावलंबित्वाच्या प्रखर जाणिवेतून राष्ट्रीय शिक्षण देणारे टिळक महाराष्ट्र विद्यापीठ इंग्रजी अमदानीत निघाले. या संस्थेने स्वातंत्र्य, देशाभिमान, राष्ट्रीयत्व या वृत्ती पोसण्याचे धोरण ठेवून शिक्षणाचे फार मोठे कार्य महाराष्ट्रात केले. काही लोकांच्या मनावर हे संस्कार घडवले. पण प्रतिकूल परिस्थितीपुढे तिला टिकाव धरणे शक्य नव्हते.

## समाज आणि भाषा

राजकीय सत्तेचा, सांस्कृतिक उलनवारीचा तसाच समाजात चालू असलेल्या विचारमंथनाचा भाषेवर परिणाम होत राहतो. या दृष्टीने स्वातंत्र्यपूर्वकाळात एका बाजूला इंग्रजांच्या प्रभावामुळे सामान्यपणे शिक्षित वर्गात उतरलेली पाश्चात्त्य राहणी व विचारसरणी आणि दुसऱ्या बाजूला वेगवेगळ्या प्रदेशांमधल्या पुढाऱ्यांनी मांडलेले राष्ट्रीयतेचे विचार व केलेल्या चळवळी या दोन प्रवृत्ती लक्षात घेण्यासारख्या आहेत. भाषा ही एक सामाजिक संस्था आहे. माणसाच्या विचारविनिमयाचे साधन अशी तिची व्याख्या केली जाते पण ही व्याख्या नुसती अपुरीच नाही तर दिशाभूल करणारी आहे. वस्तुतः भाषा ही एक सामाजिक प्रक्रिया आहे. माणूस बोलतो, ते केवळ आपल्या भावना व्यक्त करण्याकरता किंवा आपले मत सांगण्याकरताच

बोलतो असे नव्हे. तर ज्याच्याशी तो बोलतो त्याच्याकडून आपल्याला दाद मिळावी अशी त्याची अपेक्षा असते. आपल्या मताप्रमाणे दुसऱ्याच्या विचाराला आणि आचाराला वळण लावावे, त्याच्यात बदल घडवून आणावा हाही हेतू त्या मागे असतो. तसे नसते तर ' शिकवणे ' या क्रियापदाला अर्थच उरणार नाही. 'विचारप्रणाली', 'मतप्रसार' ' अनुयायी ', 'पक्ष', ' संप्रदाय ' असे कितीतरी शब्द व त्यांच्या मागच्या कल्पना अगदी निरर्थक ठरतील. म्हणून भाषा हे खरोखर समाजाच्या धारणेचे आणि विकासाचे एक साधन आहे. विचारविनिमय हा त्यातला एक भाग आहे.

### इंग्रजी माध्यमाची मर्यादा

आपला दैनंदिन व्यवहार आपण ज्या भाषेत करतो किंवा ज्या भाषेत आपण नेहमी मनात विचार करीत असतो तीच भाषा शिक्षणाचे माध्यम बनली म्हणजे जीवन आणि शिक्षण यांच्यांत अंतर पडणार नाही किंवा त्यांची फारकतही होणार नाही. म्हणून आपल्या जीवनाशी एकरूप असलेली मातृभाषा हे ज्ञानदानाचे माध्यम असावे असे शिक्षणशास्त्रातले एक महत्त्वाचे तत्त्व आहे. मातृभाषेतून कोणताही विषय सहज समजतो तसेच तो समजावून सांगणेही सोपे जाते. मात्र आत्माविष्काराचे हे हत्यार सतत वापरात राहिले पाहिजे. तसेच वेळच्या वेळी ते परजलेही पाहिजे.

बहुसंख्य विद्यार्थ्यांची मातृभाषा व प्रादेशिक भाषा एक असल्याने प्रादेशिक भाषा बहुतेक शिक्षणाचे माध्यम व्हावी हे उचित. सर्व व्यवहार प्रादेशिक भाषेत सुरळीत चालेल. काही विशेष हेतूशिवाय इंग्रजी भाषेची गरज सामान्यपणे लागणार नाही. ज्ञानसंवर्धन, उच्च संशोधन किंवा कारणपरत्वे देशाटन करू इच्छिणाऱ्या काही लोकांना इंग्रजी भाषा अवगत असणे अत्यावश्यक आहे. पण अशा लोकांची संख्या एकंदरीत कमी असणार. ही संख्या पुष्कळ वाढणे इष्ट असले तरी प्रत्यक्ष व्यवहार पाहून धोरण आखले पाहिजे. म्हणून अशा थोड्या लोकांसाठी इंग्रजी शिकण्याचा बोजा सर्वांवर पडण्याचे कारण नाही. बहुसंख्य जनतेला व्यवसायात किंवा रोजच्या व्यवहारात इंग्रजीची जरूर भासणार नाही. शिवाय मातृभाषा जशी सहज अंगवळणी पडते त्यामानाने परकी भाषा शिकणे हे कृत्रिम आणि कष्टाचे असते. शिकणाराच्या कुवतीप्रमाणे त्याला होणारा त्रास कमीजास्त प्रमाणात जाणवतो. आज मराठीत शिकून विद्यापीठामध्ये येणाऱ्या बहुतेक विद्यार्थ्यांना इंग्रजीची मोठी अडचण वाटते ही वस्तुस्थिती आहे. शाळेतली शिकवण्याची पद्धत, तसाच मर्यादित अभ्यासक्रम आणि महाविद्यालयात कानावर पडणारे व्याख्यानांचे स्रोत व अध्ययन विषयांची विस्तारलेली कक्षा यांच्यांत बरेच अंतर पडते. हा पहिल्या स्वतंत्र सरकारने केलेल्या प्रयोगाचा परिणाम असला तरी अशा स्थितीत विद्यापीठामधल्या शिक्षणाचे माध्यम म्हणून इंग्रजी लादले, तर प्रगती साधण्याऐवजी विद्यार्थ्यांचे नुकसान होण्याचीच शक्यता जास्त.

इंग्रजीमधून चालू असलेले अध्यापन एकदम मराठीतून सुरू करणे विद्यार्थ्यांच्या दृष्टीने हिताचे असले तरी अध्यापकांना ते सोईचे नाही. विषयाची परिभाषा तोंडी रुळण्यास काही वेळ लागेल हे तर खरेच; परंतु आतापर्यंत इंग्रजीतून शिकविण्याची सवय असल्याकारणाने आपल्या विषयाचे विवेचन ओघवती मराठी भाषेत करण्याइतका आत्मविश्वास प्रत्येक शिक्षकाला असेलच असे नाही अध्यापकांनासुद्धा मराठीतून विषय समजावून देण्याचा सराव करावा लागेल. सुरुवातीला आठवड्याच्या अभ्यासक्रमापैकी जो विषय पाच व्याख्यानांत इंग्रजीमधून विशद केलेला असेल तोच एका व्याख्यानांत मराठीत सांगावा. हळूहळू इंग्रजी व्याख्यानांची संख्या कमी करून मराठीची संख्या वाढवावी. म्हणजे विषय समजावून देण्यात उणीव राहिली म्हणून विद्यार्थ्यांचे नुकसान होण्याची शक्यता कमी होईल. अध्यापकांच्याही मराठी बोलणे अंगवळणी पडेल. इंग्रजी-मराठी व्याख्यानांचे प्रमाण १:१ झाल्यानंतर महिन्याभरात पूर्णपणे मराठीत शिकविणे सोपे होईल. रूळ बदलण्याचा हा मधला काळ शक्यतो कमी व्हावा म्हणून अध्यापकांनी कसोशीने प्रयत्न केला पाहिजे.

### इंग्रजीची गरज

माध्यम म्हणून इंग्रजी नको याचा अर्थ इंग्रजी शिकवणेच बंद करावे असा नाही. उलट ते बंद करून चालणार नाही. इंग्रज राजवटीतली नोकरशाही वृत्ती आणि इंग्रजांचा सार्वत्रिक अंमल यांचा उबग आलेले काही लोक इंग्रजांचे समूळ उच्चाटन करण्याचा पवित्रा घेतात पण तो चुकीचा आहे. ते आपल्याच पायावर धोंडा पाडून घेण्यासारखे आहे. शिक्षणाचे किंवा व्यवहारातले माध्यम म्हणून वापरली जाणारी इंग्रजी भाषा आणि इंग्रजी भाषेतले ज्ञानभांडार, यांची पुष्कळ वेळा गफलत केलेली आढळते. कोणत्याही ज्ञानशाखेतले आधुनिक विचारप्रवाह समजण्याकरता

आणि आंतरराष्ट्रीय संपर्क साधण्याच्या कामी इंग्रजी भाषेसारखे उत्तम साधन अनायासे आपल्या हाती आहे, ते हातचे गमावता कामा नये. शास्त्रीय संशोधनाकरता आज रशियन भाषासुद्धा शिकण्याची आवश्यकता सर्वांना जाणवू लागली आहे तसेच आंतरराष्ट्रीय संपर्काच्या दृष्टीने स्पॅनिश आणि फ्रेंच या भाषा फार महत्त्वाच्या आहेत. परंतु जगात आंतरराष्ट्रीय पातळीवर सर्वत्र उपयोगी पडणारी इंग्रजी भाषा त्या पातळीवरच्या कोणत्याही क्षेत्रात कार्य करू इच्छिणाऱ्या व्यक्तीला उत्तम आल्याशिवाय गत्यंतर नाही. पूर्वी इंग्रजीतून शिकण्याची जी सर्वांनाच सक्ती होती तिचे आता कारण उरले नाही इतकेच. उलट वेगवेगळ्या विषयांचे अभ्यासक्रम आखून त्याप्रमाणे इंग्रजीत विशेष प्रावीण्य संपादन करण्यासाठी स्वतंत्र संस्था निघणेदेखील जरूर आहे.

भौतिक शास्त्रांच्या क्षेत्रातली इंग्रजीची महती ओळखून ती भाषा महत्त्वाचा विषय म्हणून विद्यापीठांमध्ये शिकविली जावी अशी संसदीय समितीने शिफारस केलेली आहे. अर्थात सर्व विद्यापीठांमध्ये इंग्रजी शिकविली गेली तरी भारतातल्या बहुतेक प्रदेशांमध्ये ती राजभाषा या नात्याने फारशी टिकणार नाही. आणि म्हणून कालांतराने तेथे ती शिक्षणाचे माध्यम म्हणून नांदू शकणार नाही. विद्यापीठाच्या शिक्षणक्रमात एक वेळ भौतिक शास्त्रांच्या अध्यापनात इंग्रजी माध्यम सध्या सोईचे वाटेल; पण समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, तत्त्वज्ञान वगैरे ज्या विषयांचा विचारप्रणालीवर भर असतो त्या विषयांचे अध्यापन प्रादेशिक भाषेत झाले तर केव्हाही ज़ास्त उपकारक ठरेल.

### भाषेचा अभ्यास

अभ्यासक्रमातील भाषा या विषयाची खुद्द दोन अंगे आहेत. सामान्यतः भाषा म्हणून जे सुपरिचित आहे ते भाषेतले वाङ्मय आणि दुसरे म्हणजे भाषेच्या घडणीचे शास्त्र–भाषाशास्त्र. विद्यापीठाच्या पातळीवर वाङ्मयाच्या अध्यापनात माध्यमाची आडकाठी येणार नाही. कारण मराठी, हिंदी, इंग्रजी, गुजराती इत्यादी भाषांची ओळख, प्राथमिक व्याकरण वगैरे शालान्त परीक्षेपर्यंत चांगली झालेली असते. शिकवायचे ते त्या त्या भाषेतले वाङ्मय. त्याला अन्य भाषामाध्यमाची गरज नसते. साहित्यशास्त्रास लागणारी परिभाषा संस्कृतमध्ये उपलब्ध आहे. तिचा वापरही सढळपणे होतो. आधुनिक वाङ्मय समीक्षेत पाश्चात्त्य विचारांचा प्रादुर्भाव असला तरी इंग्रजी परिभाषेवरून बनविलेले अस्तित्ववाद, अतिवास्तववाद, यासारखे चटकन लक्षात येणारे शब्द फारसे सायास न पडता आपल्या अंगवळणी पडतात. अगदी अलीकडे वाक्संप्रदाय, वाक्यरचना, विशिष्ट शब्द यांचा नेमका आशय समजण्याकरता इंग्रजीसारखी भाषा भाषाशास्त्रीय अंगाने शिकविण्याचा प्रयोग पुणे विद्यापीठात सुरू झाला आहे. याला खऱ्या अर्थाने भाषेचा अभ्यास म्हणता येईल.

भाषाशास्त्राच्या अध्यापनाचे माध्यम मात्र आज इंग्रजी आहे. शास्त्राची सर्व परिभाषा इंग्रजीत आयतीच तयार असते. ती अध्यापनाला फार सोईस्कर. सन १९५१ च्या सुमाराला भारतामध्ये वर्णनात्मक भाषाशास्त्राचे युग सुरू झाले आहे. पूर्वीच्या ऐतिहासिक, तौलनिक शास्त्रपद्धती पार बदलून गेल्या आहेत. एका वर्णाचा किंवा ध्वनीचा निर्देश एखाद्या सुटसुटीत संज्ञेने करणे आज अपूर्ण ठरते. प्रत्येक बारीकसारीक घटकाचे सूक्ष्म वर्णन करावे लागते. मग ते उच्चारणाच्या दृष्टीने असेल किंवा श्रवणाच्या बाजूने असेल. जी गोष्ट ध्वनीची तीच शब्दाची, तीच वाक्याची. शब्दाचे मूळ रूप, त्याला लागणारा प्रत्यय, तो प्रत्यय लागताना होणारे विकार यांचे सूक्ष्म आणि संपूर्ण वर्णन अपेक्षित आहे. यातल्या अंगोपांगांच्या वर्गीकरणाप्रीत्यर्थ निर्माण झालेली परिभाषा प्रयोगक्षम आहे म्हणून तिच्यात वरचेवर सारखे बदल होत असतात. या शास्त्रातल्या पूर्वीचा अभ्यास असणाऱ्या पंडितांना देखील ही परिभाषा काळजीपूर्वक वापरावी लागते भाषाविश्लेषणाच्या पद्धतीही पूर्वीच्या राहिल्या नाहीत. पूर्वी समाजातील ‘ प्रमाण ’ अशा ग्रांथिक भाषेची व्याकरणे तयार होत. पण आता एखाद्या वयोवृद्ध अशिक्षित मनुष्याच्या बोलण्यावरून त्याच्या बोलीचे व्याकरण रचले जाते. आधुनिक भाषाशास्त्राचा भर उच्चारणातील घटकांवर आहे. त्यामुळे उच्चारावरहुकूम ध्वनी लिपिबद्ध होण्याला फार महत्त्व दिले जाते. या कामी वापरली जाणारी लिपी रोमन लिपीच्या परिष्करणातून तयार झाली असून तिला या शास्त्रापुरती तरी आंतरराष्ट्रीय मान्यता मिळाली आहे. त्यामुळे जगातल्या कोणत्याही भाषेची उच्चारणपद्धती नेमकी समजते. भाषाशास्त्रीय संशोधनात हीच लिपी वापरणे श्रेयस्कर. भाषाशास्त्राचा अभ्यास अतिशय तांत्रिक स्वरूपाचा व क्लिष्ट असल्याने फारसे विद्यार्थी त्या वाटेला जात नाहीत. अगदी थोड्या विद्यार्थ्यांकरता माध्यम

बदलावे का ? हा प्रश्न पडण्यासारखा आहे. पण तत्त्व मान्य झाल्यावर माध्यम बदलता येणार नाही असे मात्र नव्हे. संस्कृत व्याकरणाची बरीच परिभाषा उपयोगात आणता येईल. ती पुरी पडणार नाही हे उघडच आहे. तिच्यात काही बदल करून बाकीची भर घालावी लागेल.

भाषाशास्त्रीय संशोधनाबद्दल बोलायचे तर सर्वच प्रकारच्या संशोधनकार्यात इंग्रजी माध्यमामुळे हानी कोणतीच नाही. लाभ मात्र फार होतो. सध्याच्या शास्त्रीय विचारप्रवाहांचा वेग आणि प्रगती लक्षात घेतली तर फक्त इंग्रजीवर विसंबून यापुढे भागणार नाही. जर्मन, फ्रेंच, रशियन वगैरे भाषांचे ज्ञान संशोधकाला मिळवले पाहिजे. शास्त्रीय क्षेत्रात राष्ट्र वर यायचे असेल तर आपले क्षितिज बरेच विस्तारले पाहिजे. तशीच ज्ञानाची खोलीदेखील खूप वाढणे जरूर आहे.

एका बाजूला हे जितके खरे आहे तितकीच दुसऱ्या बाजूला सर्व शाखोपशाखांसह शास्त्रांची निरनिराळ्या प्रादेशिक भाषांमधून जिज्ञासूंना स्थूलमानाने ओळख करून देण्याची वेळ आलेली आहे. वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांना Philology म्हणून शिकविला जाणारा अभ्यासक्रम ४०–४५ वर्षांपूर्वीचा आहे. त्यातली प्रमेये व पद्धती केव्हाच मागे पडल्या आहेत. हल्लीच्या भाषाशास्त्राचा त्यात मागमूसही नाही. यासाठी सुसंस्कृत ज्ञानपिपासू वाचकांसाठी प्रादेशिक भाषांमध्ये भाषाशास्त्रावर ग्रंथ लिहिले गेले पाहिजेत.

इंग्रजीतले जास्तीत जास्त भाषाशास्त्रीय साहित्य भारतीय भाषेमध्ये उपलब्ध करण्याचे श्रेय हिंदीला आहे. भारतीय संघराज्याची राष्ट्रीय भाषा होण्यास हिंदी योग्य असल्याने भाषाशास्त्रीय ग्रंथ प्रथम हिंदीत उतरले हे चांगले झाले. यातून आणखीही एक फायदा झाला. तो असा की, पाठ्य पुस्तके लिहिण्याच्या आणि भाषांतरे करण्याच्या पुढील कार्यासाठी उपयोगी पडतील अशा काही मार्गदर्शक बाबी नजरेस आल्या.

## राष्ट्रभाषा

भारतीय ऐक्य राखण्याच्या दृष्टीने हिंदी हीच एक राष्ट्रीय भाषा बनू शकते ही गोष्ट १८२१ सालीच आपल्या ध्यानात आली आहे. एकभाषेचा सारासार विचार करणारे काही निबंधही १८९४ साली मराठीत लिहिले गेले. हल्लीची एकंदर परिस्थिती अजमावता असे दिसते की आपण केवळ प्रादेशिक भाषांचाच अवलंब केला तर आंतरप्रांतीय विचारविनिमय करणे फार कठीण होईल. आणि परस्पर संबंधांच्या बाबतीत हिंदी, मराठी, गुजराती किंवा बंगाली, आसामी, ओरिया अशांसारखे एकमेकांना थोडेफार समजू शकणारे गट निर्माण होतील. पण कानडी, बंगाली किंवा राजस्थानी भाषिकांना एकमेकांशी व्यवहार करणे तितकेसे शक्य होणार नाही. लोकशाही भारतामध्ये असा विलगपणा उत्पन्न होणे केव्हाही अनिष्टच आहे. म्हणून दुवा जोडण्याच्या कामी सध्या होतो तसाच इंग्रजी भाषेचा उपयोग चालू ठेवावा हा एक पक्ष संभवतो. परंतु इंग्रजी भाषा ही भारतीय संस्कृतीला अगदी परकी आहे. आपल्या सांस्कृतिक जीवनात किंवा राज्यकारभारात इंग्रजी राहिली तर ते मानेवर जोखड ठेवल्यासारखे होईल. स्वातंत्र्य मिळाल्यावर अशा जोखडाची आवश्यकता नाही. ते दूर केलेलेच बरे. म्हणून राष्ट्रीय पातळीवरचा सर्व व्यवहार हिंदीमधून होणे इष्ट. भाषांच्या वेगळेपणामुळे घटक राज्यांमध्ये आपापसांत दुरावा उत्पन्न झाला तर राष्ट्र खिळखिळे होण्याची शक्यता संभवते. त्याकरता भाषिक ऐक्य साधणे अपरिहार्य ठरते राष्ट्रीय दर्जाच्या कोणत्याही क्षेत्रात आपण कमी पडणार नाही इतपत हिंदी भाषेवर प्रभुत्व मिळविले पाहिजे. यादृष्टीने शिक्षणक्रमात हिंदीच्या अध्यापनावर जोर देणे क्रमप्राप्त आहे. बहुतेक घटक राज्यांनी संपर्क भाषा म्हणून हिंदीचा स्वीकार केल्यावर आज ज्यांना हिंदीऐवजी इंग्रजी हवी आहे त्यांनासुद्धा कालांतराने हिंदीचा आश्रय घेतल्याशिवाय गत्यंतर नाही.

## भाषेचे सामर्थ्य

हिंदीचा अशा प्रकारे सर्वत्र प्रसार झाला तर त्या भाषेचा वरचष्मा होऊन इतर प्रादेशिक भाषा तिच्या आहारी जातील अशी एक भीती व्यक्त करण्यात येते. पण हिंदीच्या प्रकृतीला धक्का लागू न देता इतर भारतीय भाषांमधले शब्दप्रयोग आत्मसात करण्याचा जो उपाय समितीने सुचविला आहे तोच इतर सर्व भाषांना उपयोगी पडणारा आहे. प्रत्येक प्रादेशिक भाषा संपन्न बनविण्यावर कटाक्ष ठेवला पाहिजे. शब्दसंपत्तीच्या बाबतीत कोणतीच भाषा स्वयंपूर्ण असू शकत नाही. कल्पनांची, शब्दांची देवाणघेवाण करावीच लागते. देशकालाचे अंतर कमी करून क्षणार्धात दोन ध्रुवांचा संपर्क साधण्याच्या किंवा अंतराळात संचार करून इतर ग्रहांशी दळणवळण सुरू

करण्याच्या या काळात ज्ञानसंग्रह करू पाहणारी एकही भाषा स्वयंपूर्ण किंवा परिपूर्ण असू शकणार नाही. सद्यःस्थितीला पुरे पडतील इतके शब्द आपल्या भाषेत आहेत असे कोणी म्हणेल तर ती भाषा बोलणारा समाज इतर संस्कृतींमधला ग्राह्यांश न स्वीकारणारा, उत्क्रांती थांबलेला, अगदी वंदिस्त समाज आहे असे म्हणावे लागेल.

एखाद्या पुरातन भाषेतसुद्धा नवचैतन्य ओतून ती कशी कार्यक्षम बनवता येते याचे उदाहरण हिब्रूचे पुनरुज्जीवन करून इस्रायलने दाखवून दिले आहे. भौतिक शास्त्रांच्या क्षेत्रात ज्यांची चुरस लागली आहे त्या रशिया–अमेरिकेचा दाखलादेखील डोळ्यापुढे ठेवण्यासारखा आहे. रशियामध्ये शास्त्रीय ज्ञानाची फारशी प्रगती झालेली नव्हती तेव्हा रशियन लोकांनी अमेरिकन–इंग्लिश परिभाषा पत्करली. पण जेव्हा अमेरिकेशी बरोबरी करून रशिया पुढे सरसावला तसतसे अमेरिकन परिभाषेऐवजी रशियन शब्द घडले. रशियाची आजची शास्त्रीय परिभाषा बव्हंशी स्वतंत्र आहे.

शब्दसंग्रह संपन्न करण्यासाठी निरनिराळे मार्ग अवलंबावे लागतात. परिभाषेकरता नवे शब्द बनवणे किंवा परभाषांतून उसनवारी करणे एवढे दोनच पर्याय नाहीत. तर आपल्या भाषेत असलेल्या शब्दांना नवा अर्थ देता येतो, किंवा त्याच्या प्रचलित अर्थामध्ये आणखी आशय भरता येतो. शिवाय आपल्या किंवा इतर भाषेतल्या शब्दांपासून अथवा दोन निराळ्या भाषांमधल्या शब्दांचे नवे सामाजिक शब्द रूढ करता येतात. अशा पाचही प्रकारांनी शब्दसंपत्तीत बरीच भर घालता येते. एकदा घडवलेला शब्द किंवा बनवलेली परिभाषा वज्रलेप झाली असे धरून चालणार नाही. नवा शब्दसंग्रह प्रयोगसापेक्ष मानला पाहिजे कारण काळाच्या ओघात समाजाची गरज आणि वापरणारांची आवड जमेस धरून भाषेत काय सामावले जाईल आणि काय बदलेल किंवा गळून पडेल ते अगोदर सांगता येत नाही. पण आपल्या भाषेत शब्दांची वाण आहे म्हणून निरनिराळ्या ज्ञानशाखांमधली ग्रंथनिर्मिती टाळणे हे त्या भाषेच्या दृष्टीने हितकारक नव्हे.

## भाषांतराने शक्तिवर्धन

ग्रंथांची उणीव भरून काढण्याकरता इंग्रजी ग्रंथांची सर्व प्रादेशिक भाषांत भाषांतरे करण्याच्या कार्याला अग्रहक्क द्यावा असे बहुतेकांचे मत आहे. अडून राहिलेले काम चालू करण्याकरता हा प्रयोग करणे भाग आहे. परंतु भाषांतर म्हणजे स्वतंत्र ग्रंथनिर्मिती नव्हे दुसऱ्याचा विचार घेऊन त्याचा उपयोग करणे वेगळे आणि स्वतंत्रपणे आपली बुद्धी चालवून ग्रंथ लिहिणे वेगळे. आपल्या कलाने निरनिराळ्या गोष्टींचे प्रत्यक्ष अवलोकन करून आपला दृष्टिकोण बनवणे, त्या नजरेने काही तत्त्वे शोधणे आणि ते करीत असता नव्या विचाराचा प्रत्यय येणे याला खरे महत्त्व आहे. आपली गृहीतकृत्ये स्वतः हेरून प्रमेये मांडण्याची कुवत वाढली नाही; किंबहुना ती अंगी बाणलीच नाही तर शिक्षणाचा मूळ हेतूच फसेल. ते प्रदेशाच्या आणि पर्यायाने राष्ट्राच्या प्रगतीलाही बाधक ठरेल. म्हणून बौद्धिक विकासाच्या दृष्टीने स्वतंत्र ग्रंथनिर्मितीला प्राधान्य देऊन भाषांतर गौण समजले पाहिजे. याला असा एक उपाय सुचवता येईल की प्रत्येक विषयाच्या तज्ज्ञाने–विद्यापीठातल्या प्राध्यापकांनी–आपल्या मातृभाषेत दोनतीन वर्षांनी एक स्वतंत्र ग्रंथ लिहावा. त्याच्या प्रती ती भाषा जाणणाऱ्या इतर व्यासंगी विद्वानांकडे पाठवाव्या. त्यांची प्रतिक्रिया अजमावून त्यांच्या विधायक सूचनांनुसार आपल्या ग्रंथात योग्य ते बदल करावे आणि मग छपाईसाठी धाडावे. अशा ग्रंथांच्या गुणवत्तेप्रमाणे लेखकाचे म्हणजे प्राध्यापकाचे वेतनमान, बढती वगैरेंची व्यवस्था विद्यापीठाने करावी. ग्रंथसंख्या किंवा ग्रंथाची पृष्ठसंख्या यापेक्षा ग्रंथाची गुणवत्ता व मौलिकता ध्यानात घेऊन त्याचे चीज करण्याचे धोरण विद्यापीठाने पत्करल्यास वय किंवा अधिकार यापेक्षा विद्वत्तेवर ज्येष्ठता प्राप्त होईल. अर्थात यामुळे सध्याची आपली गरज भागविण्याइतपत देशभाषांमधून ग्रंथ होतील असे नाही. तेव्हा या संक्रमणाच्या काळात भाषांतराकडे पाठ फिरवून आपले चालणार नाही. मात्र नडलेले असेल तोपर्यंतच भाषांतरांवर विसंबणे बरे.

ग्रंथाची भाषांतरे करण्याच्या बाबतीतही पुष्कळ अडचणी आहेत. तो एक स्वतंत्रच विषय आहे. ज्या विषयावरचा ग्रंथ भाषांतराला घ्यायचा त्या विषयाच्या ज्ञानाची खोली, ज्या भाषेत तो ग्रंथ आहे ती भाषा आणि ज्या भाषेत भाषांतर करायचे ती भाषा या दोन्ही भाषांवर असलेले भाषांतरकाराचे प्रभुत्व या तीन गोष्टींवर भाषांतराचा दर्जा अवलंबून असतो; इतकेच नव्हे तर भाषांतराची ही कामे करवून घेणाऱ्या शैक्षणिक अथवा व्याव-

साथिक संस्थांच्या धोरणाची पडछाया ही भाषांतरांवर पडण्याची शक्यता आहे. द्रव्यलाभावर लक्ष ठेऊन मोठमोठ्या ग्रंथांची एकामागून एक भाषांतरे झपाट्याने होतील. परंतु विषयाचा दर्जा आणि भाषेचा कस टिकवायचा आणि वाढवायचा असेल तर भाषांतराचे कार्य आखीव धोरणानुसार, टप्प्याटप्प्याने, तज्ज्ञांच्या देखरेखीखाली होणे चांगले. त्यासाठी भाषांतराला उपयुक्त असे रोजेटच्या थेसॉरस ( Roget's Thesaurus ) सारखे समानार्थी शब्दकोश प्रत्येक प्रादेशिक भाषेत झाले पाहिजेत. तसेच प्रादेशिक शब्दकोशांमध्ये शब्दांचे सर्व आधुनिक अर्थ नोंदवून जरुर तेथे शब्दांचे सांस्कृतिक संदर्भ स्पष्ट केले तर त्यांचा भाषांतराच्या कामी विशेष उपयोग होईल.

## स्वावलंबन

प्रादेशिक भाषेमध्ये सर्व संदर्भग्रंथ व साधनग्रंथ तयार होतील तेंव्हाच भाषामाध्यमाचा प्रयोग यशस्वी झाला असे म्हणता येईल. शिथिलता येऊ न देता हे कार्य नेटाने चालविले तर १५–२० वर्षांत त्याला आकार येईल. कळ फिरल्याबरोबर बदल घडावा अशा प्रकारचे हे काम नाही. शिक्षणाव्यतिरिक्त इतर सर्व क्षेत्रांतले भाषाव्यवहारदेखील संपूर्णपणें स्वतंत्र व्हायला एवढा काळ लागणारच आहे. आणि तरीही एकूणएक विषयांचा समाधानकारक निर्वाह करण्याइतकी आपली शब्दसंपत्ती संपूर्ण होईल असे नाही. इजिप्तच्या रॉयल ॲकॅडमीने दहा हजार पारिभाषिक संज्ञा अरबी भाषेत तयार केल्या तरी त्यांची वैद्यक आणि मूलभूत शास्त्रांची अडचण पूर्णतया निवारली गेली नाही. तीच गत इंडोनेशियाची आहे. बहासा इंडोनेशियातल्या चौदा हजार संज्ञांपैकी कायदा आणि अर्थशास्त्राची जी परिभाषा आहे तिने सगळ्याच कल्पना स्पष्ट होतात किंवा त्यामुळे पर्वीच्या चुका नीट सुधारल्या आहेत असे नाही. तेव्हां नेमक्या चपखल बसतील अशा संज्ञा सापडेपर्यंत आपल्याला पारिभाषिक शब्द बदलावे लागले तरी त्यात काही विशेष बिघडले म्हणून कमीपणा वाटण्याचे कारण नाही. मलायामध्ये तर परिभाषेचा प्रश्न सोडवण्याकरता अवश्य असे माणूसबळ नाही म्हणून तिथल्या विद्यापीठांना अनेक विषय डच भाषेतच शिकवणे भाग पडते. आपली परिस्थिती इतकी हलाखीची खास नाही. इंग्रजीशिवाय आपल्याला तरणोपाय नाही असा समज आपण ठाम करून ठेवला तर आपल्या मानेवरचे इंग्रजी माध्यमाचे जू कधीच उतरणार नाही. इंग्रजीशिवाय आपले चालूच शकणार नाहीं असे वाटत असेल त्यांनी जर्मन भाषाव्यवहाराकडे जरा निरखून पाहावे.

## भाषा आणि संस्कृती

स्वतंत्र झाल्यावर आज वीसवर्षांनंतरही अद्याप आपण शिक्षणाचे माध्यम इंग्रजीच ठेवावे असा आग्रह धरणारांना अमेरिकेतली इंग्रजीची सद्यःस्थिती सांगितली तर वावगे होणार नाही. आज कित्येक वर्षे अमेरिकेत इंग्रजी ही 'ऑफिशिअल' भाषा म्हणून स्वीकारलेली असली तरी अरिझोना, कॅलिफोर्निया, कोलोराडो, टेक्सास, न्यू मेक्सिको वगैरे राज्यांमधल्या स्पॅनिश मातृभाषा असणाऱ्या मुलांच्या शाळेत इंग्रजी माध्यम सक्तीचे असल्यामुळे विद्यार्थ्यांची फार मोठी अडचण होते. इंग्लिश संस्कृतीपेक्षा स्पॅनिश संस्कृती पुष्कळच वेगळी आहे. एखाद्या इंग्लिश शिक्षकाने अगदी सहानुभूतिपूर्वक प्रामाणिकपणाने प्रयत्न केला तरी स्पॅनिश भाषिकांच्या भावना, त्यांच्या श्रद्धा, त्यांचे रीतीरिवाज त्याला नीटसे समजू शकत नाहीत त्यामुळे शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यामध्ये विनिमयाची एक समस्याच निर्माण होते. संवादित्व बाजूलाच राहिले. ही गोष्ट सतत खटकत राहिल्याने अलीकडे शिक्षणक्षेत्रात इंग्रजीव्यतिरिक्त स्पॅनिश, फ्रेंच, जर्मन, पोलिश इत्यादी भाषांचा व त्या संस्कृतींचा विचार करणे भाग पडते, हे सत्य नुकत्याच झालेल्या एका पाहणीवरून स्पष्ट झाले.* अमेरिकन शिक्षणाच्या इतिहासावरील कोणत्याही ग्रंथामध्ये ते आढळणार नाही. फ्रँको-अमेरिकन लोकांनी न्यू गिनीत फ्रेंच भाषा सर्वत्र जोमाने चालू ठेवली आहे. तसेच पोलिश अमेरिकनांनी केवळ पोलिशभाषा टिकविण्याकरता पूर्वी अस्तित्वात नव्हते ते 'पोलिश नॅशनल कॅथोलिक चर्च' स्थापन केले. त्यांच्या प्रार्थना पोलिशभाषेत चालतात. याप्रमाणे भाषा आणि संस्कृती यांचा संबंध अतिशय घनिष्ट आहे.

एखाद्या संस्कृतीचे अंतःप्रवाह आणि समाजात घडणारे संस्कृतीचे दर्शन एकच नसते; किंबहुना ते फार निराळे असू शकते. पाश्चात्त्य पद्धतीची अत्याधुनिक राहणी असलेली एखादी व्यक्ती घरी सोवळे नेसून देवपूजा, जपजाप्य करू शकते. या ना त्या कारणाने समाजात

* FISHMAN, Joshua A., The Breadth and Depth of English in the United States, *Universities Quarterly*, March, 1967

एकमेकांशी जे संबंध येतात त्यांच्यामध्ये अंतर पडू शकते. आज जवळीक आहे तेथे उद्या दुरावा उत्पन्न होईल. एखादे वेळी राजकारण, अर्थकारणाच्या बाबत असलेल्या तात्त्विक निष्ठांमध्येही लवकर बदल पडेल. परंतु स्वतःची जीवनदृष्टी, सौंदर्यकल्पना यांसारख्या संस्कृतीत खोलवर रुजलेल्या गोष्टी मनुष्य सहजासहजी सोडू शकत नाही. म्हणून आपल्या संस्कृतीशी असलेले लागेबांधे न तोडता, त्यांना एकदम दूर न सारता अंतःप्रेरणेशी प्रामाणिक राहून जगातल्या ज्ञानाने विद्यार्थ्यांच्या मनावर संस्कार घडवणे हे शिक्षणाचे ध्येय असेल तर ते संस्कार प्रथम प्रादेशिक भाषेतून घडविणे हे केव्हाही श्रेयस्कर ठरेल. पण त्यासाठी जगाच्या ज्ञानभांडारात पडलेली भर जमेस धरून आपल्या विषयाची अद्ययावत तयारी ठेवणे जसे इष्ट आहे, तसेच तात्त्विक विचारातल्या सूक्ष्म छटा दर्शविणारे निश्चित शब्द शोधून आपल्या भाषेचे सामर्थ्य वाढविणे आवश्यक आहे.

• • •

## साभार स्वीकार

**कालचे नाटककार** (नाट्यपरामर्श)–मु. श्री. कानडे, जोशी–लोखंडे प्रकाशन, पुणे २; १० रु.

**मीलन** ( राधाकृष्णाच्या जीवनावरील गीते )–रा. श्री. पंचवाघ, कर्नाटक प्रकाशन संस्था, मुंबई २; ४ रु.

**जगापुढील प्रश्नचिन्हे**–वि. शं. पारगावकर, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; ४ रु.

**व्हीनस प्रकाशने, पुणे २**–

**पौराणिक भागवतधर्म** (उत्कर्षापकर्षाचा इतिहास ) शं. दा. पेंडसे, २० रु.

**अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक** ( सप्तम खंड– रानडे ते वरेरकर )–गं. दे. खानोलकर, ६ रु.

**सप्तप्रकरणात्मक चरित्र** – ( संपा. र. वि. हेरवाडकर, १० रु.

**परलोकविद्या**–न. खं. क्षीरसागर, १० रु.

**संशोधनधारा**–पां. ना. कुलकर्णी, ४ रु.

**लीळाचरित्र : एक अभ्यास**–व. दि. कुलकर्णी, ४ रु.

**पश्चिमेची क्षणचित्रे** – द्वा. भ. कर्णिक, ४ रु.

**चार मने चार रस्ते**–ख्वाजा अहमद, अनुवाद म. ल. वराडपांडे, ४ रु.

**पाऊल खुणा** ( कविता )–वि. म. कुलकर्णी, ५ रु.

**अप्पूच्या अंतरंगात**–प्रभाकर संझगिरी, १० रु.

**काही अप्रसिद्ध ऐति. चरित्रे** : य. न. केळकर, नीळकंठ प्रकाशन, पुणे ९; ३–५० रु.

**अनुभवामृत** : संपा. कै. वा. दा. गोखले, नीळकंठ प्रकाशन, पुणे ९; १० रु.

**विविधा** ( संशो. लेख ) : रा. चिं. ढेरे, नीळकंठ प्रकाशन, पुणे ९; १२ रु.

**निरंजनमाधवविरचित सुभद्रास्वयंवर** : रा. चिं. ढेरे, नीळकंठ प्रकाशन, पुणे ९; ८–५०

**बॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर** ( काद. )–भाऊ पाध्ये, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ६ रु.

**व्यासांचा कायाकल्प** ( एकांकिका ) : वसंत कानेटकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ४ रु.

**काही थोर शास्त्रज्ञ** : वि. ना. गोखले, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ६ रु.

**भूगोलावरील काही विचित्र प्राणी** ( द्वि. आ. ) वि. आ मोडक, संयुक्त साहित्य, पुणे २; ३–५० रु.

**समाजशास्त्र** : विलास संगवे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; १२ रु.

**व्यवहार आणि शिष्टाचार** ( ४ थी आ. ) : श्री. शा. हणमंते, नीळकंठ प्रकाशन, पुणे ९; ६ रु.

**आईच्या आठवणी** ( भाग १ ते ८ ) : श्यामला शिरोळकर, वोरा अँड पब्लि. प्रा. लि. मुंबई २: प्रत्येकी २ रु.

अनुक्रमणिका

# आंद्रे मॉर्वा

◆ अ. म. जोशी ◆

प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार व तत्त्वचिंतक आंद्रे मॉर्वा हे नऊ ऑक्टोबर १९६७ रोजी निधन पावले. ही वार्ता ऐकून त्यांच्या असंख्य चाहत्यांना अतिशय दुःख झाले असेल यात शंका नाही. आंद्रे मॉर्वा हे जन्माने फ्रेंच असले तरी त्यांचे बहुतेक ग्रंथ इंग्रजी व इतर भाषांत भाषांतरित झाले असल्यामुळे त्यांचे वाचक साऱ्या जगभर पसरले होते.

आंद्रे मॉर्वा हे नाव उच्चारल्याबरोबर आधी डोळ्यांसमोर येतात ते त्यांचे चरित्रनायक. शेक्सपियरच्या एरियलप्रमाणे अनाकलनीय, हातातून पाऱ्याप्रमाणे निसटणारे चंचल परंतु मनोहारी व्यक्तिमत्त्व लाभलेला शेले; राजकारणात व साहित्यात सारखाच रंगलेला डिझराएली; चढेल वृत्तीचा बंडखोर व काहीसा जगद्द्वेष्टा ( cynic ), मधुपवृत्तीचा बायरन; अनेक परस्परविरुद्ध गुणधर्मांचे मिश्रण असलेला व्हॉल्टेअर; फ्रेंच लेखक बाल्झॅक व व्हिक्टर ह्यूगो; इंग्रज कादंबरीकार डिकन्स जगज्जेता नेपोलियन; अशा अनेक व्यक्तींना अमर करून ठेवणारा हा चरित्रवाङ्मयाचा जादूगार होता. ही व्यक्तिचित्रे रेखाटताना ती ती व्यक्ती स्वदेशीय आहे की परदेशीय आहे, हा विचार या कलावंताच्या मनात कोठून येणार ? तिचे व्यक्तिमत्त्व आपल्याला पटले, आवडले, रेखाटावेसे वाटले एवढेच त्याने पाहिले.

फ्रान्समधील अल्सेस प्रांतात राहणाऱ्या एका मध्यमवर्गीय कुटुंबात त्यांचा जन्म झाला. आंद्रे मॉर्वा हे त्यांचे खरे नाव नव्हे—ते लेखनासाठी घेतलेले टोपणनाव. खरे नाव एमिल हरझॉग. वडिलांची लहानशी कापडगिरणी होती. बालपणीच या मुलाची बुद्धिमत्ता त्याच्या शिक्षकांच्या ध्यानात आली होती. हा पुढे चांगला लेखक होईल असे भविष्य त्याच्या एका शिक्षकाने केले होते. वाचनाची व लेखनाची हौस त्याला तरुण वयातच जडली होती. वडिलांना मुलाच्या मनाचा स्वाभाविक कल कोठून लक्षात येणार ? ते सदैव गिरणीच्या कामात गुंतलेले असत. शिक्षण पूर्ण होताच मुलाला त्यांनी आपल्या धंद्यात अड-कविले. पुढे मानवी जीवनाच्या आडव्याउभ्या धाग्यांची वीण चितारणाऱ्या या कलाकाराची सुताचे धागे काढणाऱ्या यंत्राशी गाठ पडली. अशा परिस्थितीतही आपला आवडता छंद त्याने चालू ठेवला होता. इंग्रजी भाषेचा अभ्यास केला. अनेक ग्रंथ वाचून काढले. बाल्झॅक, टॉल्स्टॉय व रुडयार्ड किपलिंग हे त्याचे विशेष आवडते लेखक होते.

पहिल्या महायुद्धाच्या काळात फ्रेंच सैन्यात दाखल होऊन युद्धभूमीवरील भीषण रणकंदन त्यांनी प्रत्यक्ष पाहिले. सैन्यातील लहानमोठे अधिकारी व सैनिक यांच्या मनोवृत्तीचे व वागण्याचे जवळून दर्शन घेण्याची संधी त्यांना मिळाली. त्यातून ' Les Silences du Colonel Bramble ' ( १९१८ ) ही कादंबरी जन्मास आली. ही त्यांची पहिली लेखनकृती. याच वेळी त्यांनी आंद्रे मॉर्वा हे टोपणनाव धारण केले. आंद्रे हे युद्धात वीरमरण पावलेल्या त्यांच्या एका आप्ताचे नाव, आणि मॉर्वा हे त्यांना प्रिय असलेल्या गावाचे नाव; असे मिळून आंद्रे मॉर्वा हे नाव बनविले. ही कादंबरी वाचकांस आवडली. विशेषतः सैनिक वर्गात ती फार लोकप्रिय झाली. या यशाने या नवीन लेखकाला उत्तेजन मिळाले.

पुढील काळात कथा, कादंबऱ्या, इतिहास–ग्रंथ, चरित्रे, निबंध असे विविध प्रकारचे विपुल लेखन त्यांनी केले. Bernard Quesnay, Climats, Le cercle de Famille या कादंबऱ्या; The Battle of France, Why France Fell, A new History of the United States हे इतिहासपर ग्रंथ; The Art of Living, Dialogues sur le Commandement हे प्रबंध; शेले–बायरन–डिझराएली इत्यादी चरित्रग्रंथ, या त्यांच्या अफाट ग्रंथसंपदेपैकी काही प्रमुख कृती होत. त्यांची एकंदर ग्रंथसंपत्ती दोनशेच्या घरात जाईल एवढी मोठी आहे. तथापि आंद्रे मार्वा यांचे महत्त्वाचे वाङ्मयीन कार्य चरित्रलेखनाच्या द्वारे झाले आहे. त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचा परिचय एका लेखाच्या मर्यादेत करून

अनुक्रमणिका

देणे कठीण आहे. इतकेच नव्हे तर त्यांच्या सर्व चरित्र-ग्रंथांचाही परामर्श या लेखात घेता येईल असे वाटत नाही. म्हणून या ठिकाणी त्यांच्या दोनतीन प्रमुख चरित्रग्रंथांच्या आधारे त्यांच्या चरित्रवाङ्मयविषयक दृष्टीचा व कार्याचा थोडक्यात परिचय करून देण्याचे योजिले आहे.

आंद्रे मॉर्वा यांनी लेखन सुरू केले त्यापूर्वीच्या काळात युरोपीय वाङ्मयात चरित्रलेखनाविषयी शास्त्रीय दृष्टी निर्माण झाली नव्हती. चरित्रे लिहिली जात ती मोठमोठ्या अमीर-उमरावांची व तीही केवळ त्यांचा गौरव करण्याच्या हेतूने. अशा चरित्रग्रंथांत चरित्रनायकाच्या निर्भेळ स्तुति-स्तोत्रांशिवाय दुसरे काय येणार? मोठ्या माणसाचे दोष दाखविले तर त्याच्या मोठेपणास बाध येतो अशी समजूत होती. चरित्रविषयक साधनसामग्रीचे साक्षेपाने संशोधन व तपासणी करण्याची फारशी यातायात कोणी करीत नसे. चरित्रलेखनाविषयीची ही भोंगळ दृष्टी सोडून देऊन या वाङ्मयप्रकाराला इष्ट व कलात्मक वळण लावण्याचे कार्य करण्यास काही नवीन लेखक पुढे सरसावले. अशा लेखकांत इंग्रजीतील प्रसिद्ध 'व्हिटोरिया राणी' चा चरित्रकार लिटन स्ट्रॅची, 'नेपोलियन' चरित्राचा जर्मन लेखक एमिल लुडविग, व फ्रेंच ग्रंथकार आंद्रे मॉर्वा यांची प्रामुख्याने गणना करावी लागेल.

चरित्र कोणाचे लिहावयाचे व कसे लिहावयाचे याबाबत या लेखकांनी स्वतंत्र दृष्टी स्वीकारली. केवळ मोठ्या माण-साचा गौरव करण्यासाठी, किंवा मृत्यूनंतर एखाद्या व्यक्तीचे स्मारक करावे म्हणून तिच्या आप्तांच्या आग्रहावरून तिचे चरित्र लिहावयाचे हा प्रकार त्यांना साफ अमान्य होता. एखादा चित्रकार आपला विषय निवडताना जी दृष्टी ठेवतो ती दृष्टी ठेवून चरित्रनायकाची निवड करावयाची—म्हणजेच ज्या व्यक्तीच्या जीवनचरित्रात व व्यक्तिमत्त्वात आपणांस विशेष प्रकारचे सौंदर्य दिसेल अशीच व्यक्ती चरित्रविषय म्हणून निवडावयाची; ही निवड केल्यानंतर त्या व्यक्तीसंबंधी जितकी प्रमाणभूत माहिती मिळेल तितकी मिळवून, ती माहिती काळजीपूर्वक तपासून, त्या माहितीच्या आधारे चरित्रविषयाच्या व्यक्तिमत्त्वाचे यथातथ्य चित्रण करावयाचे; आणि हे चित्रण करिताना आपणा-जवळ असलेल्या साधनसामग्रीची कलात्मक योजना करून चरित्रग्रंथास आटोपशीर व सुबक स्वरूप द्यावयाचे, अशी या नवीनांची दृष्टी होती. ही दृष्टी प्रत्यक्षात उतरविण्यात आंद्रे मॉर्वा यांनी कसे यश मिळविले ते शेले, डिझराएली व बायरन या त्यांच्या तीन प्रमुख चरित्रांच्या आधारे पाहू.



आंद्रे मॉर्वा ऑक्सफर्ड येथे गेले असताना त्यांना शेले कवीच्या जीवनाबद्दल कुतूहल व आकर्षण उत्पन्न झाले होते व त्याबद्दल काही तरी लिहावे असे वाटू लागले होते. शेलेच्या व त्यांच्या स्वतःच्या जीवनात व मनोभूमिकेत काही तरी विलक्षण साम्य आहे, असे त्यांना दिसून आले. शेले याला ज्या अंतर्बाह्य संघर्षांना तोंड द्यावे लागले त्यांचे शब्दरूपाने चित्रण केले असता आपणांस आत्माविष्कार केल्याचे समाधान लाभेल असे त्यांना वाटले. या विचाराने शेलेच्या जीवनावर कादंबरी लिहिण्याचे त्यांनी ठरविले व त्याप्रमाणे कादंबरी लिहून प्रसिद्ध केली. परंतु तीत सत्य व कल्पित यांचे रसायन नीट जमले नाही. त्यांच्या मनाचे समाधान झाले नाही. अंतःकरणातील खुटखुट कायम राहिली. म्हणून शेलेचे चरित्र लिहावयाचे ठरविले. १९२४ साली 'Ariel–A Shelley Romance' या नावाने ते प्रसिद्ध झाले. या चरित्रात शेलेच्या व्यक्तिमत्त्वाचे चित्रण करण्याचा उद्देश प्रामुख्याने डोळ्यांसमोर ठेविला होता. अर्थात त्याच्या काव्याचे विवेचन करण्याची आवश्यकता नव्हती. आवश्यक तितकाच त्याच्या कवितांचा उल्लेख करावयाचा असे धोरण त्यांनी ठेविले. या प्रयत्नातून शेलेचे व्यक्तिमत्त्व शब्दरूपाने साकार झालेले पाहून त्यांना समाधान वाटले.

परंतु या चरित्रास दिलेल्या 'Ariel–A Shelley Romance' या नावाने एक गैरसमज निर्माण केला. हे नाव लेखकाने शेलेच्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्त्वास अनुलक्षून योजिले होते. पण त्यावरून हे चरित्र म्हणजे काही तरी कल्पनारम्य वस्तु आहे व अशा कल्पनारम्य चरित्रा ( romanticized biography ) चा एक नवा प्रकार आंद्रे मॉर्वा यांनी निर्माण केला अशी भ्रामक समजूत पसरली व नको त्या नव्या शोधाचे श्रेय लेखकाच्या गळ्यात बांधले गेले. स्वतः आंद्रे मॉर्वा यांना ही विलक्षण कल्पना कधीच अभिप्रेत नव्हती. चरित्रवाङ्मय कल्पनारम्य कधीही नसते, त्यात कल्पनेला स्थान नाही, चरित्रकाराने सत्य कटाक्षाने पाळावयास हवे, हे आपले विचार त्यांनी अनेक वेळा बोलून दाखविले होते. तथापि हा गैरसमज कायम राहिला व त्यांचे चुकीचे अनुकरण करून कित्येक नव-शिक्या लेखकांनी सत्यासत्याची चाड न बाळगता तथा-कथित कल्पनारम्य चरित्रग्रंथ लिहावयास सुरुवात केली. याचे आंद्रे मॉर्वा यांस दुःख झाले.

कालांतराने त्यांना डिझराएली या चरित्रनायकाचा शोध लागला. डिझराएलीचे चरित्र त्यांच्या पाहण्यात आले होते. त्याचे वाङ्मयही त्यांनी वाचले होते. त्यामुळे डिझराएली या व्यक्तीबद्दल त्यांना कुतूहल वाटू लागले. त्याची राजकीय व सामाजिक मते त्यांना पटली होती व आवडली होती. ब्रिटिश परंपरावादाचा तो खराखुरा प्रतिनिधी आहे असे त्यांचे मत होते. हा परंपरावाद त्यांना स्वतःला फार पसंत होता. जन्माने ज्यू असल्यामुळे डिझराएली याला सोसावा लागलेला विरोध, व त्यातून त्याने कायम ठेवलेली ध्येयनिष्ठा, कौटुंबिक जीवनातही आपल्यापेक्षा तेरा वर्षांनी मोठी असलेल्या पत्नीबद्दल त्याला वाटणारे प्रेम व निष्ठा, या गुणांमुळे या राजकारणी परंतु हाडाच्या साहित्यिक पुरुषाबद्दल त्यांना विलक्षण आकर्षण वाटू लागले, आणि त्याचे चरित्र लिहिण्याचे त्यांनी ठरविले. डिझराएलीच्या राजकारणापेक्षा त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे चित्रण करण्यावर भर देण्याचे त्यांनी धोरण ठेविले. तसे पाहिले तर कवीचे व्यक्तिमत्त्व आणि त्याचे काव्य ही जशी पूर्णपणे पृथक् करता येत नाहीत, त्याचप्रमाणे राजकारणी पुरुषाचे राजकारण व त्याचे व्यक्तिमत्त्व अलग करणे कठीण–किंबहुना त्याहीपेक्षा जास्त कठीण. परंतु ही तारेवरची कसरत त्यांनी साधली. राजकारणाचा केवळ पार्श्वभूमीसारखा उपयोग करून डिझराएलीच्या व्यक्तिमत्त्वास उठाव देण्यात त्यांनी यश मिळविले. या ग्रंथाच्या सौंदर्याचे येथे दिग्दर्शन करणे अप्रस्तुत ठरेल. त्यासाठी हा ग्रंथ प्रत्यक्ष वाचून पाहणेच इष्ट होईल.

बायरन या व्यक्तीबद्दलही त्यांना असेच विलक्षण आकर्षण होते. कोणत्याही स्त्रीला सहज मोह घालील असे शरीरसौंदर्य लाभलेला हा अमीर कवी जसा आपल्या काव्यामुळे लोकप्रिय झाला होता, तसा आपल्या बेछूट वर्तनाने अप्रिय झाला होता. त्याचे व्यक्तिमत्त्व अनेक गुणदोषांच्या धाग्यांनी विणले गेले होते, आणि कदाचित यामुळेच ते चरित्रकाराच्या आकर्षणाचा विषय झाले असावे. आंद्रे मॉर्वा यांनी पूर्वी शेलेच्या चरित्रात बायरनचे व्यक्तिचित्र रेखाटलेच होते. परंतु ते अपुरे होते. त्याने त्यांचे समाधान झाले नव्हते. इतकेच नव्हे, बायरनच्या बाबतीत आपल्या हातून थोडा अन्याय घडल्याची बोचणी त्यांच्या मनाला लागली होती. बायरनचे स्वतंत्र चरित्र लिहिणे हाच त्यावर उपाय होता.

यासाठी अनेक ग्रंथांचे व कागदपत्रांचे आलोडन सुरू झाले. सुदैवाने बायरनच्या जीवनासंबंधी अत्यंत खाजगी अशी पत्रे त्यांना उपलब्ध झाली. इतर अनेक दुर्मिळ कागद मिळाले. चरित्रनायक ज्या वातावरणात वाढला, ज्या स्थळी त्याच्या जीवनातील महत्त्वाच्या घटना घडल्या, त्यांचे प्रत्यक्ष अवलोकन व अभ्यास केल्याशिवाय त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे मर्म कळणार नाही असे त्यांचे ठाम मत होते. म्हणून बायरनच्या जीवनातील प्रमुख घटनांशी संबद्ध असलेली सर्व स्थळे त्यांनी स्वतः तेथे जाऊन पाहिली. कवीचे व्यक्तिमत्त्व रेखाटताना त्याच्या काव्यास आवश्यक तेवढेच स्थान द्यावयाचे, हे पूर्वीचे धोरण या वेळीही ठेविले होते.

बायरनच्या जीवनात एक मर्मस्थान होते–अर्थात इतरांच्या दृष्टीने; बायरनने स्वतः त्याची कधीच क्षिती बाळगली नाही. काही स्त्रियांशी त्याचा विवाहबाह्य संबंध होता. इतकेच नव्हे तर स्वतःच्या सावत्र बहिणीशी त्याचा संबंध आला होता. याबाबत लोकांत मतभेद होते, परंतु आंद्रे मॉर्वा यांना या बाबीसंबंधी भक्कम पुरावा उपलब्ध झाला होता. म्हणून त्यांनी या मर्माचा आपल्या बायरनचरित्रात उल्लेख केला. काही लोकांना ते आवडले नाही. परंतु ही गोष्ट वगळण्याचे कारण नाही असे आंद्रे मॉर्वा यांचे मत होते उलट या गोष्टी वगळल्या तर बायरनच्या व्यक्तिमत्त्वाचे सर्वांगीण चित्रण होणार नाही असे वाटत असल्यामुळे त्यांनी याबाबत अप्रियता स्वीकारण्याची तयारी ठेवली.

या ग्रंथात बायरनच्या व्यक्तिमत्त्वाचे गुणदोषांसहित उत्कृष्ट विश्लेषण झालेले आढळते व बायरन ही काय व्यक्ती होती याची खरीखुरी कल्पना या चरित्रावरून येते. 'बायरनविषयी संपूर्ण माहिती देणारा या विषयावरील सर्वोत्कृष्ट ग्रंथ' अशा शब्दांत टीकाकारांनी या ग्रंथाचे स्वागत केले. मात्र शेलेच्या चरित्राइतका तो कलात्मक उतरला नाही, बायरन या व्यक्तीवरचा तो निबंध झाला आहे, असे काही टीकाकारांचे मत पडले. तथापि प्रमाणभूत चरित्रग्रंथ लिहिण्यासाठी किती परिश्रम करावे लागतात याची योग्य कल्पना या ग्रंथाने आणून दिली, आणि त्याहीपेक्षा अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे शेलेच्या चरित्राने निर्माण केलेली 'कल्पनारम्य चरित्रा'ची भ्रामक समजूत या चरित्राने नाहीशी केली याचे आंद्रे मॉर्वा यांना समाधान वाटले.

वरील 'कल्पनारम्य चरित्रा' वरून एक विचार सुचतो. चरित्रवाङ्मयाची कलाप्रकारात गणना करावी किंवा नाही

हा तो विचार. चरित्राची कौशल्यपूर्ण मांडणी करून ते एखाद्या कादंबरीसारखे आकर्षक करणे ही केवळ कारागिरी होय, कला नव्हे असे म्हणणारे टीकाकार आहेत. कादंबरीकाराप्रमाणे चरित्रकार 'अपूर्ववस्तुनिर्मिती' किंवा नवनिर्मिती करीत नाही हे खरे; कारण त्याने हाताळलेली पात्रे व घटना 'कविप्रतिभानिर्मित' नसतात, तर सत्यसृष्टीतील असतात. तथापि एखादा चरित्रकार चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्वाचे चित्रण करिताना त्याच्या जीवनाचा पट अशा कौशल्याने उलगडून दाखवितो की, एखाद्या कादंबरीतील नायकाप्रमाणे चरित्रनायकास आपल्या जीवनात दिसलेली नवीनवी क्षितिजे त्याच क्रमाने आपल्यालाही प्रतीत होत असल्याचा आभास वाचकात निर्माण व्हावा, एखादी कादंबरी वाचीत असल्याचा त्यास आनंद प्राप्त व्हावा, व परिणामतः चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्वाचे सत्यपूर्ण, संपूर्ण व काही आगळे दर्शन घडल्याचा प्रत्यय यावा. चरित्रवाङ्मयात कल्पनारम्यता असेल तर ती एवढ्यापुरतीच आहे असे स्वतः आंद्रे मॉर्वा यांचे म्हणणे होते. ती काटेकोर अर्थाने नवनिर्मिती नसेल, हवे तर तिला पुनर्निर्मिती म्हणावे. पण इतक्या मर्यादित अर्थाने तरी चरित्रवाङ्मयास कलेची पदवी देण्यास प्रत्यवाय नसावा. या दृष्टीने आंद्रे मॉर्वाप्रभृती नवीन चरित्रकार कलावंत होत असेच म्हणावयास हवे.

आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून आंद्रे मॉर्वा यांच्या चरित्रविषयक दृष्टिकोनाविषयी यथार्थ कल्पना येईल. आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारे त्यांनी माणसामाणसांतील सामंजस्य साधण्याचा प्रयत्न केला. सत्य, न्याय, निष्ठा, नम्रता इत्यादी गुणांची त्यांनी स्वतःच्या जीवनात सतत जोपासना केली. आपल्या प्रतिस्पर्ध्याची बाजू आधी समजून घेणे, प्रेमाने व सद्भावनेने त्याचे हृदयपरिवर्तन करणे, मनात अहंभाव न बाळगता स्वार्थत्यागपूर्वक जनसेवा करणे, या गांधीप्रणीत तत्त्वांवर त्यांचा फार विश्वास होता. त्यांना हिंदुस्थानाबद्दल फारशी माहिती नसावी; नाहीतर त्यांच्या चरित्रनायकात म. गांधी यांस निश्चित स्थान मिळाले असते.

थोर वाङ्मयसेवकास मिळावयास हवे असे बहुतेक सर्व बहुमान त्यांना मिळाले. केवळ त्यांच्या देशबांधवांतच नव्हे तर अन्यदेशीयांनही त्यांनी मोठी मान्यता मिळविली. १९३८ साली त्यांची 'फ्रेंच अॅकेडमी' चे सदस्य म्हणून निवड झाली. फ्रान्समध्ये लेखकास मिळणारा हा सर्वोच्च मान समजला जातो. ऑक्सफर्ड व एडिंबरो या ग्रेट ब्रिटनमधील, व प्रिन्स्टन या अमेरिकेतील विद्यापीठांनी त्यांना 'डॉक्टर ऑफ लेटर्स' या सन्माननीय पदव्यांनी विभूषित केले. ब्रिटिश सरकारने K. B. E. हा बहुमानाचा किताब अर्पण करून त्यांचा सन्मान केला.

१९४३ साली त्यांनी आपले आत्मचरित्र लिहून प्रसिद्ध केले. त्यात त्यांनी आपल्या जीवनातील कडूगोड अनुभव, संघर्षमय घटना, व आपल्या वाङ्मयामागील प्रेरणा, यांचे प्रामाणिक व यथातथ्य वर्णन केले आहे. आपल्या स्वभावातील गुणदोष त्यांनी तटस्थवृत्तीने सांगितले आहेत. सुखाचे व दुःखाचे, यशाचे व अपयशाचे, असे कित्येक प्रसंग एकाच वेळी त्यांना अनुभवावे लागले, व ते त्यांनी एखाद्या तत्त्वज्ञाच्या स्थितप्रज्ञतेने स्वीकारले. म्हणूनच कदाचित त्यांनी आपल्या आत्मचरित्रास 'Call No Man Happy' हे नाव दिले असेल.

गेल्या सप्टेंबर महिन्यात त्यांना पोटाचा विकार जडला व त्यावर शस्त्रक्रिया करण्यात आली होती. या दुखण्यातच त्यांचा अंत झाला. असा मृत्यू 'अनायासेन मरणम्' या स्वरूपाचा म्हणता येणार नाही. आपणास मरण यावे ते अखेरच्या क्षणापर्यंत लेखनकार्य करीत असताना, 'वाक्य अर्धेच लिहून झाले असताना' यावे अशी त्यांनी इच्छा व्यक्त केली होती, ती दुर्दैवाने पूर्ण झाली नाही.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

# मराठी व फार्सी

## ( उत्तरार्ध )

◆ देवीसिंग चौहान ◆

### फार्सी प्रत्यय ई

राजवाडे यांचे म्हणणे असे ( पा. ६२ ) : " फारशीच्या संसर्गाने मराठीला आणिक एक खोड लागली, ती ही की फारशीतील शब्दसिद्धीचे प्रत्यय मराठी स्त्रीकारू लागली. ये ( उच्चार ई ) प्रत्यय लावून फारशीत भाववाचक किंवा धंदावाचक नाम होते, जसे दोस्त, दोस्ती. ह्या धर्तीवर मराठीतील नामे अशी होत. वैद्यक, वैद्यकी; एक, एकी; दु, दुही; बेक, बेकी; मांत्रिक, मांत्रिकी; वैदिक, वैदिकी; मधुकर, मधुकरी वगैरे. "

आपल्या या कथनाचे स्वतः राजवाडे यांनी आपल्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणात पान १३० वर खंडन केलेले आहे. या खंडनाचा उल्लेख त्यांना केलेला नाही. पण भाववाचक नाम बनवण्याचा ( तल् ) ता = ई = ऐ प्रत्यय सांगितलेला आहे. त्याची उदाहरणे अशी दिली आहेत. " बहुचकै, सदैवैं, चक्रवर्तें, निश्चितै, चावटै, एकवंकै, ग्राहकै वगैरे भाववाचक नामे ज्ञानेश्वरीत सापडतात. ग्राहकता = ग्राहकई = ग्राहकै = गिऱ्हाइकी... चक्रवर्तें, चक्रवर्ती म्हणजे चक्रवर्तिपण, चक्रवर्तिता. "

तसेच पुढील भाववाचकांचे वापर ज्ञानेश्वरीत सापडतात— पाइकी ( १४·२०६ ), पाइकै ( दास्य १७·२०४ ), लावणी—रोपणी ( ११·६६२ ), दिवेलावणी ( १३·९२७ ), लावणी ( मेळ १६ ६२ ), कवतिकिणी ( १६·६० ), बुझावणी ( ११·६६२ ), उधाणी ( मांडणी १६·६० ), उतान्ही ( तीव्र इच्छा १३·१६६ ), उतरडी ( उतरंड—डी १३·११४ ), निसुगे ( निर्लज्जपणा ११·५४४ ), आइति ( तयारी ७·१२७, १६·२८० ), वाचाळै ( १८·१६८८ ), वाटौळी ( १५·३०७ ), वाकडै ( वक्रता १८·१७७३ ), वाकुली ( ७·१८५ ), वाकुली दावणे ( १७·९३ ) इत्यादी यापेक्षा अधिक लिहिण्याचे कारण नाही.

फार्सीतील वान प्रत्यय मराठी शब्दाला लागून शब्द बनतात असे राजवाडे यांनी सांगितले आहे व गाडीवान शब्दाचा दाखला दिला आहे. गाडीवानमधील वान प्रत्यय फार्सी आहे हे खरे आहे. परंतु वान् हा संस्कृत प्रत्ययसुद्धा आहे. त्यापासून भगवान्, भाग्यवान् इत्यादी शब्द बनतात. मराठीत अशी नामे यादवकालीन मराठीतही सापडतात. पण ती क्वचितच. फार्सीच्या संपर्काने अशी नामे बनण्याची गती वाढली हे खरे आहे. यातील खरी गोष्ट अशी आहे की वान हा फार्सी प्रत्यय संस्कृत वन्, वान् पासूनच निघालेला आहे. तसेच फार्सी व मराठी ह्या नात्याने सगोत्र आहेत. म्हणून हा सर्व व्यवहार सोपा, सरल व बहुप्रचार झाला. हीच गोष्ट वर वर्णिलेल्या ई प्रत्ययासंबंधीची आहे. राजवाडे यांनी ई प्रत्यय ता पासून व्युत्पादिला आहे. हे दूरान्वयी होते. ई प्रत्यय संस्कृत ईय या प्रत्ययापासून व्युत्पादिला पाहिजे. हाच ई प्रत्यय फार्सीत कार्यप्रवण आहे. तोच मराठीतही आहे. फार्सीचा संबंध मराठीशी येण्याच्या अगोदर मराठीत हा प्रत्यय होता हे वर आलेच आहे.

फार्सी भाषेत स्थलवाचक ग्रामापासून आडनावे बनविण्याची प्रथा आहे. उदाहरणार्थ शीराजपासून शीराजी, घोरपासून घोरी, लाहोरपासून लाहोरी इत्यादी, स्थल-नामातील अन्त्याक्षर ह किंवा ई असल्यास या,ह, ई च्या पूर्वी उच्चारसौकर्यार्थ व वाढविला जातो-उदाहरणार्थ गंजहपासून गंजवी, काकोरीपासून काकोरवी, दिहलीपासून दिहलवी इत्यादी. हीच पद्धत महाराष्ट्राच्या सीमेवरील कन्नड-प्रदेशालगत मराठीत चालू आहे. लोहारा स्थलनामा-पासून लोहारे असे आडनाव सिद्ध होते. सोलापूरपासून सोलापुरे, नागपूरपासून नागपुरे अशी आडनावे भरपूर पाहण्यात येतात. हजारो मैल दूर असलेल्या दोन भाषांतील ही पद्धती अवश्य विचारणीय होय. भाववाचकांच्या बाबतीतही या दोन्ही भाषांमध्ये हे वैशिष्ट्य स्वतंत्रपणे विकसित झालेले आहे. आडनावाच्या प्राचीनत्वाबद्दल मला या वेळी अधिक सांगता येत नाही. परंतु भाव-वाचकांच्या बाबतीत फार्सी ई चा काहीही संबंध नाही हे

वर दिसून आलेलेच आहे.

नामसाधक यक प्रत्ययाचा फार्सी म्हणून राजवाडे यांनी उल्लेख केलेला आहे. परंतु फार्सीत नामसाधक यक प्रत्यय नाही. फक्त यक म्हणजे संस्कृत एकपासून निघालेला संख्यावाचक आहे. उदाहरणार्थ त्यांनी. नीमयक नीम्के, सवाके, पावके व दीडके हे शब्द उल्लेखिले आहेत. परंतु एकचे सर्वच मुसळ येथे केरात गेलेले आहे. नीमके शब्द नीम (अर्धा) शब्द फार्सी आहे. पण नीमक शब्द फार्सीत नाही. नीम या शब्दाला संस्कृतमधील लघुत्वदर्शक क प्रत्यय लागलेला आहे. ही मराठी प्रक्रिया आहे. पुढील सर्व शब्द भारतीय आर्य भाषांतील आहेत. त्यांचा फार्सीशी मुतराम् संबंध नाही. तुळपुळ्यांच्या पुस्तकात ही संख्यावाचके दिलेली आहेत. वरील शब्दांत फक्त नीम शब्द फार्सी व शेष भारतीय आहेत.

## रा पासून ला ?

फार्सी भाषेत द्वितीया व चतुर्थीसाठी रा प्रत्यय वापरतात. तो फार्सीत कसा आला याची चर्चा राजवाडे यांना अभिप्रेत नव्हती. राजवाडे यांना फार्सीच्या भाषाशास्त्राची ओळख नसावी असे वाटते. त्यांच्या लेखनावरून या ओळखीचा सुगवा लागत नाही. अशी ओळख नसतानाही त्यांनी काही फार्सी शब्दांच्या व्युत्पत्ती संस्कृतपासून दिलेल्या आहेत. परंतु केवळ बुद्धी व कल्पनाशक्ती यांच्या साहाय्याने दिलेल्या व्युत्पत्ती इतरेजनांना अस्वीकारार्ह वाटल्या. सफेद शब्दाचे एकच उदाहरण यासंबंधी पुरे आहे. राजवाडे यानी सफेद शब्द संस्कृत श्वेतपासून व्युत्पादिला. पण व्युत्पत्तिकोशकार कुलकर्णी यांना ही व्युत्पत्ती विश्वासार्ह वाटली नाही. परंतु सफेद शब्द सं. श्वेतपासून निघाला हे या क्षेत्रातील सामान्यज्ञान होय. असो. रा शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधी पॉल हॉर्न (ग्रंडिस दर नियुपर्सिश्चेन एटिमॉलॉजी शक १८१५, स्ट्रासबर्ग) यांनी रा प्रत्ययाचे निरनिराळ्या फार्सी बोलींतील पूर्वज दिलेले आहेत. प्राचीन फार्सीत त्याचे रूप राद्–रादिय असे आहे (पाहा क्रमांक ६००) पहलवी भाषेत ते राइ असे आहे. अफगानी या फार्सीच्या बोलीत त्याचे रूप लर किंवा लऱ् आहे. कुर्दीस एक फार्सीची बोली आहे. ती कुर्दिस्तानची भाषा. कुर्दिस्तान सध्या इराण, इराक, सीरिया व तुर्कस्थान या चार देशांत विभागलेला आहे. या प्रदेशाची कुर्दीस भाषा फार्सीची बोली व भारतेराणीय भाषा समजली जाते. या कुर्दीस बोलीत रा चे रूप पॉल हॉर्न याने आराई असे दिलेले आहे. ऑसेटी या फार्सीच्या बोलीत रा चे स्वरूप प्राचीन फार्सीतल्याप्रमाणे राद् असे आहे. हॉर्न याने संस्कृतच्या कोणत्या शब्दाशी या रा चा संबंध आहे हे सांगितलेले नाही. परंतु वरील सर्व रूपे पाहिल्यावर प्राचीन फार्सीचा राद् हा प्रत्यय संस्कृत अर्थे प्रत्ययाचा अपभ्रंश होय असे दिसते. अर्थे मधील थ चा, फार्सीच्या नियमानुसार लोप झाल्यास अरे, अरै, आराई असे रूप कुर्दीसमध्ये झाले तेही केवळ नियमानुसारीच होय. अफगानीतील लर, लऱ् हेसुद्धा अर्थेपासून सहजसंभव आहेत, हे उघड आहे. थ चा द् नेहमी होतो. भारतीय आर्यभाषांतही चतुर्थीचा प्रत्यय ते हा संस्कृत अर्थे पासून निघाल्याचे सर्व भाषाशास्त्रकोविदांनी एकमताने सांगितले आहे. यादवकालीन मराठीत तुळपुळे यांनी याचा परामर्श घेतलेलाच आहे. असो.

राजवाडे यांनी रा पासून ला निघाल्याचे सांगताना आपली सर्व भिस्त कल्पनाशक्तीवर ठेवलेली आहे. जुन्या मराठीत ला प्रत्यय नाही हे सर्वांनीच सांगितले आहे. राजवाडे यांनीही ते सांगितले. बीम्स इत्यादींचे म्हणणे की, ला प्रत्यय लग् या धातूपासून निघालेला आहे. ते खोडून काढण्यासाठी राजवाडे यांनी या उपप्रस्तावनेत ५७ ते ६० अशी पाने खर्ची घातली आहेत. त्यांच्या या विधानाला ऐतिहासिक आधार नाही. शिवपूर्वकालातील राजव्यवहारी मराठी भाषेत प्रतिशत ७५–८० शब्द फार्सी होते. परंतु या सर्व महासागरात मराठी ला च्या जागी रा वापरल्याचे एकही उदाहरण त्यांना दाखविता आले नाही. जुन्या मराठीत ला नव्हता व या रा मुळे पुढे ला रूप होऊन ते मराठीत रूढ झाले असे म्हणण्याला निदान चारदोन उदाहरणे जरी त्यांनी दाखविली असती तरी विद्वानांनी त्यांच्या या तत्त्वाचा विचार केला असता. परंतु नंतरच्या कोणाही भाषाशास्त्रज्ञाने ' परमार्थेन न गृह्यतां वचः ' या न्यायाने त्यांच्याकडे लक्ष दिलेले नाही.

ज्ञानेश्वरीत लागूनि, लागौनि, लागौनिया हा प्रत्यय ला या अर्थी वापरला गेला आहे (पाहा १·६३, ५·५; १०·९२) हे सर्वांना मान्य आहे. परंतु प्रत्यक्ष ला चा अभाव आहे. खालील ओवीत लगि मूळ रूपाचे अपभ्रष्ट रूप लई झालेले दिसून येते.

ऐसा भक्ता लई चोख्टीं। गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठी।
मग माझिया संवसाठीं। तूकसी जगीं। १८·१४९९

लग् रूपाचे लअ हे अपभ्रष्ट रूप झाल्याची ही प्रथमावस्था म्हणून पाहता येईल. त्याचे पुढे कालान्तराने ला रूप झाले असावे. एकनाथात ला आहे हे राजवाड्यां-सुद्धा सर्व सांगतात. एकनाथांच्या देहान्त शक १५२१ त झाला. यादवकालीन मराठीची कालमर्यादा शक १३५० पर्यंत पोचते. तर या मधल्या १५० वर्षांच्या कालावधीत मराठीत ला या चतुर्थी प्रत्ययाचा विकास झालेला दिसतो. विष्णुदास नामा याचा महाभारतातील उतारा नवनीतात ( शक १८७९ ) दिलेला आहे. विष्णुदास नामा नावाचे बरेच ग्रंथकार आहेत. त्यांपैकी हा कोण व त्याचा काळ कोणता हे नक्की नाही. नवनीतात त्याचा काळ ज्ञानेश्वर व एकनाथ यांचा मध्यकाल होय असे म्हटले आहे. परंतु भाषेवरून हा एकनाथाच्या जवळचा असावा असे स्पष्ट-तया दिसते. भाषाशास्त्रदृष्ट्या तो शक १३५० च्या अगो-दरचा कदापि होऊच शकत नाही. या महाभारतात ला प्रत्यययुक्त खालील ओवी आढळते.

मग उभा राहिला लक्ष्याजवळां । म्हणे समस्तां भूपाळां ।
जो कोणी भेदील **लक्ष्याला** ।त्यासि माळ घालील द्रौपदी
( पृ. ५१ )

शेख महंमद हा मुसलमान मराठी कवी शक १५१८ त जिवंत होता. त्याने **ला** प्रत्यय वापरला आहे. नवनीत पृ. ७२ वरील ओवी अशी—

केकती**ला** काव्याचे वेढे । भितरीं निपजती केवडे ।
तैसे साधूचे शब्द गाढे । परोपकारालागीं । ( योगसंग्राम )

यावरून हे स्पष्ट होते की ला जरी नवजात असला व यादव मराठीत त्याचा प्रचार सर्वत्र नसला तरी त्याच्या गर्भावस्थेची चिन्हे मात्र तेथे दिसतात. त्याचा जन्म शकाच्या पंधराव्या शतकात झाला. तो फार्सीतून आला असे मुळीच नाही. तो मराठी मातीतून येथेच जन्मलेला आहे.

चोंभा कवीचे उपाहरण हे अपूर्ण काव्य शक १४०० च्या सुमाराचे मानले जाते. चोंभा ज्ञानेश्वराच्या पश्चात्कवी होय हे राजवाडे यांचे म्हणणेही योग्यच आहे. या उपाहरणात ला प्रत्यय प्रयुक्त झालेला नाही. शक १८८७ त डॉ. प्रभुदेसाई यांनी कविनंदनकृत उखाहरण प्रसिद्धिले आहे. हे काव्य शक १४५० च्या नंतरचे असावे. परंतु तो कवी एकनाथापेक्षा २५—३० वर्षांनी तरी पूर्वीचा असावा. या उखाहरणाची भाषा एकनाथापेक्षा निश्चये-करून जुनी आहे. या काव्यात ३—४ फार्सी शब्द व दोन फार्सी वाक्प्रचार प्रयुक्त आहेत. याचा लेखनकाल शक १४५० ते १५०० धरणे युक्त होईल. फार्सी व दक्खिनी हिंदीच्या साहचर्याने फार्सी शब्दवाक्प्रचार मराठीत प्रविष्ट होणे शक्य होते. या उखाहरणकथेत **ला** प्रत्यय अनेकदा प्रयुक्त आहे. पाहा तयाला ( ओ. १०७ ५५६ ), मजला ( ओ. १३३, ८२६, ९०७ ). हा ग्रंथ विदर्भातील असल्याने **ला** प्रत्ययाचा **ले** करण्याची वऱ्हाडी छटा या काव्यात सढकून सापडते. पाहा चित्ररेखेले ( ओवी २०१ ), उखेले ( ८२४ ), अनोधाले ( २५७ ), मजले ( ३७३, ९०३ ), तुजले, ( ९०४ ), यादवाले ( ८२४ ), बानासुराले ( ७२७ ) इत्यादि. यावरून स्पष्ट होते की शके १५०० च्या अगोदर **ला** प्रत्ययाने उत्तम मूळ धरले होते. हा प्रत्यय फार्सीतून आला नसल्याचे कारण हेही आहे की दक्खिनी हिंदीत तो अदृश्य आहे. बद्ल—करिता, साठी स्तव हा मराठी प्रत्यय मूळ फार्सी शब्द. त्याचा अर्थ मूल्य परंतु दक्खिनी हिंदीत त्याचा अर्थ बदलला. करिता, साठी, असा. याच्या उलट मराठीत आलेले फार्सी बरेचसे, निदान लोकव्यवहारी भाषेतील सामान्य, शब्द व वाक्प्रचार दक्खिनी हिंदीच्या माध्यमाने आलेले आहेत. याचा विचार स्वतंत्रपणे करणे आहे. कविनन्दन कृत उखाहरण-कथेचा लेखनकाल अंतर्गत पुराव्यावरून शक १४५० च्या सुमाराचा आहे, असे प्रतिपादणारा माझा लेख मराठी संशोधनपत्रिका मुंबई, या त्रैमासिकात प्रसिद्ध होत आहे.

वर राजवाडे यांच्या विधानांची चर्चा केलेली आहे. मला वाटते या सर्व चर्चेत ते—पासून आणि रा या फार्सी प्रत्ययापासून मराठी ला चा विकास ही महत्त्वाची होत. यापेक्षा आणखी एक महत्त्वाचे विधान राजवाडे यांनी केले व तदनंतर सर्व मराठी भाषाशास्त्रज्ञांनी त्याचा सम्मति-दर्शक पुनरुच्चार केला. हा प्रश्न की—यत् या उभयान्वयी अव्ययाचा होय. की—यद् फार्सीतून आला असे म्हणणे संभवनीय दिसत नाही. तो फार्सी सम्पर्क पूर्वकाळात मराठीत रूढ झाला होता हे दाखविण्याचा पुढे प्रयत्न केलेला आहे हे ज्ञात्यांच्या विचारार्थ प्रस्तुत होय.

### उभयान्वयी की—यद्

राजवाडे व अन्य महाराष्ट्रीय विद्वानांनी मराठीतील उभयान्वयी की—जे ( किं, कीं ) हे अव्यय फार्सी अव्यय क्रिह पासून आले असे ठरविलेले आहे. यादवकालीन मराठी या आपल्या मराठी भाषाशास्त्रीय ग्रंथात

अनुक्रमणिका

श्री. शं. गो. तुळपुळे यांनी पृष्ठ २६६–६८ वर उभयान्वयी अव्ययांची नोंद संदर्भ ग्रंथासह दिलेली आहे. त्यात **वा किंवा** या अर्थी की असल्याचे, तसेच **अथवा** या अर्थी **का** असल्याचे सांगितले आहे. परंतु या टिपणात कोठेही की या उभयान्वयी अव्ययाचा, जे किंवा संस्कृत यद् किंवा आंग्ल दॅट या अर्थी उल्लेख केलेला नाही. ॲन ओल्ड मराठी रीडर (शक १८८२) या इंग्रजी ग्रन्थातही त्यांनी सं. यद् या अर्थी असलेल्या की या उभयान्वयाचा उल्लेख केलेला नाही. इतिहासाचार्य राजवाडे यांनी असे प्रस्तुत उपप्रस्तावनेत स्पष्ट केले आहे (पृ. ५७) की, हे की उभयान्वयी अव्यय फार्सी किह पासून मराठीत आलेले आहे. त्यांनी पृ. ५१ वर दिलेल्या फार्सी उभयान्वयी अव्ययांच्या यादीतही या 'की' चा समावेश केलेला आहे.

झूल्स ब्लोक या फ्रेंच पंडिताने आपल्या 'मराठी भाषेचा विकास' (डॉ. वा. गो. परांजपेकृत मराठी भाषांतर शक १८६३, परिच्छेद २७७) या ग्रंथात खालीलप्रमाणे निवेदन केले आहे. "फक्त अलीकडल्या काळी 'जे' (ना. प. सं. यत्) या प्रधान वाक्यानंतर येणाऱ्या अव्ययाने किंवा 'की' या अव्ययाने युक्त अशा गौणवाक्याचा एक प्रकार उत्पन्न झाला आहे. तथापी मराठींत परोक्ष निर्देश नाही.... मराठीतील की हा शब्द हिंदुस्तानी कि-शब्दावरून बहुधा घेतलेला आहे. हा हिंदुस्तानीतील कि हा सुद्धा अलीकडला शब्द आहे आणि तो परभाषेतून आला असल्याचा संशय येतो." (पृ. ३१९–२०)

ब्लोक यांनी की हिंदुस्तानी अर्थात फार्सीतून आला असे सांगितले आहे. परंतु जे (सं. यद्) देखील मराठीत की च्या नंतर आला असे त्यांनी म्हटले आहे. डॉ. मुरलीधर गजानन पानसे यांनी आपल्या ज्ञानेश्वरीची भाषिक वैशिष्ट्ये (शक १८७३) या ग्रंथात ज्ञानेश्वरीच्या ५ व्या अध्यायाच्या शब्दकोशात (पृ. २३९) 'कीं' शब्दाचा अर्थ अथवा, जे (सं. यद्) असा दिलेला आहे. परंतू त्यांनी दिलेल्या संदर्भओव्यांत जे या अर्थी 'कीं' कोठेच वापरला नाही. शिवाय डॉ. पानसे झूल्स ब्लोक व टर्नरच्या आधारे असे सांगतात की किमानपक्षी अर्थाच्या दृष्टीने हा फार्सी भाषेतून घेतलेला परकीय शब्द होय. वरील चर्चेचा अर्थ हा की, मराठी किं, कीं हे जे या अर्थी असलेले उभयान्वयी अव्यय मराठीतील नव्हे. जुन्या महानुभावकालीन मराठी साहित्यात त्याचा अभाव आहे. ते फार्सीच्या किह या अव्ययावरून मराठीत मुसलमानी राज्यकालात प्रचारात आले.

जे सं. यद् हे जुन्या मराठीत नाही हे ब्लोकचे विधान चुकीचे असल्याचे आता विद्वन्मान्य आहे. कोणत्याही महानुभावीय वा अन्य जुन्या ग्रन्थात ते कोणालाही पाहावयाला मिळेल. एवढेच नव्हे तर आता प्रकाशात आलेला आद्यतम मराठी ग्रंथ श्रीपति भट्टकृत 'ज्योतिष रत्नमाला' (रचनाकाल शक ९७२ सं. मु. ग. पानसे) या ग्रंथातही जे सापडतो (पाहा परिच्छेद जी ३८२).

डॉ. छो. र. नायक यांनी, गुजराती पर अरबी–फार्सीनी-असर, नावाचा ग्रंथ (शक १८७६) लिहिलेला आहे. त्यात पृ. ३८९–९० वर डॉ. नायक यांनी गुजरातीतील उभयान्वयी के (सं. यद्) फार्सीतूनच आला असे म्हटले आहे. ते म्हणतात–" उभयान्वयी अव्यय 'के' फारसीमाथी जे आव्यो छे. 'के' नी जग्याए जूनी गुजरातीमां 'जे' शब्द वपरातो हतो, जेनुं मूळ संस्कृत यत् छे, जेनो अर्वाचीन गुजरातीमां 'जत' पण छे; जेमके 'जत लखवानुं जे' पारसी लोको आजे पण बोलवामां घणे भागे 'के' ने बदले 'जे' नो उपयोग करे छे. सूरती लोकोनुं पण एम ज छे; जेमके :—'ते कहेवा लाग्यो जे.'

"फारसीनी असरथी अस्पृष्ट रहेला साहित्यमां गुजराती उभयान्वयी अव्यय 'के' प्रचलित न हतो; तेने बदले 'जे' वपरातो. आथी एम अनुमान उपर आवी शकाय छे के मुसलमानो साथेना संसर्गने लईने तेमनी फारसीनी असरने परिणामे 'के' ए गुजरातीमां प्रवेश कर्यो. हजी पण 'जे' नो उपयोग बिलकुल नाश पाम्यो नथी." (पृ. ३८९–९०)

मराठीच्या जडणघडणीचा व भाषाशास्त्रीय विकासाचा विचार केला तर की हे उभयान्वयी अव्यय मराठी नव्हे, ते फार्सीतून आले हा विचार कसासाच वाटतो. परंतु राजवाडे यांनी चेंडू घोळविला. ब्लोकसारख्या जाड्या विद्वानानेही तेच सांगितले. आता सर्वांचा समज असा झालेला आहे की हे अव्यय फार्सीतून मराठीने उचलले. परंतु फार्सीच्या मराठीवरील प्रभावाची चिकित्सा करताना राजवाडे यांनीही स्पष्टपणे मान्य केलेले आहे की साहित्यिक मराठी भाषेवर फार्सीचा परिणाम विशेषसा झालेला नाही. मराठी व्याकरण अबाधित राहिलेले आहे. कोणाही कवीचे काव्य पाहिले तर

काही फार्सी शब्द वापरण्यापलीकडे या प्रभावाची मजल गेलेली नाही असे दिसून येते. असे असताना या की चा मात्र शिरकाव मराठी व्याकरणात कसा झाला व तोही एका अत्यंत गुंतागुंतीच्या व संमिश्र वाक्यात, हे गूढच होय. या संदर्भात जुन्या मराठीतील निरनिराळ्या साहित्यिकांचे लेखन पाहात असता असे दिसून आले की, हे उभयान्वयी अव्यय ज्ञानेश्वरकालापासून, कमी प्रमाणात का होईना, पण मराठी भाषेत प्रचलित व प्रयुक्त आहे.

शेजारच्या भारतीय आर्य भाषाभगिनींकडूनही हे की अव्यय मराठीत येणे शक्य आहे. परंतु येथे एक गोष्ट विचारात घेण्यासारखी आहे. ती ही की मराठी भाषा शेजारील बहिणीपेक्षा अगोदर प्रौढ झालेली आहे. गुजराती, राजस्थानी, व्रज, अवधी इत्यादींमध्ये ग्रन्थरचना शक १३०० च्या सुमाराम झाली. चंदायन हा अवधी भाषेतील आद्यतम ग्रन्थ शक १२९९ त लिहिला गेला. याच्या अगोदरची रचना वरीलपैकी कोणत्याच भाषेत झालेली उपलब्ध नाही. याच्या उलट शके ९७२ मधील ज्योतिषरत्नमाला आता मराठी, इंग्रजी वाचकांच्या समोर आहे. शकाच्या तेराव्या शतकात तर मराठीने एवढी विविध व मोलवान संपत्ती संग्रहित केलेली आहे की तिला भारतीय आर्य भाषांत क्वचितच तोड मिळू शकेल.

वरील शक्यतेपेक्षा मराठी साहित्यात ह्या उभयान्वयी की चा शोध घेणे अत्यंत महत्त्वाचे आहे. या दृष्टीने माग काढीत असताना ज्ञानेश्वरी, लीळाचरित्र, शिशुपालवध व स्मृतिस्थळ या चार ग्रन्थांत किं, कीं या अव्ययाचे असे वापर पाहाण्यात आले की त्यावरून असे म्हणावेसे वाटते की जुन्या मराठीत या की ( सं. यद्, जे ) चा प्रयोग अल्प प्रमाणात का होईना पण, होत होता. की हे अव्यय वापरून वाक्य करण्याचा वारसा मराठीला संस्कृत भाषेपासूनच मिळालेला आहे. संस्कृत भाषेत यद् या अव्ययाच्या उपयोगाने दोन वाक्ये जोडण्याची प्रथा जुनी आहे. तीच प्रथा मराठीत आली. प्रथानुकरणाबरोबर यद् या अव्ययाच्या तद्भव रूपाचा वापर जुन्या मराठीच्या काळात होत राहिला. ज्योतिषरत्नमाळा, ज्ञानेश्वरी, लीळाचरित्र, शिशुपालवध पंचतंत्र इत्यादी सर्व साहित्यात जे ( सं. यद् ) चा वापर सर्वत्र आढळतो. लीळाचरित्र एकांक ११·३८, ३१·९, ६५·७; स्मृतिस्थळे देशपांडे ६७·९, १६५, ओवी ६; पंचतंत्र भावे पान ५३, ५७, ६६, २५ वगैरे. प्रश्न एवढाच आहे की, जे च्या बरोबरीने त्याच अर्थाने की या अव्ययाचा वापर यादवकालीन मराठीत दिसून येतो की काय ?

## ज्ञानेश्वरी

ज्ञानेश्वरीच्या सर्व अध्यायांतून किं कीं याचा प्रयोग केलेला दिसून येतो. माझ्या मोजणीप्रमाणे अशा वापराची संख्या १६८ आहे. सर्वांत अधिक प्रयोग १८ व्या अध्यायात केलेला आहे. ( ४१ वेळा ). तसेच की अव्ययाचा ९ व्या अध्यायातील वापर ( ३१ वेळा ) दुसऱ्या क्रमांकावर येतो. हे सर्व प्रयोग निरनिराळ्या अर्थांचे आहेत. श्री. शि. न. भावे यांनी आपल्या ज्ञानेश्वरी शब्दार्थ कोश ( शक १८७३ ) या ग्रन्थात कि, की या अव्ययाचे ५ अर्थ दिलेले आहेत ( पाहा पान १०३, १०४, ) ते अर्थ असे. १ किंवा, अथवा, २ काय ( प्रश्नार्थक ), ३ जेणेकरून, ४ कारण, ५ खरोखर ( किंवा, किल ), यात श्री. भावे यांना जे किंवा संस्कृत यद् असा अर्थ जेणेकरून या तिसऱ्या प्रकारात अभिप्रेत आहे असे दिसत नाही. ( पाहा २·३६० ) ज्ञानेश्वरीतील वरील १६८ वापरांपैकी खालील प्रयोग जे किंवा संस्कृत यद् च्या अर्थाने आहेत असे मला विचारांती वाटत आहे. ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथातील उतारे मी मराठी अभ्यासूंच्या पुढे ठेवीत आहे. त्याचा योग्य विचार होईल अशी अपेक्षा आहे.

( १ ) तो तूं किं आजि येथे । सांडूनियां वीरवृत्तितें ।
अधोमुख रुदनातें । करीतु आहासि । २·१२

( २ ) विचारीं तूं अर्जुनु । किं कारुण्यें कीजतासि दीनु ।
सांग पां अंधकारें भानु । ग्रसिला आथि । २·१३

( ३ ) बाळ बापाचां ताटीं रिगे । रिघौनि बापातें चि जेववूं
लागे । किं तो संतोषाचेनि वेगें । मुख ओडवी ।
॥ ९·१५ ॥

( ४ ) एया बोला आंतु अनंतें । लागणेयां देखिलें तेयातें ।
किं सुखावलेनि चित्तें । डोलतसे । ९·२३०

( ५ ) देऊं भोजनाचां अवसरीं । लोभें किर आठवण
करी । पैं माझी निगुती अवधारीं । किं उगा चि
बैसें । ११·५४४

( ६ ) ते अनिरूप्य किं निरूपिजे । आइकतां बुद्धी
आणिजे । वांचौनि डोळां देखिजे । ऐसें नाहिं ।
१३·१७६

( ७ ) तरि मांसालागि भूलला । व्राह्मणु पाणवाडां
रिगाला । किं तेव्हां वि तेथ लागला । आगि
जैसा । १६·४४८

(८) तैसा आपुलिया विहिता। उपाउ असे न विसंवता। ऐसा कीजे किं जगन्नाथा। आभारु पडे। १८·९०६

विद्वज्जनांनी वरील ओव्या बारकाईने पाहाव्या. वरील उदाहरणांवरून कोणालाही असे वाटायला लागेल की खरोखर येथे जे, संस्कृत यद् चाच प्रयोग की या अव्ययाच्या साधनाने केलेला आहे. प्रत्येक ओवीत दोन वाक्ये जोडलेली आहेत. एक वाक्य विशेषनः दुसरे पहिल्या विधानाच्या विशेषणरूप आहे. आज ती वाक्ये अशी होतील. (१) तू असा की अधोमुख होऊन रडत आहेस. (२) अर्जुना, तू विचार कर की तू कारुण्याने दीन बनलेला आहेस. (३) मूल बापाला जेवत्र लागले की वाग तोंड पुढे करतो. (४) या बोलण्यावरून देव ने पाहिले की तो आनंदाने डोलत आहे. (५) देव जेवणाच्या वेळी आठवण करितो, पण मी निर्लज्ज असा की मी उगाच बसतो. (६) ते असे अनिरूप्य आहे की निरोपिता, बुद्धीने जाणता, (आणि) डोळ्याने पाहता येत नाही. (७) ब्राह्मण मांसाला असा भुकला की आगीसारखा तेथे लागला. (८) तू असे वाग की जगन्नाथाला आभार पडावेत.

## लीळाचरित्र

महाइंभटविरचित चक्रधराचे लीळाचरित्र ज्ञानेश्वरीपेक्षा जुना ग्रंथ होय. त्याचे पुनः सम्पादन नंतर झाले. मुळात तो शक १२०० त रचिला गेला असे मानले जाते. त्यांत दोन स्थळे मला अशी आढळली की तेथे की उभयान्वयी अव्ययाचा उपयोग झालेला स्पष्ट रीतीने दिसून येतो. पाहा. लीळाचरित्र, भाग २ रा, पूर्वार्ध–खंड १ ला, संपादक ह. ना. नेने शक १८५८. लीळा अशा—

(१) रॉकेया लक्ष्मींद्रभटा गंडकोदक प्रसादग्रहणः ॥ एकु दीस गोसावी यांसि गुळळाः दंतधावन जालेंः पासि रांके लक्ष्मीधर भट बैसले असतिः तेंहीं गंडकोदक भीतरि घेतलेंः सर्वज्ञे ह्मणीतलेंः ऐसें उदक नेघीजे कीं घृणा नृपजैलः। ३३ (पृ. ४४)

येथे शुद्धलेखनाची किंवा पाठाची चूक लक्षात येईल. शेवटच्या वाक्यात की अव्ययाचा प्रयोग आहे. स्पष्टार्थासाठी एकच नकार पाहिजे. नृपजैल च्या ऐवजी उपजैल असा पाठ असणे आवश्यक आहे. परंतु असे अनवधानाने बोलण्याची सवय अनेकांना, विद्वानांनासुद्धा, असते. म्हणून वरील वाक्य मूलतः शुद्धच आहे. येथे की अव्ययाचा



वापर आधुनिक की–जे संस्कृत यद् सारखाच आहे हे सहज दिसून येईल.

(२) मार्गी चौरंगीविया नीरूपणः ॥ : गोसावी मार्गी बीजें करीत असति : नासीकीहुनि नीगोलीयाः वृक्षानळीं आसनः बाइसीं ह्मणीतलें : बाबाः एथ आसन किजन असिजे परि एथ उदक नाहीं : मग उपाध्यातें ह्मणीतलें : ऐसें ऐसें जा पां : परशराम बास : वटिका : इकडे : इकडे : हा नसैल : रामेश्वरबास : शोध : तथा वडिका : पाहा पां : उपाध्ये गेले : तिकडे पाहीलें : तवं उदक देखीलें : सागळ भरीली : मग ह्मणीतलें : ऐसे गा आमचे गोसावी : कीं अमूकीकडे उदक असे : ऐसें सांघनी ना कां : ॥ १ (पृ. ५७).

शेवटच्या वाक्यातील कीं या अव्ययाचा उपयोग केवळ आजकालच्या मराठी की–यत्च्या उपयोगासारखाच आहे हे सहज दिसून येईल. स्व. नेने यांनी लीळाचरित्र एकांकाच्या सम्पादनात व्याकरणविषयक टिपणे दिली आहेत. पृ. ९५ वर ते जे अव्ययासंबंधी म्हणतात—

"येथे 'जे' हे उभयान्वयी अव्ययासारखे आहे. त्याचा अर्थ आधुनिक 'की' सारखा असून, त्यापुढील येणारे वाक्य 'नामवाक्य' असते व ते मुख्य वाक्यावर अवलंबून असते. 'अहं न ज्ञानामि यत् एतानि तव पुस्तकानि' (संस्कृत); मला माहीत नाही की ही तुझी पुस्तकें आहेत." नेने यांनी लीळा ११ ओळ ४४ ची चर्चा केली आहे. परंतु आणखी पाहा लीळा ३३, ओळ ९, लीळा ६५ ओ ७. जे संबंधीवर नेने यांनी जे लिहिले तेच की अव्ययालासुद्धा लागू आहे. परंतु नेने यांनी लीळाचरित्रात की प्रयुक्त झाल्याचे सांगितले नाही.

## शिशुपालवध

बोरीकर भास्करभट्टांनी शिशुपालवध काव्य शक १२२७ त लिहिले असे मानले जाते. या काव्यात दोन स्थळी की अव्ययाचा वापर जे–यद् या अर्थी केल्याचे दिसून येते. ओव्या पुढीलप्रमाणे होत.

(१) तुमतें एनां देखिलें : किं माझां जीवीं भुव गेलें: काइ सांघाल उरैलें : तें जाणों ना १२५

(२) आपलेनि रागीटपणें : जगो होनि भांडों कीं मातें म्हणति एणें : लाडकै केलों १२९

पहिल्या ओवीत द्वारकानिवासी उद्धवाने नारद येत असलेला पाहिले की त्याच्या जिवात भय केले. इतके–

पाहणे आणि जिवात धस होण्याचा संबंध की अव्ययाने व्यक्त केलेला आहे. दुसऱ्या ओवीत नारदाची सफाई अशी आहे की हे लोक नारदाला म्हणतात की त्याने लावालावी (लावकी–कै) केली. वरील दोन्ही ठिकाणी की चा प्रयोग आजकालच्या उपयोगासारखा आहे हे दिसून येईल.

**स्मृतिस्थळ**

स्मृतिस्थळाच्या रचनाकालासंबंधाने मतभेद असले तरी तो शक १२३० च्या आगेमागे रचिला गेला असे श्री. शं. गो. तुळपुळे यांनी मानले आहे. या पुस्तकातील भाषा केवळ जुनी व यादवकालीनच आहे, यात वाद मुळीच नाही. त्यात फार्सी शब्द मुळीच आलेला नाही. व्याकरणदृष्ट्या भाषा केवळ जुनीच आहे : एका स्मृतीत की अव्ययाचा उपयोग जे–यत् सारखा झालेला दिसून येतो. ती सगळी पुढे दिली आहे.

" महात्मा–उदक–प्रदानिं बोडिः गंगा विभेद–निरूपणः ॥

एक दीं भटोबासांसिं तृषा लागलि : एकांते उदक मागीतलें : तवं तेहीं थीलरीचे उदक गाळूनि आणिलें : भटोबासां संपादीलें : भटोबासीं घेतलें : मग म्हणितलें : मज पाजिलें ऐसें आणिकासी न पाजावें हो : तवं तेहीं म्हणितलें : भटो : बोडि गंगा समान सांधितलें किं : भटोबासीं म्हणितलें : तें आपणयासि : पुढीलासि संपादितां बोडि ते बोडिचि : गंगा ते गंगाचि : ऐसी बुद्धी हो आवी किं : भावें हीन तें दैवें हीन : ॥ २८ ॥" (स्मृतिस्थळ – वा. ना. देशपांडे, शक १८८८, पृ. ११).

येथील की चा प्रयोग जे–यत् या स्वरूपाचा होय.

मराठी भाषेच्या विकासासंबंधी ते–पासून, फार्सी रा पासून ला प्रत्ययाचा विकास आणि उभयान्वयी की अव्ययाचा उद्गम याविषयी मांडलेले विचार विद्वानांच्या चित्ताकर्षणास पात्र ठरतील अशी आशा वाटते.

●●●

## साभार-स्वीकार

**दक्षिणा** (टीकालेख)— रा. श्री. जोग, कॉंटिनेंटल बुक सर्व्हीस, पुणे २; ५ रु.

**मराठी कविता**– (काव्य समालोचन १९४५–६५) रा. श्री. जोग, प्राप्तिस्थळ-मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; २ रु.

**केतकरी कादंबरी**— दुर्गा भागवत, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १० रु.

**वाङ्मयीन निबंध लेखन** (स्वरूप आणि साधने)– रा. ग. जाधव, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३–५० रु.

**पोर्तुगेज-मराठे संबंध** — पांडुरंग पिसुर्लेकर, पुणे विद्यापीठ, पुणे ७; १२ रु.

**कवि वामन पंडिताविषयी नवीन माहिती**— वि. अं. कानोले, गोदातीर इति. सं. मंडळ, नांदेड; ४ रु.

**श्री. विंगुळिका अर्थात विंगुळी स्तोत्र**— संपा. चंद्रकांत निंभोरकर, महानुभाव विश्वभारती, नांदगाव-खंडेश्वर, १ रु.

**रविवारची चिंतनिका**— ह. रा. महाजनी, साधना प्रकाशन, पुणे २; १० रु.

**आग्नेय आशियातील संघर्ष**— अनु. हमीद दलवाई, जनपद प्रकाशन, मुंबई ४; ३ रु.

**वाद आणि लवाद**—दि. म. टण्णू, सविता टण्णू, टिळक रोड, औरंगाबाद; ३ रु.

**जीवनचक्र** (आत्मकथा व लेख)— बाळासाहेब पाटील, अशोक पाटील, कोल्हापूर; ६ रु.

**सेनापति बापट** (समग्र ग्रंथ खंड ३)— संपा. जीवन, किर्लोस्कर आणि इतर तिघे, वा. पां. बापट, मुंबई २८; १० रु.

**दक्षिण दर्शन**— भाऊ मांडवकर, सिंधु मांडवकर, अमरावती २; ४ रु.

**फुलवंती** (कादं.)— बलराम नागरे, गं. रा. पाठक, ३ सदाशिव, पुणे २; ४ रु.

# श्री. टी. पी. कैलासम्

◆ गणेश चिंतामण वझे ◆

विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात सुप्रसिद्ध भारतीय मल्ल गामा हा कुस्तीगीरांचा संघ घेऊन इंग्लंडला गेला होता. त्या संघातील अहम्मदबक्ष नावाच्या मल्लाने, जॉन लेम्म या विख्यात स्विस मल्लाला पराभूत केले आणि कुस्तीचे जाहीर आव्हान दिले. फ्रँक गॉच हा पर्वतप्राय मल्ल पुढे सरसावला पण अहम्मदबक्षाची ताकद आणि डावपेचावरचे प्रभुत्व पाहून तेथे हजर असलेल्या युरोपियन धेंडांनी गॉचला लढतीपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. तो ऐकत नाहीसे पाहून ,' हेल्थ ॲण्ड स्ट्रेंग्थ ' या मासिकाच्या संपादकाने ती लढत आणि परिणामी एका युरोपियनाचा होऊ घातलेला पराभव टाळण्याच्या हेतूने शंभर पौंडांची भारी पैज (कुस्ती हरणाऱ्याने तेवढी रक्कम द्यावयाची ही अट ) लावली आणि गॉचच्या वतीने तेवढी रक्कम तेथल्या तेथे स्वतःच भरली. गरीब भारतीयांच्या वतीने तेवढी रक्कम कोणी देणार नाही असा त्याचा कयास होता; व तो खराही ठरला ! भारतीय संघाच्या व्यवस्थापकाने दुसऱ्या दिवशीचा वायदा केला, अर्थातच तो मान्य करण्यात आला नाही.

त्या वेळी प्रेक्षकांतून एक भारतीय तरुण पुढे आला आणि प्रथम आपल्या खिशातली होती नव्हती तेवढी रक्कम टोपीत टाकून, ती त्याने प्रेक्षकात फिरवली आणि मदतीसाठी आवाहन केले. थोड्याच वेळांत शंभर पौंड उभे करण्यात त्याने यश मिळविले ! अर्वाचीन कन्नड रंगभूमीचे नवसंप्रदाय प्रवर्तक म्हणून नंतर मान्यता पावलेले श्री. त्यागराज परमशिव कैलासम् हे त्या तरुणाचे नाव !

कैलासम् यांचा जन्म २९ जुलै १८८५ रोजी बंगलूर येथे झाला. ते मूळचे तामीळ. पण त्यांचे बाल्य बंगलूर, म्हैसूर व शुद्ध कन्नडबद्दल ख्याती असलेल्या हासन येथे व्यतीत झाल्याने व कोणतीही भाषा चटकन आत्मसात करणे बालपणी सुलभ असल्याने, कन्नड भाषेवर त्यांनी लवकरच प्रभुत्व संपादन केले. पण त्यात परिस्थितीपेक्षा बहुभाषिकत्वाच्या त्यांच्या गुणाचाच प्रत्यय अधिक येतो. कारण पुढे तरुणपणी त्यांनी इंग्रजीवर कन्नडपेक्षाही प्रभुत्व संपादन केले. आणि तीत साहित्यनिर्मितीही केली. संभाषणाच्या ओघात ' शाकुंतल ', ' नीतिशतक ' वगैरेंतील ( अवतरणे ) देण्याइतका त्यांचा संस्कृतचा अभ्यास होता. शुद्ध उर्दू ते अस्खलितपणे बोलत. केरळमध्ये त्यांचे वास्तव्य उणेपुरे सहा महिनेच घडले असेल, पण तेवढ्या अवधीत मल्याळी काव्यरचना करण्याइतकी त्यांची प्रगती झाली होती. ' It's long long way to Triperary' या प्रसिद्ध इंग्रजी युद्धगीतावरून रचलेल्या ' तिपारळि बलुदूर ' ह्या त्यांच्या कन्नड विडंबनात्मक गीताचा प्रथमावतार मल्याळीतच झाला होता.

कोणतीही भाषा चटकन आत्मसात करताना, व्याकरणशुद्धतेपेक्षा आत्मप्रकटीकरणाचे एक माध्यम ह्या दृष्टीनेच ते पाहात. किंबहुना लोकजीवनाशी समरस होण्याच्या त्यांच्या स्वभावाचा तो भाषाभ्यास हा एक अपरिहार्य भागच होता. सुप्रतिष्ठित कुळात जन्म झालेला असूनही तारामंडळ पेठेतील कामगारांची मुलेच त्यांचे बालपणचे सवंगडी होते. पुढे लंडनमध्ये ' रॉयल कॉलेज ऑफ सायन्स ' मध्ये विद्यार्जन करीत असता, तेथील सर्व सामान्यांशी ते इतके तद्रूप झाले की अस्सल कॉकनीच वाटावेत.

जीवनदर्शनाशी निकटचा संबंध असलेल्या नाट्यकलेचे त्यांना पराकाष्ठेचे वेड होते. इंग्लंडमधील सहा वर्षांच्या वास्तव्यात नाटकाच्या तिमाही हंगामात प्रत्येक दिवशी कोणत्या ना कोणत्या नाट्यप्रयोगाला त्यांची हजेरी असे, व त्यासाठी इतर नऊ महिने पोटाला चिमटा घेऊन एखाद्या कृपणासारखे त्यांना रहावे लागे.

नाटकाप्रमाणे संगीताचीही त्यांना विलक्षण गोडी होती. त्यांचा आवाजही पहाडी व खणखणीत होता. कर्नाटकी आणि उत्तर हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचा अभ्यास त्यांनी केला होता. मैफलीनंतर संधी मिळताच गवयाशी चर्चा करण्याइतकी त्यांना त्यात गती होती. इंग्लंडमध्ये असताना पाश्चात्त्य संगीताचा अभ्यासही त्यांनी केला.

श्री. कैलासम् हे मोठे क्रीडाप्रेमी होते. व्यायामाने त्यांनी आपले शरीर चांगले कमावले होते. क्रिकेट, हॉकी,

अनुक्रमणिका

फुटबॉल हे पाश्चात्त्य खेळ ते चांगले खेळत. थट्टेखोर स्वभाव आणि विनोदाची उपजत देणगी त्यांना लाभली होती. ह्या गुणसमुच्चयामुळे सर्व थरांतील मित्रांचे सौहार्द त्यांना अपरंपार लाभले. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या चरित्र-विषयक, ' कैलासम् यांच्या स्मृति ' ( प्रसिद्ध न्यायामपट्ट श्री. के. व्ही. अय्यर ) ' कैलासम् यांच्या आठवणी ' ( प्रा. जी. पी. राजरत्नम् ) ' मी पाहिलेले कैलासम् ' ( श्री. कंदाडे कृष्ण अय्यंगार ) ' आर्य कैलासम् ' ( त्यांच्या मित्राची पत्नी ) इ. पुस्तकांवरून आणि आ. न. कृष्णराव, के. शिवराम, प्रा, व्ही. के. गोकाक, डॉ. रं. श्री. मुगळी, कविवर्य द. रा. बेन्द्रे वगैरेंनी त्यांच्यावर लिहिलेल्या लेखां-वरून, त्यांच्या लोकप्रियतेची आणि वाङ्मयीन महनीयतेचीही साक्ष पटते.

भारतातच नव्हे तर लंडनच्या त्यांच्या सहा वर्षांच्या वास्तव्यातही त्यांच्या लोकसंग्रहाचा हा गुण प्रकट झाला. तेथील अभ्यासक्रम संपल्यावरही त्यांच्या मित्रांनी आपापल्या खर्चाने सहा महिने आग्रहाने त्यांना ठेवून घेतले. अशा तऱ्हेने ' काव्यशास्त्रविनोदां 'त काळ घालवितानाही. ज्या भूगर्भशास्त्राच्या अभ्यासासाठी ते तेथे गेले होते, त्याकडे किंचितही दुर्लक्ष त्यांनी केले नाही. भूगर्भशास्त्राच्या परीक्षांत त्यांनी पहिला वर्ग आणि विशेष प्रशस्ती मिळविली ते मायभूमीला परतले आणि मोठ्या सरकारी नौकरीत रुजू झाले.

कैलासम् यांचे वडील श्री. परमशिव प्रथम रसायन-शास्त्राचे प्राध्यापक, नंतर काही काळ असिस्टंट कमिशनर व शेवटी म्हैसूरच्या चीफ कोर्टात न्यायाधीश म्हणून काम पाहात होते. ते स्वभावाने गंभीर आणि जमदग्नीसारखे तापट होते. वयाच्या पन्नासाव्या वर्षीसुद्धा कैलासम् त्यांना एखाद्या लहान मुलाप्रमाणे घाबरत; मात्र ती भीती आदरयुक्त होती.

कैलासम् यांचे चुलते श्री. सदाशिव अय्यर, मद्रास-हायकोर्टाचे न्यायाधीश होते. स्वभावाने अती ऋजू, सौम्य आणि वात्सल्यपूर्ण. माहिती नसलेल्यांना त्यांच्या बाह्य अवतारावरून त्यांच्या थोर पदाची कल्पना येणे केवळ अशक्य. दरिद्री ब्राह्मण समजून एकदा वैदिकी कार्यासाठी त्यांना रात्रविण्यात येऊन, दक्षिणेप्रीत्यर्थ चार आणे देऊन त्यांची बोळवण करण्यात आली होती. त्या धर्मात्म्याला त्याचे वैषम्य तर वाटले नाहीच, उलट ' स्वभावजन्य ' कर्म करून मिळालेले ते अत्यल्प द्रव्य आपल्या लठ्ठ पगारापेक्षा त्यांना अधिक मोलाचे वाटले. कैलासम्‌चे वडील म्हणत, ' मला केवळ सदाशिव अय्यरचा भाऊ म्हणून ओळखले तर पुरे आहे. ' श्री. कैलासम् यांचा आपल्या ह्या प्रेमळ चुलत्याकडे फार ओढा होता. आपले ' कर्ण ' हे इंग्रजी नाटक त्यांनी त्यांनाच अर्पण केले आहे.

श्री. कैलासम् यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीत त्यांचे वडील आणि चुलते यांच्या बरोबरीने किंबहुना काकणभर अधिकच मोठा वाटा त्यांच्या आईचा—कमलम्मांचा होता. आपल्या नाटकात त्यांनी जेथे जेथे मातेचे चित्रण केले, तेथे तेथे, ' त्याग, परिशुद्ध जीवन आणि आस्तिकता यांचा त्रिवेणी संगम म्हणजे आई ' अशी जी वाङ्मयीन श्रद्धांजली वाहिली आहे, ती त्यांच्या आईवरील प्रेमाचे खरेखुरे स्मारक म्हणावे लागेल.

इंग्लंडहून परतल्यानंतर, बंगळूरला सरकारी नोकरीत असताना ' टोळ्ळुगट्टी ' (पोकळ आणि घट्ट) हे त्यानी पहिल्या प्रतीचे पहिले नाटक लिहून आपल्या साहित्यसेवेचा शुभारंभ केला. शैक्षणिक विषयावरचे ते नाटक परीक्षकांच्या मते उत्कृष्ट ठरून त्यास ' नरसिंहराज पारितोषिक ' देण्यात आले. तत्पूर्वीच ते ' हौशी नाटक मंडळीचे ' सदस्य झाले होते आणि त्या मंडळीच्या नाटय प्रयोगात लहान मोठ्या भूमिकाही करू लागले होते. त्यांच्या पहिल्या नाटकाचा जन्मही त्या ' मंडळीतर्फे ' ठेवण्यात आलेल्या नाटय-लेखन स्पर्धेसाठी झाला होता. पण तो हौसेखातर नट बनण्याचा मामला ' कानामागून येऊन तिखट ' ठरला. आणि परिश्रमपूर्वक केलेला विज्ञानाचा, विशेषतः भूगर्भ-शास्त्राचा अभ्यास जीवनोपयोगी व्यवसाय म्हणून फार काळ कारणी लागला नाही.

अर्थार्जनाच्या उद्देशाने त्यांनी कोणताही व्यवसाय न केल्याने, नंतरचे त्यांचे सर्व आयुष्य आर्थिकदृष्ट्या दुस्तर गेले. एका पत्रात ते स्वतःच त्याचा उल्लेख करतात. '.....my permanently penury-paved path in life eggs me on, stifing any qualms o delicacy my mind may feel !.....' मात्र आर्थिक-दृष्ट्या जीवनाची परवड झाली असली तरी अंतर्मुख वृत्तीमुळे त्यांचे जीवन ' शोधिले ' जात होते. प्रा. गोकाक यांनी त्यांना उद्देशून लिहिलेल्या ' साक्षिक ' या कन्नड कवितेत म्हटले आहे.

" ...आणि प्रलयंकर स्मशानवासी रुद्राप्रमाणे तू सर्व मायापाश भिरकावून दिलेस आणि प्रपंचावर,

संसारातील कौटुंबिक सुखदुःखांवर निखारा ठेवलास!... हातात जळती सिगारेट, जवळ पिण्याकरिता आंबट ताकाचा एक खुजा, जे कोणी विचारपूस करणारे भेटतील त्यांच्याकडे खायला मिळतील ते दोन घास आणि पडायला मिळेल ती जागा...तुझे सारे लक्ष अंतरात्म्यावर खिळलेले आहे आणि तो तुझा अंतरात्मा आपल्या दिव्य चक्षूने अखिल मानवतेच्या रक्तबंबाळ हृदयाचे, विश्वातील गूढ सत्याचे दर्शन घेण्यात मग्न झाला आहे...तुझे ते गडगडणारे विशाल आणि चिरंजीवन हास्य! कुसुमकोमल आणि वज्रकठोर अशा तुझ्या हास्याने आम्ही स्तिमित होऊन त्यापुढे नम्र होत असू. हे श्रेष्ठ नाट्याचार्य, हे नटराज!... रंगदेवतेच्या समोर वेदीवर आपल्या वैयक्तिक सुखदुःखांचा होम करून तू केवळ एका तटस्थ प्रेक्षकाची साक्षित्वाची भूमिका पत्करलीस व अनासक्ती योग आचरणाऱ्या निर्लिप्त स्थितप्रज्ञाची कृतार्थता प्राप्त करून घेतलीस."

त्यांची जीवननौका ह्या आमूलाग्र क्रांतीच्या वादळात सापडली असताना पंडित तारानाथांनी त्यांना मार्गदर्शन केले आणि त्यांच्या सुप्त शक्तींना योग्य वळणाने मुखर होण्याला मदत केली. श्री. कैलासम् पंडित तारानाथांना 'मास्टर' असे संबोधीत. त्यांच्याकडे जाताना ते भेटीदाखल फुले घेऊन जात. आणि भोवती कितीही लोक असोत, ते तारानाथांना साष्टांग प्रणिपात करीत. तुंगभद्रेला योगी तारानाथांच्या 'प्रेमायतन' आश्रमात कैलासम्नी 'एकलव्या' वरच्या नाटकाचा बराचसा भाग लिहिला. ते नाटक त्या आश्रमाच्या पत्रिकेत प्रथम प्रसिद्ध झाले. त्याला व इतर एक दोन नाटकांना पं. तारानाथांनीच प्रस्तावना लिहिल्या आहेत. कैलासम् यांच्या नाटकातून मातृभक्तीप्रमाणे उज्ज्वल गुरुभक्तीचे जे ओजस्वी दर्शन होते त्याचे अधिष्ठान पं. तारानाथांबद्दल असणारा त्यांचा भक्तिभाव होता असे म्हणता येईल.

म. गांधी कैलासम् यांचे आणखी एक पूजास्थान. त्यांच्या तापसी जीवनक्रमाबद्दल त्यांना गाढ आदर होता. म. गांधी म्हणजे जगाची एक तारक संजीवनी असून, कोणकोणत्या चिजांनी ती बनते त्याची 'कृती' कवी सांगतो आहे, अशी कल्पना करून त्यांच्या व्यक्तिमत्वाचे विशेष त्यांनी एका सुंदर इंग्रजी कवितेत ग्रंथित केले आहेत. कवितेचे शीर्षक आहे, 'The Recipe'. तिच्या सुरवातीच्या काही ओळी अशा :—

'Into a bare handful of bone and skin
Pour just an ounce or so of flesh and blood,
Put in a heart love-full as sea in flood
Likewise a mind sea-deep and free from sin.—'

त्यांची कोणावर वा कशावर भक्ती जडली म्हणजे तिची जशी परमावधी व्हावयाची, तसाच प्रकार रोजच्या व्यवहारातील त्यांच्या आचरणाच्या बाबतीत आढळून येई. खाऊ लागले तर बकासुराला आणि उपवास करू लागले तर एखाद्या रुक्मांगदाला मागे टाकतील! मद्यपान करू लागले म्हणजे तोच प्रकार. उलट दिवसच्या दिवस मद्याची आठवणही होत नसे. एखाद्या ठिकाणी ते स्थिर राहतील असा नेम नसे. आज बंगलूरला तर उद्या मुंबईला, असा त्यांचा खाक्या असे.

अशा वागण्याने त्यांच्यासारख्या कणखर आणि व्यायामाने कमावलेल्या शरीराचाही फार काळ टिकाव लागला ना! त्यांच्या अनियमितपणाचा त्यांच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम न होण्याचे कारण मुख्यतः त्यांची जबर इच्छाशक्ती हे तर होतेच, पण खंबीर मनोबलाबरोबरच कृष्णन् नावाच्या त्यांच्या घरच्या स्वयंपाकी मुलाने त्यांची फार काळजी वाहिली म्हणून कोणत्याही व्याधीचा उपसर्ग त्यांना फारसा पोचला नाही, हेही खरे आहे. ते बंगलूरमध्ये कोठेही राहात असोत, कृष्णन् त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था जातीने करी, येवढेच नव्हे तर कैलासम् यांच्या वडिलांकडून त्याला मिळणारा पगार तो प्रसंगी कैलासम् यांच्यासाठी खर्च करी.

स्वतः कैलासम्नी दुःखाचे जे हालाहल पचविले होते त्याचे प्रदर्शन तर राहोच, उलट अभावितपणेही त्याचा कोणाला पुसटही सुगावा लागू नये यासाठी जणू ते मर्कटचेष्टा करण्यात मग्न असत. स्नायूंचे स्वयंचलन, धूम्रवलयांचे खेळ, (स्वतःची सही धूम्रवलयांनी करणे इत्यादी) इंग्रजी गाणी कर्नाटकी संगीताच्या धर्तीवर व कन्नड गाणी इंग्रजी संगीताच्या धर्तीवर म्हणणे, हेब्बार अय्यंगार तामीळ कसे बोलतात आणि तामिळ अय्यंगार कन्नड कसे बोलतात ह्याचे साभिनय प्रात्यक्षिक करणे, तसेच चेट्टियार, ख्रिस्ती धर्मोपदेशक यांच्या नकला करणे, विनोदी कविता उत्स्फूर्त रचून म्हणणे, असले चाळे सदैव चालू असत.

व्यायाम करताना तोंडे वेडीवाकडी करणाऱ्या व्यायामशाळेतील एका मुलाला त्यांनी सांगितले होते, 'शरीर मारुतिरायासारखे करण्याचे उद्दिष्ट ठेवायचे, तोंड नव्हे!' सदा उदासीन असलेल्याला उद्देशून he is never

happy unless he is miserable असे उपरोधाने म्हणून किंवा come, let us be miserable असे चेष्टेने म्हणून त्याची कळी खुलविण्याचा प्रयत्न ते करीत. हास्यविनोदाच्या अखंड निर्मितीत ते स्वतःलाही वगळत नसत. 'T. P. Kailasam ह्या आपल्या नावाचा 'टिपिकल् अॅसूम' असा उच्चार ते करीत. आपल्या नाट्यसाहित्यातही स्वतःचेच एक हास्यजनक शब्दचित्र त्यांनी काढले होते. 'गुंडू' हे त्यांच्या नाटकातील ते पात्र. अपरे नाक, नाकावर चष्मा, अंगावर धाणेरडे कपडे, अशी आपल्या चेहऱ्यामोहऱ्याशी जुळणारी वळी रंगवून हास्यनिर्मितीकरता स्वतःलाच त्यांनी खर्ची टाकले आहे. ते पात्र नाटकात स्वतःचाच 'कर्नाटक-प्रहसन-प्रपितामह पंडित-मंडलाग्रेसर चंडप्रचंड गुंडुराय' असा उल्लेख करून स्वतःच गळ्यात हार घालून घेई. १९१६ ते १९३० ह्या काळात वैभवात असलेली त्यांची 'हौशी नाटकमंडळी' तेलगू नाटकाच्या वेळी, 'डी. कृष्णम्माचारलु' ह्यांच्या फोटोला हार घालून एक गीत म्हणत असे. त्यात 'आंध्र-नाटकपितामह' असा त्यांचा स्तुतिपर उल्लेख असे. त्याच चालीवर चेष्टेखातर उपरोक्त उल्लेख होता! यावरून 'कन्नड-प्रहसन-प्रपितामह-गुंडू' ही पदवी त्यांना कायमची चिकटली. त्या विनोदी-नामाभिधानावरूनही कन्नड नाट्य-साहित्यातील त्यांच्या स्थानाची कामगिरीची कल्पना येते, त्यांच्या विनोदाचे 'लक्ष्य' अनिष्ट रूढी, समाजातील भ्रामक कल्पनेमुळे उत्पन्न होणारे दुःख हे असे. गडकऱ्यां-प्रमाणे त्यांनाही शाब्दिक कोट्यांचा आणि अनुप्रासांचा हव्यास होता. त्यांच्या उपहास उपरोधापुढे प्रतिपक्षाला टिकाव धरणे कठीण जाई! 'रामराजु' नाटकातील एका गीताचे त्यांनी केलेले विडंबन इतके मर्मभेदक होते की, त्यानंतर त्या नाटकाचा प्रयोग होणे बिकट झाले म्हणतात. त्यांच्या त्या शक्तीमुळे 'कन्नड साहित्यातील व्हॉल्टेअर', असे त्यांना संबोधीत असत.

त्यांच्या प्रकाशित वाङ्मयात अठरा कन्नड नाटके, एक कन्नड कथासंग्रह, दोन कन्नड कविता, चार इंग्रजी नाटके, एक इंग्रजी एकांकिका व कवितासंग्रह इतका संभार आहे. ही सारी रचना बोलता बोलता प्रगट झाली. त्यांचा सारा भर लेखणीपेक्षा 'वाणी' वरच होता असे म्हटले पाहिजे. त्यामुळे त्यांची पुष्कळशी रचना वाऱ्यावर उडून गेली. त्यांच्या 'वाङ्मयनिर्मितीच्या' ह्या वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीबद्दल डॉ. रं. श्री. मुगळी म्हणतात,–'कोणाशी तरी बोलताना कुठली तरी सामाजिक समस्या किंवा रामायण महाभारतातील प्रसंग यांची आठवण निघाली की, ज्या-प्रमाणे वेषभूषा घालून तयार झालेले नट द्रुतगतीने रंग-भूमीवर येऊन अभिनय सुरू करतात त्याप्रमाणे कैलासम् हे नवीन नाटकाचा तेथल्या तेथे साभिनय प्रयोग करून दाखवीत. त्यांची ही शक्ती असाधारण होती. अर्थात मागाहून ते नाटकात थोडी दुरुस्ती करीत. एखादे नाटक किंवा त्याचा थोडा भाग त्यांनी बसुन लिहिला नाही असे नाही. पण ते अपवादादाखलच.' यासंबंधीची जी. पी. राजरत्नम् यांनी 'कैलासम् नेनपु' मध्ये नमूद केलेली एक आठवण त्यांच्या लेखनपद्धतीवर प्रकाश टाकणारी आहे. 'कर्ण' नाटकातील द्रौपदीवस्त्रहरणाच्या प्रसंगादरील प्रवेश रंगवत असता ते द्रौपदीवस्त्रहरणच विसरले! प्रवेश संपला असे म्हटल्यावर ती 'उणीव' ध्यानी आणून देण्यात आली, तेव्हा ते उद्गारले "That fool of Karna started up to protect the honour of that chit and between them took the scene off my hands."

त्यांच्या अप्रतिहत वाणीच्या प्रवाहाने ऐकणारा स्तिमित होऊन जाई! लघुलिपिलेखकालाही उतरवून घेणे शक्य होत नसे, इतक्या वेगाने तो वाहात असे! डॉ. राधाकृष्णननी 'कैलासम् म्हणजे विचारांचा नायगारा आहेत,' असे उद्गार एकदा पं. तारानाथांपाशी काढले होते. विचारांच्या नायगाऱ्याची ही वाङ्मयसंपत्ती योज-नेच्या अभावी फुकट वाहून जाताना पाहून स्वाभाविकच श्री. डी. व्ही. गुंडप्पांनी त्यांना विचारले, 'Do you believe you are immortal ?' त्यावर त्याबाबत 'ना खंत, ना खेद' असलेल्या कैलासम्नी उत्तर दिले, 'I beleve in the luck of posterity!'

अशा या थोर पण विक्षिप्त प्रतिभावंताची लोक आणि टीकाकार यांच्याकडून प्रथम बरीच उपेक्षा झाली. शेवटी शेवटी मात्र त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव साहित्यप्रेमी करू लागले. 'कैलासम् काव्योत्सव' साजरा करण्यात येऊन सात विद्वानांनी त्यांच्या साहित्यविषयक कामगिरीच्या विविधांगी पैलूंवर व्याख्यानमालाही गुंफली. कैलासम्ना जेव्हा हे कळले तेव्हा त्यांनी, 'कैलासम् ह्या व्यक्तीकडे लक्ष न देता घरीदारी दिसणाऱ्या ज्या सातूपातू सारख्यांच्या दुःखांना आपण वाचा फोडली; त्यांच्याकडे अधिक लक्ष

पुरविण्यातच आपला गौरव व्यक्त केल्यासारखा आहे,' अशी आपली प्रतिक्रिया कळवली.

कैलासम् यांच्या अनिच्छेला न जुमानता कन्नड साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांना निवडण्यात आले (१९४५). ते संमेलन मद्रासमध्ये भरले होते. अध्यक्ष, स्वागताध्यक्ष व उद्घाटक, श्री टी. पी. कैलासम्, श्री. राजगोपालाचारी आणि श्री. मास्ती व्यंकटेश अय्यंगार हे सारे तामिळ होते, हे उल्लेखनीय आहे.

अध्यक्षीय भाषणात हास्यरसाच्या या महान ठेकेदाराने विनोदाची महती आवर्जून गायिली. मात्र ' विनोदाची नौका पुष्कळदा हास्याच्या उथळ पाण्याच्या जागेकडून अश्रूंच्या सागराकडे वळते. ' ( The barque of humour often veers from shoals of smiles to seas of tears ) असा इशाराही त्यांनी दिला.

कैलासम् यांच्या जीवनप्रवाहाला वरील उक्ती लागू पडते. सुरवातीचे विद्यार्थीदशा संपेपर्यंतचे त्यांचे आयुष्य हेवा वाटण्याइतके सुखी होते. प्रि. व्ही. के. गोकाकनी म्हटले आहे, ' सुखसमृद्धीच्या मांडीवर तू वाढलास. लक्ष्मीच तुझा पाळणा हलवीत होती. ' आईच्या मृत्यूने त्याला तडा गेला. नंतर दोन भाऊ वारले. उत्तर आयुष्यात वडिलांचे निधन होऊन तोही आधार तुटला. दोन मुलींच्याशिवाय जवळचे कोणी उरले नाही. आर्थिक स्वास्थ्याकडे त्यांनी पाठ फिरविली होतीच. त्यातच मद्रासला ज्या चित्रपटाचे लेखन, दिग्दर्शन सारे काही त्यांनी केले होते, तो चित्रपटही साफ पडला. त्यानंतर रामगोपाळबरोबर अमेरिकेला जाण्याचा ठरत असलेला बेत रहित झाला! हे सारे सहन करायला विनोदाबरोबर खंबीर जीवनविषयक तत्त्वज्ञानाची जोड होती. जीवनविषयक तत्त्वज्ञानाबद्दल त्यांना कोणी प्रश्न केला असता त्यांनी रुड्यार्ड किप्लिंग च्या ' If ' ह्या कवितेचा उल्लेख केला होता.

स्वतःच्या मृत्यूची चाहूलही त्यांना लागली असावी. १९४६ च्या नोव्हेंबर महिन्यात कैलासम् ' मूळ ठिकाणी ' परतणाऱ्या पक्ष्याप्रमाणे बंगळूरला परत आले. २३ नोव्हेंबरच्या आदल्या रात्री इष्टमित्रांशी ते नेहमीप्रमाणे बसले, बोलले आणि रात्री झोपी गेले. दुसरे दिवशी सकाळी हा विचारांचा नायगारा, देहाने पहेलवान, राहणीने अवधूत; मुखवटा विदूषकाचा पण भोगवटा कलावंताचा; व्यवसाय-शिक्षणाने भूगर्भशास्त्रज्ञ पण वृत्तीने आकाशाकडे नजर लावलेला थोर कवी; भारतीय संस्कृतीचा उद्गाता पण ' स्वदेशात परकीय ', चिरविश्रांतीच्या ओढीने काळाच्या कराल दाढेत लुप्त झालेला दिसला!

◆ ◆ ◆

## साभार-स्वीकार

**हरवले ते** ( कादं. )— उद्धव शेळके, कॉंटिनेंटल प्रकाशन. पुणे २; ६ रु.

**मृत्युंजय** ( कादं. )— शिवाजी सावंत, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; १५ रु.

**खळाळ** ( कथा )— आनंद यादव, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ६–२५ रु.

**मळणी** ( कथा )— रा. रं. बोराडे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ६ रु.

**मनोरा** ( कविता )— पद्मा लोकूर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४ रु.

**संध्याकाळच्या कविता**— ग्रेस, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३ रु.

**रानातल्या कविता**— ना. धों. महानोर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३ रु.

**मंगललहरी** ( कविता )— बालमुन, गो. वा. चीडकर, कुंथलगिरी; १–५० रु.

**वाजे पाऊल आपुले** ( नाटक )— विश्राम बेडेकर, साधना प्रकाशन, पुणे २; ३–५०

**पराभव** ( नाटक )— बाळ भाटे, के. वा. जोशी, पुणे २; ३ रु.

**वाऱ्यात मिसळले पाणी**— बाळ कोल्हटकर, के. वा. जोशी, पुणे २; ४ रु.

**वेड लागले राधेला** ( नाटक )— सुधाकर देवस्थळी, के. वा. जोशी, पुणे २; ३ रु.

**जावई** ( तीन एकांकिका )— मारुती दांडेकर, के. वा. जोशी, पुणे २; २ रु.

**प्रकाश योजना व नेपथ्य रचना**— डेरेक जेफेरिस भाषांतर प्र. ना. परांजपे, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; २ रु.

# पुस्तके : लेखक, वाचक, प्रकाशक

◆ श्रीपाद जोशी ◆

**‘ सेमिनार ’ चा विशेषांक :**

दिल्लीहून ‘ सेमिनार ’ नावाचे एक वैशिष्ट्यपूर्ण इंग्रजी मासिक प्रकाशित होते. त्या मासिकाचा प्रत्येक अंक एका विशिष्ट विषयाला वाहिलेला असतो. त्या विषयासंबंधी उलट–सुलट बाजूंनी सर्वांगीण चर्चा व्हावी, अशी अपेक्षा असते. सदर मासिकाचा सप्टेंबर १९६७ चा अंक ‘ पुस्तके ’ या विषयाला वाहिलेला आहे. भारतातील पुस्तक प्रकाशनाच्या व्यवसायाचा विविध अंगांनी विचार करण्याचा प्रयत्न त्यात करण्यात आलेला आहे. अर्थात लेख इंग्रजीत असल्यामुळे आणि या देशातील मोठे व प्रतिष्ठित प्रकाशक इंग्रजी ग्रंथांचेच प्रकाशन करणारे असल्यामुळे विवेचनाचा मुख्य भर इंग्रजी ग्रंथांच्या प्रकाशनात येणाऱ्या अडीअडचणींवरच असणे स्वाभाविक आहे. परंतु हिंदीतील काही बड्या प्रकाशकांचे लेखही त्यात समाविष्ट आहेत. त्यामुळे हिंदी प्रकाशन व्यवसायाचाही थोडाफार विचार त्यात झालेला आहे. मराठीचा कोणी प्रकाशक त्यात नाही. बहुधा आमच्या मुद्रक–प्रकाशकांना ( आणि लेखकांनाही ) या मासिकाचे नावही माहीत नसावे !

**धंद्याची सत्यस्थिती :**

अंकातील पहिलाच लेख दिल्लीच्या ‘ राधाकृष्ण प्रकाशन ’ या संस्थेचे संचालक श्री. ओमप्रकाश यांचा असून या धंद्याची सत्यस्थिती ( The Facts ) कथन करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. या लेखातील काही आकडेवारी फारच उद्बोधक आहे. उदाहरणार्थ १९६४ साली जगात ४, ०८, ००० पुस्तके प्रसिद्ध झाली, तर भारतात फक्त १३,१२८ पुस्तके बाजारात आली.

१९५७–१९६६ या दहा वर्षांत भारतामध्ये पुस्तकांच्या संख्येत कशी वाढ झाली याचे त्यांनी दिलेले आकडेही मजेदार आहेत. मराठी वाचकांच्या दृष्टीने कुतूहलाची गोष्ट म्हणजे या दहा वर्षांत मराठी भाषेत प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांची संख्या जवळ–जवळ ६० टक्क्यांनी वाढलेली आहे. ग्रंथांच्या संख्येत इंग्रजीत जेवढी ( २८ टक्के ) वाढ झाली तिच्या दुपटीहून ही वाढ आहे. गुजराती पुस्तकांतही थोडी वाढ आहे. परंतु ती फार थोडी आहे. इतर भाषांमध्ये वाढ होण्याऐवजी घटच झालेली आहे. मराठीमध्ये पुस्तकप्रकाशनाचा धंदा परवडत नाही, लेखकांना १५ टक्के रॉयल्टी देणेही आतबट्याचे होते असे म्हणणाऱ्या आपल्या प्रकाशकांनी इतर भाषांपेक्षा मराठीत पुस्तकप्रकाशनांची ही वाढ का झाली असावी याचा शोध घेणे बोधप्रद होईल.

ही आकडेवारी अशी आहे :—( एकूण ग्रन्थसंख्येची टक्केवारी )

**वर्ष १९५७**

| इंग्रजी | हिंदी | गुजराती | वंगाली | मराठी | तमिळ | तेलुगू | इतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४०.८, | १७.५, | ४.९, | ७.२, | ५.४, | ६.७, | ४.९, | १२.६. |

**वर्ष १९६७**

| इंग्रजी | हिंदी | गुजराती | वंगाली | मराठी | तमिळ | तेलुगू | इतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५१.२, | १२.८, | ५.६, | ५.८, | ८.६, | ३.३, | २.५, | १०.२. |

जगामध्ये १९६४ साली दर दहा लाख लोकांना १२७ या प्रमाणात पुस्तके निघाली. आशियामध्ये हे प्रमाण ४८ असून भारतात तेच २७ आहे. भारताच्या या प्रमाणातही इंग्रजी पुस्तके वगळल्यास मराठी प्रकाशनाला पहिला क्रमांक मिळतो, आणि ज्या हिंदी भाषेत खूपच पुस्तके खपत ( निघत ? ) असतील अशी आपल्याकडे सर्वसामान्य समजूत आहे, तिचा क्रमांक खूपच खाली गेलेला दिसतो, ही एक मजेदार गोष्ट आहे. पुस्तकप्रकाशनाचा विचार करताना शाळाकॉलेजांत चालणारी पाठ्य पुस्तके विचारात घेतली जात नाहीत, हे येथे लक्षात ठेवले पाहिजे. कारण आपल्या प्रकाशकांचे एक आवडते तुणतुणे हे आहे की, ‘ वस्तुतः जनरल पुस्तकांचा धंदा परवडत नाही; आम्ही पाठ्यपुस्तकांत मिळवलेला नफा ललित पुस्तकांच्या प्रकाशनात घालतो ( किंवा घालवतो. )’ काही मंडळी हे महत्कार्य देशहितासाठी, समाजहितासाठी, वाङ्मयाच्या अभिवृद्धीसाठी किंवा मायभाषेच्या प्रेमापोटी करतात तर

अनुक्रमणिका

काही लोक केवळ षोक म्हणून, स्वतःला प्रतिष्ठा (प्रेस्टिज) मिळावी म्हणून करतात, असे सांगितले जाते. आता मराठीत जर सर्वांत जास्त पुस्तके प्रकाशित होत असतील तर त्याच्या मुळाशी सीधी, सरळ धंद्याची दृष्टी असते की वर उल्लेखिलेली कारणे त्याच्या मुळाशी असतात याचा शोध घेणे मनोरंजक ठरावे. युनेस्कोच्या प्रकाशनातून घेतलेली ही आकडेवारी पुढीलप्रमाणे आहे:— दर दहा लाख लोकांना त्या त्या भाषेत १९६४ साली प्रसिद्ध झालेली पुस्तके--

| | | | |
|---|---|---|---|
| मराठी | ३१·२ | तेलगू | १२·३ |
| गुजराती | २९·२ | हिंदी | ९·६ |
| बंगाली | २४·७ | कन्नड | ८·८ |
| मल्याळम् | २१·७ | उर्दू | ६·५ |
| पंजाबी | १३·५ | ओरिया | ६·१ |
| तामिळ | १२·६ | असमीया | १·१ |

कोणत्याही भाषेतील पुस्तकांचा खप व पुस्तकांची निर्मिती यांचा परस्परसंबंध असला पाहिजे, हे उघड आहे. पुस्तके जेथे जास्त खपत असतील तेथेच ती मोठ्या प्रमाणावर प्रकाशित होत असली पाहिजेत. या नियमाप्रमाणे ज्याअर्थी मराठीतील पुस्तकप्रकाशनांची संख्या सर्वांत अधिक आहे त्याअर्थी मराठी पुस्तकांचा खपही सर्वांत अधिक असला पाहिजे असा निष्कर्ष निघतो. या दृष्टीने पाहिले असता बंगाली, तामिळ, हिंदी, मल्याळम् व उर्दू यांची संख्या इतकी कमी का असावी, याचे आश्चर्य वाटते.

कलकत्त्याच्या 'देश' या लोकप्रिय साप्ताहिकाने नुकतीच बंगाली पुस्तकांसंबंधी आकडेवारी प्रकाशित केली आहे. त्यावरून १९६५–६६ पेक्षा १९६६–६७ साली बंगाली पुस्तकांची संख्या ४० टक्क्यांनी घसरली असल्याचे दिसते. पहिल्या वर्षी ती १४२२ होती, तर दुसऱ्या वर्षी ती १००० हून थोडी अधिक होती. याचा अर्थ बंगाली लोकांना पुस्तके वाचण्याचा फारच कंटाळा आला आहे, असा करता येईल काय ?

कोट्टायम ( केरळ ) येथील साहित्य प्रवर्तक कोऑपरेटिव्ह सोसायटी लि. या संस्थेचा उल्लेख ( जिच्या परिचय-लेखामुळे मराठीत चार वर्षांपूर्वी मोठे वादळ उठले होते ! ) पुस्तक-प्रकाशनाचा विचार करताना येणे अपरिहार्य आहे. श्री. ओम-प्रकाश यांनीही या संस्थेचा उल्लेख करून म्हटले आहे. " या संस्थेच्या ग्रंथविक्रीत खूप वाढ झालेली आहे १९५२-५३ साली तिने १,३५,२१८ रुपयांची विक्री केली तर १९६३-६४ साली हीच विक्री ६,३१,७९० रुपये झाली. परंतु कलकत्त्याच्या नॅशनल लायब्ररीच्या आकडेवारीप्रमाणे मल्याळम् भाषेतील ग्रंथनिर्मितीचे प्रमाण वाढण्याऐवजी घटलेलेच आढळून येते. १९५६ ते १९६६ या अकरा वर्षांत मल्याळम् भाषेत पुढीलप्रमाणे ग्रंथनिर्मिती झाली. १२४५, ८२९, ८७७, ७४६, ८१६, ७९६, ५८७, ५३१, ६४८, ६०३ आणि ५६३.



याचा अर्थ असाही होऊ शकतो की साहित्यप्रवर्तक संस्थेने प्रकाशनक्षेत्रात प्रवेश केल्यामुळे इतर किरकोळ प्रकाशक थंड पडले आणि सा० प्र० संस्थेने निवडक ग्रंथ प्रकाशित करून त्यांचा खूप प्रसार केला. लेखकांच्या दृष्टीने ही परिस्थिती इष्ट की अनिष्ट याचा विचार झाला पाहिजे.

## लेखकांची बाजू

ख्यातनाम इंग्रजी लेखक व ललितकला अकादमीचे अध्यक्ष डॉ. मुल्कराज आनंद यांनी 'काळाची गरज' या आपल्या लेखात अपेक्षेप्रमाणे प्रकाशकांवर झणझणीत टीका केलेली आहे. प्रकाशक लेखकांना पुरेसा मोबदला देत नाहीत, या वस्तुस्थितीचा उल्लेख करून ते म्हणतात, " अशा प्रकाशकाला जर कोणी विचारले की, 'बाबारे, तू लेखकाला पैसा का देत नाहीस ?' तर तो न चुकता हे उत्तर देतो की, 'पुस्तके खपत नाहीत.' पुस्तक विक्रीच्या बाबतीतील त्याची अकार्यक्षमता, पुस्तकाच्या जाहिरातीमुळे खप वाढतो या संबंधीचा त्याचा अविश्वास, जाहिरातीवर खर्च न करण्याची वृत्ती, आणि आधुनिक विक्रयकलेतील त्याचे अज्ञान या गोष्टी जणू त्याच्या गावीही नसतात. " आपल्या देशात खऱ्या अर्थाने प्रकाशक असे फार थोडे आहेत, बहुतेक सारे पुस्तक-विक्रेतेच आहेत, हे सांगताना ते म्हणतात, " हाताच्या बोटांवर मोजता येतील असे चार–दोन धाडसी हिंदी प्रकाशक वगळल्यास बहुतेक सारे प्रकाशक हे पुस्तक-विक्रेतेच राहिलेले आहेत. ते फक्त पाचव्या शेड्यूलमध्ये स्वतःचा समावेश व्हावा आणि करांच्या कटकटीतून स्वतःची सुटका करून घ्यावी, एवढ्यासाठीच प्रकाशक बनत असतात. ते लेखकांना त्यांचा योग्य न्याय्य मोबदला देत नाहीत. त्यांच्या लेखी त्यांच्या अलिशान बंगल्यांची जेवढी किंमत असते तेवढी लेखकाच्या कृतीची मुळीच नसते. "

बरे हे पुस्तकविक्रेते तरी कसे असतात ? डॉ. मुल्कराज म्हणतात, " बहुतेक पुस्तकांची दुकानेही धुळीने भरलेल्या गोदामांसारखी दिसतात. त्या ठिकाणी मोकळेपणाने फिरून पुस्तके निवडणेही शक्य होत नाही. "

लेखकांच्या दुर्दशेचे वर्णन करताना ते सांगतात, " भारतातील सर्व भाषांच्या शेकडो लेखकांची मला जी वैयक्तिक माहिती आहे तिच्यावरून मी असे निश्चितपणे सांगू शकतो की, बहुतेक लेखकांना स्वतःचे व आपल्या कुटुंबाचे पालनपोषण करण्यासाठी लेखनाखेरीज दुसरा काहीतरी नोकरी-धंदा करणे भाग पडते. "

लेखक व वाचक यांच्यांत प्रत्यक्ष संपर्क प्रस्थापित करण्याची जरुरीही डॉ. मुल्कराज यांनी आग्रहाने प्रतिपादिली आहे. हे काम अवघड आहे, हे ते मान्य करतात परंतु ते केले पाहिजे, असे ते सांगतात.

वेगवेगळ्या भाषा जाणणाऱ्या लेखकांची व अनुवादकांची एक अखिल भारतीय सूची तयार करावी, त्यांचे परस्परांशी संबंध जुळवून आणावेत, त्यांना जपान, अमेरिका, रशिया यांसारख्या पुढारलेल्या देशांत पाठवून संपादकीय कामाचे प्रशिक्षण देऊन आणावे, यांसारख्या काही सूचना त्यांनी आपल्या लेखात केल्या आहेत.

" आजचा प्रकाशक हा अजूनही जुन्या काळचा भांडवलवादी बनिया आहे. स्वतःचे दहा बंगले उभारणे हा आपला पवित्र हक्क आहे, असे त्याला वाटते परंतु आपल्या लेखकाला मात्र पोटापुरते मिळाले पाहिजे आणि राहायला चांगली जागा असली पाहिजे, हे त्याला मान्य नाही. जोपर्यंत ही परिस्थिती बदलत नाही तोपर्यंत प्रकाशन हा एक उच्च प्रतीचा उद्योग किंवा व्यवसाय बनणे शक्य नाही " असे ते स्पष्टपणे सांगतात.

### इंग्रजी प्रकाशकांच्या अडचणी

मुंबईचे श्री. आर. जे. तारापोरवाला व एशिया पब्लिशिंग हाउसचे श्री. पी. एस. जयसिंह यांनी आपल्या लेखांमध्ये मुख्यतः भारतातील इंग्लिश पुस्तके प्रकाशित करणाऱ्यांपुढील अडचणींचा पाढा वाचलेला आहे. परदेशांतून येणाऱ्या इंग्रजी पुस्तकांना कसे तोंड द्यावयाचे हा त्यांच्या पुढील महत्त्वाचा प्रश्न आहे. या बाबतीत भारत सरकार भारतीय प्रकाशकांशी सापत्नभावाने वागते, अशी त्यांची तक्रार आहे. परदेशांतून सदैव तयार पाठ्य पुस्तके मागवीत राहिल्यामुळे भारतीय विद्वानांना ग्रंथ लिहिण्याची प्रेरणाच उरत नाही, हा श्री. जयसिंह यांचा मुद्दा विचार करण्यासारखा आहे. भारतीय पुस्तकांना जगाच्या बाजारपेठेत चांगली मागणी असून इंग्रजीत व अन्य विदेशी भाषांमध्ये आपली पुस्तके गेली पाहिजेत अशा अर्थाचे प्रतिपादनही त्यांनी केले आहे.

सरकारच्या पुस्तकविषय आयात-निर्यात धोरणावर श्री. तारापोरवाला व श्री. जयसिंह यांच्या प्रमाणेच श्री. वी. एस. केशवन् व श्री. ए. एस. रायजादा यांनीही कडक टीका केली आहे. सरकारकडून आयात-परवाने मिळवून त्यांचा कसा गैरवापर केला जातो त्याचे वर्णन या लेखकांनी केलेले आहे. परंतु हा विषय मुख्यतः इंग्रजी प्रकाशकांच्या जिव्हाळ्याचा असल्यामुळे या लेखात त्याचा प्रपंच केलेला नाही. वैयक्तिक परवाने न देता सहकारी पद्धतीने काम करणाऱ्यांना परवाने द्यावेत अशा तऱ्हेची या लेखकांनी केलेली सूचना विचारात घेण्यासारखी आहे.

### वितरणाची समस्या

' हिंद पॉकेट बुक्स 'चे श्री. डी. एन्. मलहोत्रा यांनी पुस्तकांच्या वितरणासंबंधी आपले अनुभव सांगितले आहेत. पुस्तकांच्या विक्रीला या देशात अजून खूपच वाव आहे; परंतु तसा पद्धतशीर व शास्त्रशुद्ध प्रयत्न कोणी करीत नाहीत. ख्यातनाम लेखकांची पुस्तके प्रकाशित करून ( मग त्यातील मजकुराचा दर्जा कितीही निकृष्ट का असेना ! ) घरबसल्या नफा मिळविण्याची वृत्तीच बहुतेक प्रकाशकांमध्ये दिसून येते. चांगली पुस्तके काढून ती जास्तीतजास्त लोकांपर्यंत नेऊन पोचवावीत अशी आच किंवा जरूरच जणू कोणाला भासत नाही. ज्यांना अशी जरूर भासली त्यांनी आपल्या कल्पकतेचा वापर करून १० हजार, २० हजार, किंबहुना त्याहूनही अधिक मोठ्या संख्येने पुस्तके काढून कशी खपविली याची माहिती श्री. मल्होत्रा यांनी स्वानुभवाच्या आधारे आपल्या लेखात दिली आहे. ते म्हणतात, " देशातल्या वेगवेगळ्या ग्रंथभांडारात प्रत्येक पुस्तकाला गिऱ्हाइकाच्या नजरेसमोर येण्याची संधी मिळाली तर या देशातल्या पुस्तकांची विक्री कितीतरी पटींनी वाढेल."

पुस्तक-विक्रेत्याचे कमिशन ही प्रकाशक व वाचक यांच्या मार्गातील एक मोठी धोंड आहे. म्हणून विक्रेत्याला टाळून वाचकाशी सरळ संबंध जोडता आला पाहिजे, असे त्यांनी प्रतिपादिले आहे. त्या दृष्टीने ' बुक क्लब ' ची त्यांची कल्पना फार चांगली आहे. ( मला वाटते, ' हिंद

अनुक्रमणिका

पॉकेट बुक्स ' ने ही कल्पना यशस्वीपणे अमलात आणली आहे. ) पुस्तक विक्रेत्याचे कमिशन टाळता आले तर ग्राहकाला पुस्तक मूळ किंमतीत घरबसल्या मिळू शकेल. परंतु त्यासाठी सध्याचे टपालाचे दर बदलले पाहिजेत. आज १ रुपयाचे पुस्तक पोस्टाने पाठविले तर ग्राहकाला ते रु. १–८० ला पडते. या दरामुळे या धंद्याचे कंबरडेच मोडले आहे. जनतेला सुशिक्षित बनवू इच्छिणाऱ्या लोकशाही सरकारला हे कसे काय शोभते, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

### सबसिडीची निकड

नॅशनल बुक ट्रस्टचे अध्यक्ष डॉ. बाळकृष्ण केसकर यांनी पुस्तकाच्या धंद्याला सरकारकडून आर्थिक मदत ( सबसिडी ) मिळाली पाहिजे, सरकारची मदत मिळाली तरच पुस्तकांचा प्रसार होईल असे आवर्जून सांगितले आहे. ( डॉ. केसकर यांना हा साक्षात्कार मंत्रिपद गेल्यावरच का व्हावा, असा कुत्सित प्रश्न कुणी करतील. परंतु आपण तिकडे लक्ष न देता त्यांना पुनः मंत्रिपद प्राप्त होऊन त्यांचे मतपरिवर्तन–हृदयपरिवर्तन–होण्यापूर्वी या बाबतीत त्यांच्याकडून प्रत्यक्ष काही घडावे, अशीच आशा करावी, हे बरे ! ) या कामासाठी किमान १ कोटी रुपये लागतील असा त्यांचा अंदाज आहे. ज्ञानप्रसाराचे महत्त्व व निकड लक्षात घेता ही रकम अल्पच म्हटली पाहिजे. ज्या पुस्तकांना सबसिडी द्यावयाची त्यांची निवड जाणकार लोकांनी करावी, ही डॉ. केसकरांची सूचना स्वागतार्ह आहे. सबसिडीचे काही मार्गही त्यांनी सुचविले आहेत. उदाहरणार्थ, खाजगी प्रकाशकांना स्वतंत्र पुस्तके व भाषांतरे तयार करून पुरविणे, ( त्यांनी फक्त प्रकाशनाची जबाबदारी घेणे ) पुस्तकनिर्मितीचा काही खर्च सरकारने सोसणे, सरकारने हजारोंनी प्रती खरेदी करून त्या ग्रंथालयांना पुरविणे, नियंत्रित दरात कागद पुरविणे, पोस्टाचे दर कमी करणे, पुस्तकांच्या निर्यातीला सबसिडी देणे वगैरे. अर्थात या सर्वच सूचना स्वागतार्ह असल्या तरी आजच्या सरकारची मनःस्थिती पाहता ( आणि डॉ. केसकर यांचे सरकारदरबारी असलेले वजन लक्षात घेता ) त्यांच्याकडे सरकारचे लक्ष जाईल अशी आशा बाळगण्यात काही हशील नाही. ' उद्धरेदात्मनात्मानम् ' हेच शेवटी खरे, हे उघड आहे.

सारांश, ' पुस्तके ' या विषयासंबंधी ' सेमिनार ' ने चांगला परिसंवाद घडवून आणला आहे, हे कोणालाही मान्य करावे लागेल. गमतीची गोष्ट अशी की, या पुस्तकविषयक विशेषांकात पुस्तकाची मात्र एकही जाहिरात नाही. टूथपेस्ट, पादत्राणे, टॉनिक्स, टायर्स, सिगारेट्स वगैरे वस्तूंच्याच जाहिरातींनी उरलेली जागा व्यापली आहे. किती झाले तरी त्या जीवनावश्यक वस्तू. पुस्तकांची गणना त्यात बहुधा होत नसावी ! मला वाटते, यातच आमच्या प्रकाशन-व्यवसायाच्या दुरवस्थेचे उत्तर येते.

' सेमिनार ' च्या पुढील म्हणजे ऑक्टोबर १९६७ च्या अंकात दिल्लीच्या श्री. रणजित गुप्तांचे एक लेखवजा पत्र प्रकाशित झाले आहे. त्यांनी काही महत्त्वाच्या मुद्द्यांकडे लक्ष वेधले आहे. इंग्रजी पुस्तकांच्या प्रकाशन-व्यवसायात परदेशांतून येणाऱ्या स्वस्त किंमतीच्या पुस्तकांच्या ' अनुचित स्पर्धे ' ला तोंड द्यावे लागते, अशी तक्रार बऱ्याच लेखकांनी केलेली होती. तिला उद्देशून श्री. गुप्ता म्हणतात, "घरगुती वापरासाठी लागणाऱ्या निकृष्ट प्रतीच्या लोखंडी सामानाला उत्तेजन देण्यासाठी संरक्षित बाजारपेठ हा एक मार्ग होऊ शकेल. परंतु विद्वत्तेला किंवा विद्वत्तेशी संबंधित कार्यांना चालना मिळावी म्हणून संरक्षित बाजारपेठेचा उपयोग होऊ शकणार नाही. पुस्तकांची निर्मिती व किंमती यांच्या बाबतीत जिला 'अनुचित स्पर्धा' असे म्हटले जाते ते वस्तुतः गुणवत्ता व निर्मितिखर्च यांच्या बाबतीतील आंतरराष्ट्रीय आदर्श असतात. संरक्षक फळ्या उभारून हे आदर्श साध्य होऊ शकणार नाहीत. म्हणून आपण तो विचार डोक्यातून काढून टाकला पाहिजे...स्पर्धा ही इंग्रजी पुस्तकांना आहे. देशी भाषांतील पुस्तकांना तर नाही ना ? त्यांची बाजारपेठ तर संरक्षितच असते. त्यामुळे पुस्तकांची गुणवत्ता व वाङ्मय यांचा दर्जा सुधारण्याचा प्रयत्न करणे म्हणजे वेळ व पैसा वाया घालविणे होय, असे समजले जाते. ललितेतर पुस्तकांचे मुख्य गिऱ्हाईक म्हणजे ग्रंथालये. पुस्तकाची किंमत कितीही असली तरी ती ही पुस्तके घेतातच. त्यामुळे पुस्तकाची किंमत जितकी जास्त तितका पुस्तकविक्रेत्याचा नफा जास्त. म्हणून जनरल पुस्तके प्रकाशित करणाऱ्या आमच्या प्रकाशकांना कमी किंमतीची पुस्तके प्रकाशित करण्यात मुळीच स्वारस्य नसते. " श्री. गुप्ता यांनी २०० पानांच्या एका ( डेमी आकाराच्या ) पुस्तकाच्या निर्मितीचा व वितरणाचा खर्च उदाहरणादाखल घेऊन १००० प्रती काढल्यास प्रत्येक प्रतीची ( निर्मिती–खर्चाच्या चौपट ) किंमत १८ रुपये

अनुक्रमणिका

होते आणि प्रतींची संख्या ३००० केल्यास हीच किंमत रु. १० – २० होते असे दाखवून दिले आहे. नॅशनल बुक डेव्हलपिंग बोर्ड किंवा बुक फायनॅन्सिंग कार्पोरेशन यांनी देशातील सर्वोत्तम अशा ५० प्रकाशकांना आर्थिक साह्य दिले आणि या ५० प्रकाशकांनी दरसाल किमान ५० उत्कृष्ट पुस्तके काढली तर दरसाल २५०० पुस्तकांची भर पडेल अशी कल्पना त्यांनी मांडली आहे.

या दृष्टीने प्रयत्न होत राहिले आणि येणाऱ्या अनुभवांचा फायदा घेतला गेला तर या व्यवसायाला व्यवस्थित उद्योगाचे स्वरूप प्राप्त होईल आणि जगातील इतर देशांमध्ये या व्यवसायाने जे प्रतिष्ठेचे स्थान मिळविले आहे ते या देशामध्येही त्याला प्राप्त होऊ शकेल. तसे झाल्यास लेखक, प्रकाशक व वाचक या सर्वांचाच फायदा होईल. मराठीतील प्रकाशकांनी हे विचार समजून घ्यावेत आणि देशातील इतर प्रकाशकांच्या अनुभवापासून काय शिकता येईल ते पाहावे, अशी अपेक्षा करणे गैरवाजवी ठरेल काय ?

◆◆◆

## साभार–स्वीकार

**नाट्याचार्य देवल**– ( चरित्रः वाङ्मय : जीवनकार्य. ) लेखक व प्रकाशक श्री. ना. बनहट्टी, पुणे ४; ८ रु.

**वर्णसंकर**– ( ययाती-देवयानी सं. नाटक. ) वि. ना. कोठीवाले, केळकर प्रिं. प्रेस, पुणे २; ५ रु.

**नाट्याचार्य देवल** : लेखक व प्रकाशक श्री. ना. बनहट्टी, ज्ञानकोशकार केतकर पथ, पुणे ४; ८ रु.

**मांजर्डे** ( ग्रामगौरव स्मरणिका ) : संपादक व प्रकाशक वा. वि. साळुंखे, सरपंच, मांजर्डे ( जि. सांगली )

**अस्मिता** : संपादक व प्रकाशक–म ना. वानखडे, नागसेनवन, औरंगाबाद, वा. वर्गणी ४ रु.

**अष्टनायिका विवाह** ( एल्हणा विरचित )–संपादक र. म. भुसारी, मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २७; ७ रु.

**इस्ला** ( कादं. ) : प. ग. चितळे, अभिनव प्रकाशन, मुंबई १२; ३ रु.

**सागरवेला** ( कविता ) : विद्याधर भागवत, अभिनव प्रकाशन, मुंबई १२; २=५० रु.

**रशियातील समाजवादी राज्यक्रांती** : सौ. लीला आवटे, अभिनव प्रकाशन, मुंबई १२; २ रु.

**अमर करणारा दिवा** ( कादं. ) : दामोदर नाईक, भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४; ३ रु.

**झुंजार सेनानी** ( दहा जीवनकथा ) : म. श्री. दीक्षित, नीतिन प्रकाशन, पुणे ९; ३ रु.

अनुक्रमणिका

# कोकणचे कुणबी आणि त्यांची गाणी

◆ कुमुदिनी घारपुरे ◆

कोकणातले कुणबी हे अत्यंत कष्टाळू म्हणून महाराष्ट्रास माहीत आहेत. प्रामुख्याने त्यांचा व्यवसाय शेतीचा. शिवाय शेतमळ्यात काम करणे, घरगुती नोकरी करणे, गुरे राखणे हेही उद्योग ते करतात. शेतीला सर्वस्वी प्रतिकूल असलेल्या जमिनीशी झगडून त्यांना पीक उभे करायचे असते. त्यामुळे मशागतीसाठी अपार कष्ट करण्याखेरीज, शेतात सतत घाम गाळण्याखेरीज, त्यांना गत्यंतर उरत नाही. एवढे करूनही पोटभर अन्नाला ते मोताद्च होतात. विशेषतः रत्नागिरी जिल्ह्यातल्या कुणब्यांना या परिस्थितीचे परिणाम सतत सहन करावे लागतात. हातात नांगर धरला तरच दुपारची सोय व्हायची, नाहीतर अर्धपोटी राहावे लागायचे. अशा परिस्थितीत रत्नागिरी, संगमेश्वर, चिपळूणचा कुणबी कर्जबाजारी झालेला दिसला तर त्यात नवल नाही. लग्नसमारंभ, श्राद्धाची जेवणे आणि शेतीच्या साधनांची, बैलांची खरेदी यांसाठी तो सतत कर्जे काढीत राहतो व या कर्जांची परतफेड करण्यासाठी सावकाराच्या घरचा कायमचा गडी होऊन राहतो. कर्जमुक्त होण्यासाठी काही कुणब्यांत तर हे घरगडीपण वंशपरंपरा चालू असलेले दिसते.

गेल्या पन्नास वर्षांत हळूहळू अनेक कुणबी कामधंद्यासाठी गाव सोडून शहरात आले. त्यामुळे त्यांच्या गावात कामकऱ्यांचा तुटवडा भासू लागला. याचा परिणाम असा झाला की गाव सोडून आलेल्यांची आणि गावात राहिलेल्यांची अशा दोन्ही प्रकारच्या कुणब्यांची आर्थिक परिस्थिती, थोडीफार सुधारल्यासारखी वाटू लागली. पूर्वी घरे केवळ शाकारलेली असत. आता कोठेकोठे मंगलोरी कौले दिसू लागली. शहरांतून मिळणाऱ्या रोख पैशांच्या मदतीमुळे गावातील कर्जाचे प्रमाणही बरेच कमी झाले.

भाकरी, भात, मासे हे त्यांचे पूर्वापार मुख्य अन्न. चहा घेण्याची सवय आता इतकी हाडीमाशी खिळलेली आहे की, चहाचा अन्नात समावेश झाला; आणि दारू ही चहासारखी सवयीची बाब बनली. फरक इतकाच की बहुधा ते चहा दिवसा घेतात, तर दारू रात्री पितात. दिवसभराच्या अतिश्रमाचा हा परिणाम असावा. लग्नसमारंभ, बारसे, बारावे, सण, उत्सव यांत दारूशिवाय त्यांचे चालत नाही. पानतंबाखू खाणे, विडी ओढणे हे कुणबी बायकापुरुषांत सर्रास दिसते. खाण्यासाठी पानसुपारी पुढे करणे हे तर आदरातिथ्याचे लक्षण समजले जाते. पान खाणे हा त्यांचा एक प्रकारचा विरंगुळाही आहे. कोठेही काम करीत असताना मिनिटादोनमिनिटांची फुरसत मिळाली, तरी ते चंची उघडून पान खातील. शेतावर असले तर या विरंगुळ्याच्या वेळी बैलांनाही विसावा मिळतो.

या कुणब्यांचा दिनक्रम अगदी घाण्याला जुंपल्यासारखा असतो. पहाटेसच उठून ते कामावर निघतात. त्यांची न्याहारी, जेवण, शेतावर किंवा कामाच्या ठिकाणीच होते. दुपारी थोडीशी विश्रांती घेऊन ते पुन्हा कामाला जी सुरुवात करतात ती थेट अंधार पडेपर्यंत. रात्रीच्या जेवणासाठी ते घरी येतात आणि दिवसभराच्या कष्टांमुळे थकून जमिनीला पाठ लागताच चटकन गाढ निद्रेच्या आधीन होतात.

कुणब्यांच्या बायका भल्या पहाटेस उठल्या तरी कामावर उशिरा जातात. कारण पीठ दळणे, पाणी भरणे, न्याहारी व जेवणासाठी भाकरी-कोरड्यास बनवणे हे उद्योग त्यांना घरात करावे लागतात. न्याहारी, जेवण बरोबर घेऊनच त्या शेतावर जातात. आणि पुरुषांबरोबर तेथेच खातात. मुले सांभाळण्याचे काम बहुधा घरातील म्हाताऱ्या करतात. कुणबी बायका संध्याकाळीही पुरुषांहून अगोदर घरी परततात. संध्याकाळची अंघोळ त्यांच्यात नेहमीची आहे. त्यानंतर पुन्हा अन्न शिजवणे. कुणबी स्त्री-पुरुषांना दैनंदिन जीवनात मनोरंजनासाठी खरोखरी फुरसत मिळत नाही.

आजकाल शिक्षण सक्तीचे झाले असले तरी प्रत्यक्षात मुलांना शाळेत क्वचित पाठवले जाते. रोजची भाकरी मिळवण्याच्या ज्वलंत गरजेपुढे साऱ्याच गोष्टी फिक्या पडतात. मोफत शिक्षण, शिक्षणामुळे होणारा मानसिक, बौद्धिक विकास, त्यापोटी संभवणारी आर्थिक उन्नती ह्या साऱ्या गोष्टी पोटाच्या आगीत जळून खाक होतात. ती दृष्टीही त्यांना नसते. मुलांना तेथेच कोठे कामाला लावणे

अनुक्रमणिका

शेतावर पाठवणे किंवा गुरे राखायला सांगणे हेच बहुधा घडते. गुरे राखण्याचा जोडधंदा शेणखते, दुधदुभते यामुळे फायदेशीर ठरतो. यातून मोठ्यांना पैसा मिळतो, मुलांना उनाडायची संधी मिळते. तेथे गुरे राखण्याचा धंदा प्रतिष्ठित समजला जातोच आणि खरोखरी गुरांबद्दल त्यांना जिव्हाळाही वाटतो.

कोकणचा कुणबी हा रूढिप्रिय आणि सनातनी असतो. रूढिबाह्य वर्तनाबद्दल वाळीत, जातीबाहेर पडण्याची फार मोठी भीती त्याला असते. शहरी फॅशन्सचा रूढिबाह्य वर्तनात समावेश होतो. कित्येक वर्षे पाश्चात्त्य सुधारणांचा संपर्कही त्यांच्या जीवनाला पोचला नव्हता. अद्यापही त्यांचे गाव हेच त्यांचे जग असते. कोर्टाची पायरी हा कुणबी क्वचितच चढतो. अर्थात त्यासाठी लागणारा पैसा, वेळ, सामर्थ्यही त्याच्याजवळ नसते हे खरे आहे. पंचायतीच्या निर्णयावर समाधान मानून घेण्याची त्याची प्रवृत्ती असते. अलीकडील वीस वर्षांत बदलत्या आर्थिक परिस्थितीमुळे, शहरांशी अप्रत्यक्ष संबंध जडल्यामुळे, वकिलाचा सल्ला घेण्याचे अपवादात्मक उदाहरण कोठे कोठे आढळते.

स्वभावतःच सनातनी, परंपराप्रिय आणि दीर्घोद्योगी असलेल्या कुणब्याला आपल्या व्यवसायाखेरीज इतर कशात लक्ष घालण्याचे ठाऊक नसते. गुरे चारताना लहानपणी तो काही खेळ खेळला असेल, पुढे शेतावर राबताना गाणी गाईला असेल, कधीमधी गौरीत नाचला असेल, इतकेच! पण मनोरंजनासाठी कोणत्याही प्रकारचे खेळ, नाच, गाणे यांत रमलेला तो दिसत नाही. तितकी सवडच त्याला नसते. मात्र वर्षातून दोन वेळेला त्यांच्या परंपरागत उत्सवांत तो उल्हासाने, हिरिरीने भाग घेतो.

गौरी आणि शिमगा हे कुणब्यांचे परंपरागत महत्त्वाचे उत्सव. खाणे आणि पिणेदेखील तो या वेळी मनसोक्त करतो. नाचगाण्याची धमाल उडवतो. खास या सणांसाठी म्हणून तो वर्षभर शिल्लक टाकीत असतो. या वेळी सर्वत्र उत्साहाचे वातावरण असते. गौरीच्या नाचात तर जवळजवळ प्रत्येकजण भाग घेतो. शिमग्यात नाचापेक्षा चैन करण्याकडे प्रवृत्ती जास्त दिसते.

या उत्सवांना मोठ्या हर्षाने कुणबी सामोरा जात असला, त्यात मनमुराद रंगत असला, अनेक दिवस त्या वेळी करावयाच्या चैनीची स्वप्ने फुलवीत असला, तरी या उत्सवांकडे पाहण्याची त्याची दृष्टी मूलतः धार्मिक असते. हे सण आणि उत्सव ही एक परंपरेने चालत आलेली धार्मिक बाब आहे अशीच त्याची समजूत असते आणि म्हणून त्यात भाग घेता आला नाही तर आपले काही चुकले, असे त्याला वाटत राहते. अगदी अलीकडच्या पिढीत मात्र हा दृढ धार्मिक विश्वास डळमळू लागलेला दिसतो. गौरी-शिमग्याच्या उत्सवांतील धार्मिकतेपेक्षा त्यातील रंजनाची जाणीव आता अधिक स्पष्ट होऊ लागली आहे.

असे कधीमधी येणारे सण सोडले तर या कुणब्यांच्या जीवनात गाण्याची गुणगुण ऐकू येते ती श्रमपरिहार व्हावा म्हणून. शेतावर राबत असताना कामाच्या लयीत नादाची लय मिसळली जाते आणि दोन्ही लयींचा वेग वाढला की वेगाच्या ओघात श्रमही विरघळून जातात. मन ताजेतवाने होते.

'गाण्याने श्रम वाटतात हलके' म्हणून शेतात पेरणी, लावणी, भातझोडणी करताना, मळ्यात पाणी खेळवताना सहजपणे ही गाणी कुणब्यांच्या ओठांवर नाचत राहतात. या गाण्यांना नाही कोणी कवी, नाही काही काळ! आजोबा म्हणत आले म्हणून वडिलांनी म्हटले तेच ऐकून ऐकून नातू म्हणू लागला. असे हे पिढ्या न् पिढ्या चालले. लोकगीतांच्या कुळीतली अशी काही गाणी चिपळूणपासून दीड तासाच्या अंतरावर असलेल्या संगमेश्वर तालुक्यातील 'लावी' या गावात राहणाऱ्या महादू बाळू पडियें, या पंधरासोळा वर्षांच्या कुणब्याकडून मला मिळाली. भातझोडणी करताना, मळ्यात रहाटावर असताना, गुरे चारताना, गौरी शिमग्यात नाचताना वेगवेगळी गाणी म्हटली जातात, पैकी भातझोडणी करताना व मळ्यात म्हटली जाणारी तीन गाणी पुढे दिलेली आहेत. आपल्या विशिष्ट बोलीच्या लकबीनुसार कोठे आघात देत, तर कोठे हेल काढीत, जलद लयीत कुणबी ही गाणी म्हणू लागला तेव्हा वाटले की, या गाण्यांचे सौंदर्य ती ऐकून जितके प्रतीत होईल तितके ती वाचून होणार नाही.

या गाण्यांचे मोल खरोखरी कशात आहे? परंपरेने जिव्हाळ्याने जोपासलेले हे साहित्यधन आहे खरे; पण ही गाणी म्हणजे कोणा कलावंताच्या प्रतिभेची उत्तुंग भरारी नव्हे; तर काम करता करता विरंगुळा म्हणून उमटलेला सहजोद्गार आहे. हेलावून सोडणारी भावना, थराहून टाकणारी कल्पना, स्तिमित करणारे शब्दसामर्थ्य, भुरळ घालणारी शैली, भान हरपून टाकणारे संगीत यांतले काही-देखील या गाण्यात आढळणार नाही. एवढेच काय पण

सलग असे सूत्र, नियमित रचना, लहानसा विचार हाही येथे आढळणे कठीणच.

उलट, पुनरुक्ती हे या गाण्यांचे खास वैशिष्ट्य मानता येईल. खरोखरी पाच कडव्यांच्या मोठ्या गाण्यात, दर कडव्यात वेगवेगळे म्हणून येणारे काही शब्द सोडले तर बाकीची कडवी म्हणजे पहिल्या कडव्याची पुनरुक्तीच म्हणावी लागेल. प्रत्येक कडव्यात जे काही वेगळे शब्द दिसतात त्यांमुळे अर्थामध्ये मोठी वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मयीन भर पडते असे नाही. एकाच उखाण्याने वेगवेगळी नावे घेता यावीत तसा तो प्रकार आहे.

पण वेगळी सौंदर्यपूर्ण अर्थप्रतीती होत नसली तरी त्या एकाच शब्दाने त्या समाजातील, संस्कृतीतील, जीवनातील एखाद्या वैशिष्ट्याचे दर्शन घडते हे मात्र निश्चित ! संगमेश्वर तालुक्यातल्या 'लावी' गावच्या स्थानदेवता, ग्रामदेवता कोणत्या आहेत याची कल्पना एका गीतावरून येईल, तर दुसऱ्यावरून तिथल्या शेतमळ्यात काय काय पिकते हे कळेल. केवळ एक शब्द बदलला तरी दर्शनाचा व्याप वाढला; वाङ्मयीन सौंदर्यात नसली तरी माहितीत भर पडली.

कुणब्यांच्या अंतरंगातही या गीतांच्या झरोक्यातून डोकावता येते. मळ्यात जे काही पिकते ते सारे देवाच्या पूजेला न्यायचे ही त्यांची श्रद्धा आहे, पद्धत आहे. ज्या देवाच्या कृपेने हे सारे पीक आपल्याला मिळाले त्याच्या पायी ते अर्पण करण्याची कृतज्ञताबुद्धी त्यांच्या ठिकाणी आहे. कुणब्यांची ही भाविकता, हा देवावरचा विश्वास, ही चालरीत, ही कृतज्ञता ओळींच्या पुनरुक्तीतून पुनः पुन्हा वाचकश्रोत्यांच्या मनावर ठसते.

तिसऱ्या गीतात कोकणात शेतीला कष्ट पडतात म्हणून कुणब्याला देशावर चलण्याचा आग्रह केलेला दिसेल आणि पुढे कुणबी आपल्याकडेही काय आहे ते सांगताना दिसेल.

या तीनही गीतांतून कुणब्यांच्या व्यावसायिक जीवनाची काहीशी कल्पना येऊ शकते. मळ्यात विहीर असणे, ती गवंड्यांनी पाडणे, विहिरीला दोर तसाच रहाट असणे, मोटेला बैल जुपणे, पाटांतून पाणी खेळवणे—हे पाणी गावालाही उपयोगी पडणे, माळ्याने शेतमळ्याची निगा राखणे, भाताच्या लावणीतील जिकीर पण नारळी-पोफळीची सुबत्ता या साऱ्यांवर प्रकाश पडतो.

कुणब्यांच्या जीवनश्रद्धेचे आणि जीवनाचे हे दर्शन जाणीवपूर्वक मात्र घडवलेले नाही. साध्याभोळ्या अंतःकरणातून निघालेल्या या सहज, सरळ नि पुनरुक्त बोलांतून ते लहानसे जग त्याच्या मर्यादांसह आपोआप आपल्यापुढे साकार होते.

कोणत्याही प्रकारची कला किंवा कुसर या गीतात नाही. तरीही श्रोत्याचे चित्त तिथे वेधले जाते. याचे एक कारण म्हणजे या गीतांची भाषा व उच्चारांची लकब; आणि दुसरे म्हणजे ही गीते म्हणण्याची धाटणी.

शहरापासून फारच दूर आणि तालुक्यापासूनही लांब डोंगर ओलांडून एका बाजूला वसलेल्या या गावाला नागरी मराठीचा संपर्क नाही यात नवल नाही. त्यामुळेच नागरी मराठीहून ही काहीशी वेगळी भासते. उच्चारात तर हे भिन्नत्व फारच जाणवते. ( i ) पहिल्या गीतातील 'या' हा शब्द 'यऽ', 'यॅ', 'ऍ' अशा तीन प्रकारांनी उच्चारला जातो. ( ii ) तर 'ज' हा प्रमाण मराठीत जिथे 'दन्त्य' उच्चारला जातो तिथेही या गीतात 'तालव्य' उच्चारला जातो. उदाहरणार्थ, 'जुंपले, जावु, जो, जु, जुप्' इत्यादी ( iii ) 'ल' आणि 'ळ', 'घ' आणि 'ग', 'रा' आणि 'ऱ्हा' विकल्पाने उच्चारताना दिसतात. उदा :—पाटाला—पाटाळा; राटाला—राटाळा—ऱ्हाटाला—ऱ्हाटाळा; जनघराला-जनगराला. ( iv ) ओष्ठ्य वु, उ, व् हे विकल्पाने उच्चारतात. उदा: —जावु, जाउ, जाव्; येव्, येउ. ( v ) पहिल्या गीतात 'चाल्' या शब्दातील 'च' चा उच्चार दन्त्य नसून तालव्य आहे. ( vi ) दुसऱ्या गीतातील 'पोफळ' या शब्दात 'प्' 'फ्' विकल्पाने कुठेही व कसेही आलेले दिसतात. 'फोपळ, फोफळ.' ( vii ) पुल्लिंगी व नपुंसकलिंगी नामांचे प्रथमेचे एकवचन आकारान्त केलेले दिसते. उदाः—नारळा, बदमा, लिंबा, फोपळां पाना, ( viii ) पहिल्या गीतात 'गवुंड्यानी, गवुंडयानी' अशा दोन प्रकारे एकच शब्द उच्चारलेला दिसतो. एकात जोडाक्षर आहे. ( डया ), तर दुसऱ्यात 'अ' मुळे 'स्वरभक्ती' होऊन जोडाक्षराचे दोन सुटे वर्ण झालेले आहेत. ( ड, या ) या स्वरभक्तीचा उगम चालीच्या सोईपोटी झाला असण्याची बरीच शक्यता आहे. ( ix ) लक्ष वेधून घेणारी पहिल्या गीतातील एक प्रक्रिया म्हणजे शब्दाच्या मध्यस्थानी झालेला 'अक्षरागम' उदा :— पुजयेला—पुजगयेला; मोटयेला—मोटगयेला; मळ्यामदी—मळ्यागमदी. या तीनही उदाहरणांत 'ग' या अक्षराचे शब्दाच्या मध्यस्थानी आगमन झालेले दिसेल. अक्षराच्या या शब्दामध्ये घुमण्याच्या

कियेला 'अक्षरागम' म्हणता येईल. स्वराने जोडाक्षर अलग केले तर ती स्वरभक्ती होते. त्या धर्तीवर अक्षराने शब्दरूप व प्रत्यय अलग केले तर त्यास 'अक्षरभक्ती' म्हणण्यास हरकत नसावी. या अक्षरागमामुळे देखील गाण्याच्या चालीची सोय झालेली दिसते.

या गीतांची चाल, ती म्हणण्याची धाटणी वैशिष्ट्यपूर्ण आहे. मात्रासंख्या कायम ठेवण्यासाठी, चालीत शब्द बसवण्यासाठी काही उच्चार लांबवले जातात तर काही निसटते, निभृत केले जातात. कोणत्या शब्दावर जोर द्यायचा, कुठे शब्द हेल काढून उच्चारायचा याची जाणीव ठेवून गाणी म्हटली जातात. शब्दांवरील आघात, उच्चार लांबवणे व आंखूड करणे याचे गाण्याच्या चालीस फार महत्त्व आहे. या गाण्यांची स्वररचना अजिबात गुंतागुंतीची नाही. पहिले गीत पाच स्वरांवर तर दुसरे व तिसरे तीन स्वरांवर अधिष्ठित झालेले आहे. स्वरांची संख्या लहान असली तरी त्यांची परस्परांशी होणारी मिळणीजुळणीच गाण्याला आकर्षकता प्राप्त करून देते, धाटणीत वैचित्र्य निर्माण करते. हे वैचित्र्य व वेधकत्व व्यक्त करण्यास देवनागरी लिपी अपुरी पडते. म्हणून त्याची पुरेशी कल्पना येण्यासाठी गाण्यातील शब्द स्वरांकित करण्याखेरीज गत्यंतर नाही.

केवळ पाच नि तीन स्वरांत सामावलेल्या या लयप्रधान गीतांची स्वररचना खालीलप्रमाणे आहे. मूळ षड्जाच्या मध्यमात ही गाइली जातात.

**गीत १—ध्रु. ( या धर्तीवरच पुढील गाणे )**

येवूब्या मळ्याच्याऽऽ मळ्यागमऽदी मळ्यामदी
साऽनि़ सा म ग रे सा सा सा म ग रे सा सा म ग म
मळ्यागमऽदी
सा सा म ग रे सा

विहीर पाडिलीऽऽ गवंड्याऽनी गवुंड्यानी
सा सा सा रे म ग रे सां सा सा म ग रे सा सा म ग म
गवंड्याऽनी
सा सा म ग रे सा

**गीत २** पहिले कडवे ( या धर्तीवर पुढची कडवी )

उट् उट् रे माळ्युवा वैल् जुप् रे राटाला
सा सा रे सा पा सा रे सा सा रे रे सा रे सा
वैल् जुप् रे राटाला पानि जाव् दे पाटाला
सा सा रे सा पा रे सासा सा रे सा रे सा

पानि जाव् दे पाटाला काय् नारळी बनाऽला
सा सा सा रे सा सा रे रे सा नि़ सा सा रेऽसा
नाराळींची नारळां येव् द्या देवाच्या पुजेला
सा नि़ सा सा सा नि़ सा सा रे सा नि़ सा सा रे सा

**गीत ३—**पहिले कडवे ( या धर्तीवर पुढील ओळी )

किति करशीव् ठाकम् ठिकम् कंपणी
सा सा सा सा सा सा रे सा रे सा सा सा
टिकली ऽ जी
नि़ सा रे सा रे
चल माझ्या ग देशावरी ऊस जो
सा सा सा सा नि़ सा रे सा रे सा नि़ सा
पिकलाऽय् जी
नि़ सा रे नि ऽ सा

**गीत १**

येवूब्या मळ्याच्या मळ्या ग मदी, मळ्यामदी, मळ्या[1]ग मदी
विहीर पाडिली गवंड्यानी, गवुंड्यानी, गवुंडयानी[2] ॥ ध्रु ॥

त्ये[3] जो[4] विहिरीला नवा जु[5] काणा[6] नवा काणा नवा जु काणा
बैल जुंपले मोट ग येला, मोटयेला, मोटगयेला
पानी जावु दे जनगराल[7]ा, जनघराला, जनगराला
चाल सूर्यादेवाच्या [8]पुजगयेला, पुजयेला, पुजगयेला ॥ १ ॥

त्ये जो विहीरीला नवा जु काणा, नवा काणा, नवा जु काणा
बैल जुपले मोटगयेला, मोटयेला, मोटगयेला
पानी जावु दे जनघराला, जनगराला, जनगराला
चाल सोम्बादेवाच्या[9]पुजगयेला, पुजयेला, पुजगयेला ॥ २ ॥

त्ये जो विहीरीला नवा जु काणा, नवा काणा, नवा जु काणा
बैल जुपले मोटगयेला, मोटयेला, मोटगयेला
पानी जाउ दे जनगराला, जनगराला, जनघराला
चाल विटोबा देवाच्या पुजगयेला पुजयेला, पुजगयेला ॥३॥

---

१ 'ग' हा अक्षरागम, अक्षरभक्ति. २ गवंड्यानी. येथे स्वरभक्ती ३ त्ये=त्या; ४ जो=ज्या ( विहीरीला ); ५ जु=जो, सर्वनाम ( काणा ). ६ काणा=एक पेड मोठा व दुसरा बारीक अशा तऱ्हेने विणलेला दोर. ७ लोकांच्या घरी ८ पुजेला. ९ साम्बाची पिण्डी. शंभो व सांब यांच्या एकत्रीकरणाने सोम्बा रूप सिद्ध झाले असावे.

त्ये जो विहीरीला नवा जु काणा, नवा काणा, नवा जु काणा
बैल जुपले मोटगयेला, मोटयेला, मोटगयेला
पानी जावु दे जनगराला, जनघराला, जनगराला
दत्तात्रऽदेवाच्या पुजगयेला, पुजगयेला, पुजगयेला ॥ ४ ॥

त्ये जो विहीरीला नवा जु काणा, नवा काणा, नव जु काणा
बैल जुपले मोटगयेला, मोटयेला, मोटगयेला
पानी जावु दे जनघराला जनगराला जनगराला
[१०]वाग्जाय् देवीच्या पुजगयेला, पुजयेला, पुजगयेला ॥५॥

## गीत २

उट्[१] उट् रे माळ्युवा बैल जुप्[२] रे राटाला[३]
बैल् जुप् रे न्हाटाला[३] का[४] पानि जाउ दे पाटाला
पानि जाव् दे पाटाला काय्[४] नारळी बनाला
नाराळीची नारळा येऊ था देवाच्या पुजेला
उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला ॥ १ ॥

उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला
बैल जुप् रे राटाला पानि जाव् दे पाटाला
पानि जाव् दे पाटाला काय् बदामी बनाला
बदामीची[५] बद्मा[६] येव् य देवाच्या पुजेला
उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला ॥ २ ॥

उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला
बैल् जुप् रे न्हाटाला पानि जाव् दे पाटाला
पानी जाव् दे पाटाला काय् निंबीया[७] बनाला
निंबियाची निंबा येव् दें देवाच्या पूजेला
उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला ॥ ३ ॥

उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे न्हाटाला
बैल जुप् रे न्हाटाला पानि जाउ दे पाटाला
पानी जाव् दे पाटाला काय् फोर्पळी बनाला
फोपळीची फोफ्ळा येव् यें देवाच्या पूजेला
उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला ॥ ४ ॥

उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला
बैल् जुप् रे राटाला पानि जाउ दे पाटाला
पानी जाव् दे पाटाला काय् नागवेली बनाला।
नागवळीची पाना येव् य देवाच्या [११]पूजेला
उट् उट् रे माळ्युवा बैल् जुप् रे राटाला ॥ ५ ॥

## गीत ३

किती [१]करशीव् ठाकम् टिकम् कंपणि, टिकली जी
चल माझ्या ग देशावरी ऊस जो पिकलाय् जी ॥ १ ॥
किती करशीव् [२]ठाकम् टिकम् [३]कंपणि टिकली जी
चल माझ्या ग देशावरी ज्वारी जो पिकलाय् जी ॥ २ ॥
किती करशीव् ठाकम् टिकम् [३]कुंपणि, टिकली जी
चल माझ्या ग देशावरी गऊ जो पिकलाय् जी ॥ ३ ॥
किती करशीव् ठाकम् टिकम् कंपणि, टिकली जी
हाय् माझ्या ग देशावरी तांदळ जो पिकलाय् जी ॥ ४ ॥
किती करशीव् ठाकम् टिकम् कंपणि, टिकली जी
हाय् माझ्या ग देशावरी बदाम जो पिकलाय् जी ॥ ५ ॥
किती करशीव् ठाकम् टिकम् कंपणि, टिकली जी
हाय् माझ्या ग देशावरी नारळ जो पिकलाय् जी ॥ ६ ॥
किती करशीव् ठाकम् टिकम् कंपणि, टिकली जी।
हाय् माझ्या ग देशावरी पोफळ जो पिकलाय् जी ॥ ७ ॥

---

१० ग्रामदेवता. या वाग्जाय् देवीचा पुजारी गुरव किंवा मराठा कुणबी असतो. चैत्र व फाल्गुनात तिची मिरवणूक निघते. पेरणी, कापणीच्या वेळी जत्रा. कोंबड्या, बोकड, नारळ, फळे देवीला अर्पण करतात.

१ उठ. २ ज–तालव्य ३ राट, न्हाट=रहाट ४ काही ५ बदामाचे झाड ६ बदाम ७ लिंबाच्या ८ पोफळ ९ सुपाऱ्या १० नागवेल, विड्याची पाने ११ कुणब्यांच्या देवता व पूजेची पद्धतीः पाहा– Folklore of Konkan Vol. II Page 25

A. M. T. Jackson & R. E. Enthoven

१ ' करशील २ ठोकठोक, धडपड, ठाकठोक ३ कुंपण ' असा अर्थ असावा. गुरांपासून रक्षण करण्यासाठी शेताला मळ्याला कुंपण हवे. कुंपण घालताना ठाकठोक करावी लागते. ही धडपड अभिप्रेत असावी. कुंपणि, कंपणि ही अपभ्रष्ट रूपे. ४ एकीकडून दुसरीकडे उचलून लावावयाचे रोप. तांदुळाची लावणी करावी लागते. भातशेतीतील दगदग, जिकीर येथे सुचवली असावी. ५ हाय=आहे. येथून पुढच्या भागास कुणबी आपल्याकडेही देशावरची सुबत्ता नसली तरी पुरेशी पिके निघतात ती कोणती हे सुचवितो. इतरांना वाटणारी त्याच्या कष्टाविषयीची अनुकंपा आणि त्याचा स्वतःचा स्वाभिमान या गाण्यात व्यक्त होतो.

•••

# मराठी साहित्य महामंडळाचे शुद्धलेखनविषयक नियम :

## अडचणी, उणिवा व अपेक्षा

◆ मो. रा. वाळंबे ◆

मराठी साहित्य महामंडळाने शुद्धलेखनविषयक आपली चौदा कलमी नियमावली २ ऑक्टोबर १९६१ रोजी निश्चित केली. महाराष्ट्र राज्य सरकारने २० सप्टेंबर १९६२ च्या एका ठरावाने तिला मान्यता दिली; व हे नियम शिक्षणाच्या सर्वच स्तरांत तावडतोब अमलात आणण्याबाबत आदेशही दिला. आज शिक्षणखाते क्रमिक पुस्तकांना मंजुरी देताना ती या नव्या लेखनविषयक नियमांना अनुसरून छापली आहेत का नाही इकडे कटाक्षाने पाहते; पण हे नियम शाळाकॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या अंगवळणी पडण्याच्या दृष्टीने सदर खात्याने कोणतीच योजना आखलेली नाही. यांतील कोणते नियम कोणत्या वर्गांना शिकवावेत, त्या वर्गांतून बाहेर पडलेल्या प्रशालांतील व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांना कोणत्या वेळी व कोणत्या पद्धतीने ते शिकवावे व एकाच वेळी शिक्षणक्षेत्राच्या सर्व स्तरांतील विद्यार्थ्यांचे व शिक्षकांचे लेखन या नव्या लेखनविषयक नियमांना अनुसरून होते की नाही हे अजमावून पाहण्यासाठी काय उपाययोजना करावी याचा विचार झालेला दिसत नाही. तसेच शालाबाह्य क्षेत्रांतही या नियमांचे पालन होणे आवश्यक आहे. आज अशी परिस्थिती आहे की शाळेतील क्रमिक पुस्तके लेखनविषयक नव्या नियमांस अनुसरून छापलेली, शिक्षक आपापल्या मर्जीनुरूप नव्या व जुन्या नियमांप्रमाणे लिहिणारे, वर्तमानपत्रे व इतर पुस्तके प्रामुख्याने जुन्या नियमांप्रमाणे छापलेली, पाट्या, जाहिराती व पत्रके यांना कोणताच धरबंध नाही—अशा परिस्थितीत नव्या पिढीचे लेखन सुधारणार कसे? ही जबाबदारी कोणाची? शाळाकॉलेजांची का म. सा. महामंडळाची का राज्य-सरकारची? म. सा. महामंडळाने काही नियम सुचविले व सरकारला सुपूर्त केले. महामंडळाची जबाबदारी येथे संपली का? शिक्षणखात्याने हे नियम स्वीकारले व आदेश दिला. शिक्षणखात्याची एवढीच का जबाबदारी? या नियमांत अनेक उणिवा राहून गेल्या आहेत. या नियमांप्रमाणे लेखन करताना अनेक अडचणी येतात. विशेषतः जुन्या लेखनविषयक नियमांप्रमाणे छापलेले ग्रंथ या नव्या नियमांप्रमाणे दुरुस्त करून परत छापावयाचे तर कितीतरी अडथळे येतात. गद्यपद्यवेच्यांच्या पुस्तकांतून नव्या लेखकांच्या उताऱ्यांबरोबर प्राचीन वाङ्मयातील उतारे निवडलेले असतात. हे उतारे त्या त्या वेळच्या लेखनपद्धतीप्रमाणे मुळात असतात. हे उतारे क्रमिक पुस्तकांत छापताना कोणते धोरण ठेवावे याबद्दल म. सा. महामंडळाकडून किंवा शिक्षणखात्याकडून मार्गदर्शन व्हावयास हवे, एवढेच नव्हे तर अशा येणाऱ्या शंकांचे वा अडचणींचे निराकरण करण्यासाठी या विषयांच्या जाणकारांची एक समिती कायमची नेमावी व तिच्यामार्फत अडचणींचे निराकरण व योग्य ते मार्गदर्शन व्हावयास हवे. अशी कोणतीच गोष्ट अद्यापपर्यंत झालेली दिसत नाही.

हे म. सा. महामंडळाचे नियम प्रथम जेव्हा प्रसिद्ध झाले त्या वेळी शुद्धलेखनाच्या वादाचा परामर्ष घेऊन या नियमांतील उणिवांचे मी दिग्दर्शन केले होते (मनोहर, सप्टेंबर १९६२). त्या वेळी या नियमांविरुद्ध वर्तमानपत्रांतून व मासिकांतून खूपच ओरड व चर्चा झाली. याला प्रत्युत्तर म्हणून म. सा. महामंडळाने प्रथम प्रसिद्ध केलेल्या केवळ चौदा नियमांना स्पष्टीकरणे जोडून म. सा. परिषदेतर्फे महामंडळाच्या 'लेखनविषयक नियमां'ची एक पुस्तिका प्रसिद्ध केली. हे नियम शासनाने मान्य करून त्यांच्या अमलबजावणीची पावले टाकल्यानंतर मात्र आता वाद करत न राहता आहे या परिस्थितीत त्यांचा स्वीकार करावा व हळूहळू त्यांत राहिलेले दोष काढून टाकावेत या अपेक्षेने म. सा. पत्रिकेत 'नव्या शुद्धलेखनाचे स्वागत' मी केले (एप्रिल १९६३). या वेळी अशी अपेक्षा होती की अनेक विद्वानांनी आपापल्या लेखांतून यातील

अनुक्रमणिका



जी दोषस्थळे, ज्या उणिवा व जो धरसोडपणा दाखविला होता त्यांचा विचार करून म. सा. महामंडळ हे दोष काढून टाकण्याचा प्रयत्न करील. तसेच जुन्या नियमांप्रमाणे केलेले लेखन नव्या नियमांप्रमाणे रूपांतरित करताना कोणत्या अडचणी येतात याचे दिग्दर्शन करण्यासाठी ' लेखनाच्या नव्या नियमांतील ठळक अडचणी ' हा लेख लिहून (मनोहर, जानेवारी ६६) मी विद्वज्जनांपुढे त्या मांडल्या व म. सा. महामंडळाकडेही तो लेख पाठविला. म. सा. महामंडळाने त्याबाबत अद्याप काहीच हालचाल केलेली नाही. आज अनेक लेखकांनी म. सा. महामंडळाच्या नियमांचा आपापल्या मर्जीप्रमाणे अर्थ लावून तसे लेखन करण्याला सुरुवातही केली आहे. यामुळे शुद्धलेखनाचा प्रश्न सुकर न होता अधिक गोंधळाचाच होण्याचा संभव आहे म्हणून मी पुन्हा एकवार सदर अडचणी व उणिवा यांचे थोडक्यात दिग्दर्शन करण्याचे येथे ठरविले आहे.

### (१) प्राचीन साहित्याची लेखनपद्धती

यातील पहिली अडचण ही की प्राचीन कवींनी किंवा लेखकांनी त्या त्या वेळच्या लेखनपद्धतींप्रमाणे जे लेखन केले ते या नव्या नियमांप्रमाणे बदलून आता छापावयाचे का ? बदलावे तर जुन्या वाङ्मयाच्या लेखनपद्धतीची जी वैशिष्ट्ये आहेत तीच नष्ट करावी लागतील. काहींचे म्हणणे असे की ते बदलावयास हरकत नाही. ज्या नियमांनुसार ती छापलेली आढळतात तसे ज्ञानेश्वर आदी कवींचे मूळ लेख असतील कशावरून ? पुष्कळसे जुने वाङ्मय मोडी लिपीतून बालबोधात छापले आहे. छापणाऱ्यांनी ते त्या वेळी रूढ असलेल्या लेखनविषयक नियमांप्रमाणे छापले असण्याचा संभव आहे म्हणून आज जर आपण नव्याने ते उतारे छापत असू तर आजच्या लेखनविषयक नियमांना अनुसरून छापावयास हरकत नसावी. पुणे विद्यापीठ व एस्. एस्. सी. परीक्षामंडळ यांनी आपली क्रमिके प्रसिद्ध करताना आपल्यापुरता एक दंडक स्वीकारला आहे. तो म्हणजे केशवसुतपूर्वकालीन काव्य व चिपळूणकरपूर्वकालीन गद्य जुन्या लेखनाप्रमाणेच छापावे, ते बदलू नये. मात्र त्यापुढील लेखन नव्या नियमांप्रमाणे छापावे. अशा पद्धतीने छापलेल्या पुस्तकांतील काही वेचे जुन्या नियमांप्रमाणे तर काही नव्या नियमांप्रमाणे अशा धेडगुजरी पद्धतीने छापले असल्यामुळे वाचकांचा विशेषतः विद्यार्थ्यांचा गोंधळ उडतो. हा दंडक महामंडळाला मान्य आहे का ? शिवाय नव्या लेखकाच्या एखाद्या उताऱ्यात प्राचीन कवीचे अवतरण आल्यास किंवा एखादे लोकगीत असल्यास ते वेगवेगळ्या नियमांस अनुसरून लिहावे का ?

(२) मूळ लेखात **अशुद्ध स्वरूपात छापलेला शब्द शुद्ध करावा का** ? विशेषतः बन्नर वाङ्मयात ' महत्व, एकादा, उज्ज्वल, आशिर्वाद, सूज्ञ, लाऊन ' अशांसारखे शब्द अनेक आढळतात. ते परत छापताना शुद्ध स्वरूपात छापावेत का?

### (३) पद्यातील ऱ्हस्व-दीर्घाबाबत :—

वृत्तदोष टाळण्यासाठी अक्षरवृत्तांत व मात्रावृत्तांत ऱ्हस्वदीर्घांकडे दुर्लक्ष करावे लागते हे खरे; पण छंदालाही हाच नियम लागू करणे इष्ट आहे का ? कारण छंदात प्रत्येक अक्षर दीर्घान्त उच्चारले जाते. अशा वेळी ऱ्हस्वान्त किंवा दीर्घान्त ठेवल्याने शुद्धता साधत असेल तर तशी दुरुस्ती करावी का ? उदा० किति चातक चोचीने ।

प्यावा वर्षाऋतु तरी ॥

या पद्यपंक्तीतील ' किति ' व ' ऋतु ' हे दीर्घान्त ठेवणे वृत्ताच्या व शुद्धतेच्या दृष्टीने अधिक योग्य नव्हे का ? किंवा ' सौंदर्यपिपासा वाढवीली ' या चरणातील 'वाढवीली' हा शब्द शुद्ध स्वरूपात असणे इष्ट नव्हे का ?

### (४) व्यंजनान्त शब्दांच्या लेखनाबाबत :—

क्वचित्, कदाचित्, अर्थात्, परिषद्, यांसारखे मराठीत रूढ झालेले तत्सम शब्द पूर्वीप्रमाणे व्यंजनान्त (म्ह. शेवटच्या अक्षराचा पाय मोडून) न लिहिता आता ते स्वरान्त लिहावयाचे आहेत. तत्समेतर शब्दांबाबत काय करावयाचे ? थॉमस्, विल्, जिल्, ही आंग्ल विशेषनामे व्यंजनान्त लिहावयाची का स्वरान्त ? अलबत्, आलोच्, अन् अशासारख्या शब्दांचे काय ? तसेच, सकृत्दर्शनी, पिढ्यान्‌पिढ्या या जोड शब्दांबाबत कोणते धोरण स्वीकारावयाचे ?

### (५) परसवर्णाबाबत :—

' अनुनासिकाबद्दल विकल्पाने परसवर्ण लिहिण्यास हरकत नाही, ' असा मूळ नियम आहे. हा विकल्प फक्त तत्सम शब्दांनाच दिला असल्याचे स्पष्टीकरण मागाहून देण्यात आले आहे. सुकरतेच्या दृष्टीने पाहता हा नियम नसता तर बरे झाले असते. 'गीतांजलि, पंचगंगा, रंगमंदिर' हे शब्द 'गीताञ्जलि, पञ्चगङ्गा, रङ्गमन्दिर' असे लिहिल्याने विद्यार्थ्यांना वाचताना घोटाळ्याचे होते. माझ्या मते परसवर्णाच्या ऐवजी अनुस्वार देणे हे लेखनाच्या दृष्टीने

अधिक सोयीचे होय. मात्र वृत्तांत, शालांत, वेदांत हे शब्द व्यर्थी असल्यामुळे वृत्तान्त, शालान्त, वेदान्त असेच लिहिणे योग्य.

(६) विरामचिन्हे :--

विरामचिन्हांचा विचार म. सा. मंडळाने काहीच केलेला नाही. लिहिलेले लेखकाच्या मनातील आशयाप्रमाणेच वाचावयाचे असल्यास विरामचिन्हांचा खूप उपयोग होतो. केव्हा केव्हा जेथे अर्धविराम हवा तेथे स्वल्पविराम असतो, जेथे पूर्णविराम किंवा अपूर्णविराम हवा तेथे केवळ अपसारणचिन्ह दिलेले असते. एकेरी अवतरणाऐवजी केव्हा केव्हा दुहेरी अवतरण दिले गेले असते. यासाठी लेखन-विषयक नियमांत विरामचिन्हांचा समावेश अवश्य हवा.

(७) राहणे, पाहणे, वाहणे हे शब्द कसे लिहावे याबाबत म. सा. परिषदेच्या नियमांत स्पष्ट उल्लेख होता. म. सा. महामंडळाने या बाबत मुग्धता पाळलेली आहे. रहा, वहा, पहा हे उच्चारानुसारित्वाच्या तत्त्वाप्रमाणे राहा, वाहा, पाहा या शब्दांपेक्षा अधिक शुद्ध मानायला हवेत. याबाबत स्पष्ट मार्गदर्शन हवे.

(८) अकारान्त लेखनाबाबत :--

बोलताना नपुंसकलिंगी एकारान्त उच्चाराऐवजी आपण सानुनासिक अकारान्त उच्चार करतो. उदा० त्याचं म्हणणं असं होतं. 'लेखनात पात्राच्या किंवा वक्त्याच्या तोंडी बोलण्याची भाषा घालावी लागते. त्या वेळी तिचे स्वरूप बोलण्यातील उच्चाराप्रमाणे असावे. अन्य प्रसंगी तसे लिहू नये' हा झाला म. सा. महामंडळाचा नियम. उच्चारानुसारी आपले लेखन शक्य तो असावे या तत्त्वाला या नियमाने बाध येत नाही का? आकाशवाणीसाठी लिहिले जाणारे लिखाण म. सा. महामंडळाच्या नियमानुसार चालत नाही. व्यासपीठावरील भाषणे या नियमानुसार छापावयाची तर ती कृत्रिम वाटतात.

(९) अत्यंत घोटाळ्याचा झालेला नियम :—

'तत्सम (न्हस्व) इकारान्त आणि उकारान्त शब्द प्रथमेत दीर्घान्त लिहावे. उदा. कवी, मती, गुरू.' हा नियम बराच घोटाळ्याचा व विवाद्य होऊन बसला आहे. हे शब्द मराठीच्या स्वभावानुसार बहुधा दीर्घान्त उच्चारले जातात म्हणून प्रथमेत व अप्रत्ययी द्वितीयेत ते दीर्घान्त लिहावे असा या नियमाचा अभिप्राय आहे असे स्पष्टीकरण महामंडळाने दिले आहे. याचाच अर्थ असा की हे शब्द वाक्यात वापरले असता दीर्घान्त लिहावे व सुटे वापरले असता मुळाप्रमाणे न्हस्वान्त लिहावे. उदा० 'कालिदास हा कवी होता.' एखाद्या लेखाचे किंवा ग्रंथाचे नाव 'कवि कालिदास' असे असेल तर तेथे 'कवि' हा शब्द न्हस्व असावयास हवा.

अनेकांना हा नियम समजलेला नाही किंवा मान्य नसावा. त्यांच्या मते हे शब्द मराठीच्या उच्चारानुसार केव्हाही दीर्घान्तच हवेत. डॉ. वि. भि. कोलते यांनी तर आपल्या 'मराठी दीपिके'त 'महामंडळाचा हा नियम फार मोठा बदल घडवून आणणारा आणि म्हणून महत्त्वाचा आहे' असे सांगून 'पुढील तत्सम संस्कृत शब्द मुळात न्हस्व इकारांत आहेत. पण म. सा. महामंडळाच्या नियमानुसार ते यापुढे नेहमी दीर्घान्त लिहावे' असे स्पष्ट म्हटले आहे. उदाहरणादाखल दिलेल्या तत्सम इकारान्त व उकारान्त शब्दांत 'कवी, रवी, हरी, सृष्टी, नीती, प्रीती' वगैरे शब्द आहेत. महामंडळाच्या नियमातील 'प्रथमेत' हा शब्द अधिक स्पष्टपणे मांडावयास हवा होता. महामंडळाने या नियमाला दिलेल्या स्पष्टीकरणात असे स्पष्ट म्हटले आहे: 'तत्सम न्हस्वान्त शब्द मुळामध्ये न्हस्वान्तच आहेत ही भूमिका येथे मान्य आहे....... प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यये लागलेली नसतानाही मराठीच्या स्वभावानुरूप ते बहुधा दीर्घान्त उच्चारले जातात. म्हणून प्रथमेत आणि अप्रत्ययी द्वितीयेत असता ते दीर्घान्त लिहावे असा या नियमाचा अभिप्राय आहे.' म. सा. महामंडळाने हा नियम अधिक स्पष्ट करून सांगावयास हवा. या नियमातील 'प्रथमेत' या शब्दाकडे अनेकांचे दुर्लक्ष झाले आहे. 'शुद्ध कसे लिहावे' या आपल्या पुस्तिकेत श्री. मांडवकरांनी तर हा नियम पुढीलप्रमाणे दिला आहे:

'पुढील शब्दांमध्ये आलेले शेवटचे अक्षर नेहमी दीर्घ लिहावे. कारण शेवटचे अक्षर दीर्घ लिहावे ही मराठीची प्रवृत्ती असून तसा नियम आहे.' पुढे दिलेल्या दीडएकशे तत्सम इकारान्त व उकारान्त शब्दांत 'कवी, रवी, हरी, गुरू, धनू, मृत्यू' आदी शब्द आहेत. अशा नियमामुळे वाचकांचा घोटाळा होणार नाही का?

उच्चारानुसारित्वाच्या तत्त्वाप्रमाणे जर इकारान्त व उकारान्त तत्सम शब्द वाक्यात दीर्घान्त लिहावयाचे तर 'परंतु, अद्यापि, तथापि' आदी तत्सम अव्यये न्हस्वान्त लिहिण्याबद्दल अपवाद का?

( १० ) सामाजिक शब्दांतील इकार–उकार.

सामासिक शब्दातील पहिले पद इकारान्त किंवा उकारान्त तत्सम शब्द असेल तर ते ऱ्हस्वान्त लिहावे असा एक नियम आहे. उदा० कविराज, गुरुवर्य, बुद्धिवैभव. पण सामासिक शब्दातील पहिले पद ( दीर्घ ) ईकारान्त किंवा ऊकारान्त तत्सम शब्द असेल तर मूळ संस्कृत शब्दाप्रमाणे ते दीर्घान्तच लिहावे असा नियम द्यावयास हवा होता. उदा० लक्ष्मीपुत्र, गौरीहर, श्रीधर, भूगोल.

(११) उपान्त्य इकारान्त व उकारान्त शब्द कसे लिहावेत याबद्दल जे नियम दिले आहेत ते तत्सम शब्दांना लागू नाहीत. म्हणजे गुण, विष, मंदिर, चतुर, सुख, पूजा, पीडा, शरीर, परीक्षा, वगैरे शब्दांचे लेखन करताना मराठीचे नियम यांना लागू करावयाचे नाहीत. ते मुळाप्रमाणे ऱ्हस्वान्त किंवा दीर्घान्तच राहतात. येथे मराठी बोलणाऱ्याला किंवा शिकणाऱ्याला संस्कृतचे ज्ञान आवश्यक मानले आहे.

म. सा. महामंडळाने उच्चारानुसारित्वाचे तत्त्व काही ठिकाणी पाळले आहे. तर काही ठिकाणी झुगारले आहे. यामुळे ऱ्हस्वदीर्घांबाबतच्या नियमांत बरेच शैथिल्य आले आहे. जोडाक्षरे, धातुसाधिते, विरामचिन्हे वगैरेबाबत म. सा. महामंडळाच्या लेखनविषयक नियमांत काहीच तरतूद नाही.

या नियमांबाबत माझी भूमिका भाषाशास्त्रज्ञाची नाही, परंपरावाद्याची नाही किंवा व्याकरणवाद्याचीही नाही. ती पुष्कळशी व्यवहारवाद्याची आहे. साक्षरांना व शाळा कॉलेजांतील विद्यार्थ्यांना सहज समजावून देता येण्यासारखे, लेखन, मुद्रण व टंकलेखन या दृष्टीनेही हे नियम जितके सोपे, सहज व स्पष्ट असतील तितके असावेत व सर्वांनी अशा नियमांस अनुसरून निर्दोष लिहावे असे मला वाटते.

भाषा ही प्रवाही आहे. कालपरत्वे तिच्यात बदल होत जाणारच. एका कालखंडात वापरला जाणारा शब्दप्रयोग कालांतराने दुर्बोध वाटू लागतो. असे होणे अपरिहार्य आहे. जी भाषा जिवंत आहे म्हणजे जी भाषा आजही सतत बोलली जाते तिच्यात कालपरत्वे बदल होत राहणार. भाषा बदलत चालली म्हणजे तिच्या लेखनपद्धतीतही बदल होणे साहजिक आहे. कालांतराने आजचे हे नियमही बदलावे लागतील, पण माझ्या मते एकदा नियम बदलले म्हणजे शिक्षण पूर्ण होईपर्यंत म्हणजे निदान १० वर्षे तरी त्यांत बदल होणार नाही, एवढी तरी विद्यार्थ्याला हमी हवी. नाहीतर आजचे नियम पुढील वर्षी बदलणार नाहीत कशावरून ? असे वाटून विद्यार्थी व शिक्षक त्यांकडे दुर्लक्ष करतील. खानेसुमारी दर १० वर्षांनी होऊन त्यात त्याच वर्षी बदल केला जातो. मध्यंतरीची वाढती लोकसंख्या जमेस धरावयाची नसते. तद्वत दर १० वर्षांनी शुद्धलेखन-सुधारणा-समितीची बैठक घ्यावी. मध्यंतरीच्या काळात झालेला भाषेतील बदल लक्षात घेऊन त्यावरील विचाराच्या अनुरोधाने काही नियमांत दुरुस्ती करणे व त्यांत बदल करणे आवश्यक झाल्यास तसा बदल करावा व सर्वांनी तो आनंदाने पाळावा.

म. सा. महामंडळाने आपली चौदा कलमी नियमावली सरकारला सादर केली व महाराष्ट्र शासनाने मान्य करून ती ताबडतोब अमलात आणण्याबद्दल परिपत्रकद्वारे आदेश दिला एवढ्यावर भागत नाही. या नियमांत बरीच अपूर्णता आहे. काही नियम स्पष्ट नाहीत, काही संदिग्ध आहेत. ह्या नियमांची अंमलबजावणी करताना येणाऱ्या अडचणींचे वेळोवेळी निराकरण करणारी एखादी यंत्रणा हवी. माझ्या मते या नियमावलीत ज्या उणिवा वा अडचणी वाटल्या त्यांतील काही ठळक उणिवा मी येथे मांडल्या आहेत. म. सा. महामंडळाने या बाबतीतला आपला दृष्टिकोण काय आहे हे एकवार स्पष्ट करावे, म्हणजे ही नवी लेखनपद्धती अनुसरताना सर्वत्र एकसूत्रता राहील व सर्वांनाच मार्गदर्शन होऊ शकेल.

• • •

अनुक्रमणिका

# टिंपणे

## ( १ ) केशवसुत आणि हिन्दी

जुलै एकोणिसशे सहासष्टच्या ' मराठी संशोधन पत्रिके '-च्या पाचव्या पृष्ठावर केशवसुतांच्या कवितांच्या हस्त-लिखितांची माहिती आहेः-

" ( इ ) काही स्वकृतवचने या कवितेच्या चवरख्याच्या पाठीवर हे हिंदी चुटके लिहिलेले आहेत.

( १ ) सूर सूर तुलसी ससी उडुगण केसव और
अबके कवि खद्योत भये चमकत टोरहि टोर

( २ ) पग धरत चिन्ता करत तेक न साहे शोर
सुवर्णकू धूंढत फिरे कवि व्यभिचारी चोर.

दुसऱ्या दोहऱ्यांतील ' तेक ' आणि ' शोर ' हे शब्द अधोरेखित करून त्यांचे अर्थ बाजूला अनुक्रमें ' थोडा ' आणि ' गलबला ' असे लिहिलेले आहेत. हे चुटके बहुधा कवीला भाषांतरित करावयाचे असावे "

यावरून केशवसुतांना हिन्दी समजत होते आणि हिन्दी साहित्यांत त्यांना रुची होती असे वाटते- 'प्रीति' या त्यांच्या गीतामधील ' प्रीति मिळेल का हो बाजारी ? प्रीति मिळेल का हो शेतात ? ' या ओळींचे कबीरांच्या ' प्रेम न बाडी ऊपजे, प्रेम न हाट विकाय ' या दोह्याशी असलेले साम्य ' समग्र केशवसुतां'च्या तीनशे अठराव्या पृष्ठावर दाख-विण्यात आले आहे. ' त्वत्प्रीतिस अपात्र हा जन ' या कवितेतदेखील ' मेरीजान गुलनार ! ' हे संबोधन हिंदी आहे.

हिन्दी या भरतखंडातील खंडभाषा असल्यामुळे ती बहुतेकांना थोडीफार समजते* तशी ती केशवसुतांना समजत असावी. केशवसुतांनी वरील दोह्याचे भाषांतर केलेले नाही. ते दोहे हिन्दी साहित्यात सुभाषिताच्या स्वरूपात प्रचलित आहेत. त्यांचे भिन्न भिन्न पाठभेद आढळतात. त्यांपैकी पहिल्या दोह्याचा एक पाठ असा—

सूर सूर, तुलसी ससी, उडुगण केशवदास,
अबके कवि खद्योतसम जहँ तहँ करै प्रकासः*

या दोह्यात सूरदास, तुलसीदास आणि केशवदास या प्राचीन हिंदी कवींची प्रशंसा आहे आणि अर्वाचीन कवींचा परिहास आहे. ' हिन्दी साहित्याच्या नभोमंडळात सूरदास सूर्य आहेत, तुलसीदास चंद्र आहेत आणि केशवदास तारकांचा पुंज आहेत. मात्र प्रचलित कवी जिथे तिथे काजव्यांप्रमाणे उजेड पाडत असतात. ' केशवसुतांचा ' उडु-गण केसव और ' हा पाठ अर्थदृष्ट्या अधिक सरस आहे. कारण ' उडुगण ' या शब्दाने अनेकत्वाचा बोध होत असल्यामुळे " केशवदास आणि ' और ' म्हणजे ' इतर कवी ' " असे म्हणणे उचित आहे. तद्वत केशवसुतांचा ' चमकत ठौरहि ठौर ' हा पाठदेखील विशेष सुंदर आहे. ' जिथे जिथे प्रकाश पाडतात ' असे म्हणण्यापेक्षा ' जाग-जागीं ( उगाच ) चमकत ( फिरतात ) ' हे सुचविण्यात परिहासाची धार अधिक तीव्र होते. मात्र केशवसुतांच्या पाठात रचनादृष्ट्या मात्रादोष आहेत आणि शुद्धलेखन हिन्दी पद्धतीला धरून नाही. दोन्ही पाठ जमेस धरून हा दोहा या स्वरूपात सरस व सुंदर वाटेल—

सूर सूर, तुलसीसी, उडुगण केसव, और
अबके कवि खद्योतसम चमकत ठौरहि ठौर.

वरील दोह्यांपैकी दुसऱ्या दोह्याचा केशवसुतांचा पाठ रचनादृष्ट्या, लेखनदृष्ट्या आणि अर्थदृष्ट्या सदोष आहे. त्याचा शुद्ध पाठ असा :—

चरन धरत, चिन्ता करत, चितवत चारिहु ओर
सुबरनको खोजत फिरत कवि, व्यभिचारी, चोर.

ह्या दोह्यात ' सुबरन म्हणजे सुवर्ण ' या शब्दावर श्लेष आहे. कवीच्या दृष्टीने ' सुवर्ण ' म्हणजे ' चांगली अक्षरे ', व्यभिचारी मनुष्याच्या दृष्टीने ' सुवर्ण ' म्हणजे ' गोरा गोमटा रंग ' आणि चोराच्या दृष्टीने ' सुवर्ण ' म्हणजे ' सोने '. हे तिघेही ' सुवर्णा 'च्या शोधात कसे मग्न

---

*हिन्दीला ' खडी बोली ' म्हणतात; ते बहुधा ती ' खंड भाषा ' म्हणून म्हणत असावेत. ' खडी ' हे ' खंड'चे प्राकृत रूप आहे. ' खंडशर्करा ' म्हणजे ' खडीसाखर ' हे प्राकृत रूप महाराष्ट्राच्या परिचयाचे आहे.

*हिंदी कविता कौमुदी. भाग १ द्वितीय संस्करण. पृष्ठ ६३.

असतात त्या कृतीचे या दोह्यात स्वभावोक्त वर्णन आहे. हे तिघेही कुणाला चाहूल लागणार नाही अशा रीतीने पावले टाकतात, यांची मने कुणी बघत तर नाही ना या चिंतेने व्याप्त असतात आणि हे चोहीकडे अगदी बारीक नजर टाकून उत्तम अक्षरे, गौर वर्ण आणि सोनेनाणे यांना धुंडत फिरत असतात. केशवसुतांना कदाचित या दोह्यातील अर्थ-चमत्कृती व कल्पनाचमत्कृती आवडली असावी.

'उत्तेजनाचे दोन शब्द', 'दिवस आणि रात्र', 'कांट्यावाचुनि गुलाब नाहीं', 'निशाणाची प्रशंसा' आणि 'गोफण केली छान' या कवितांसाठी केशवसुतांनी 'दोहा' हे मात्रिक वृत्त योजिले आहे. ते कदाचित त्यांना या दोह्यांवरून स्फुरले असावे. मोरोपंतांनी हे हिन्दी वृत्त प्रथम मराठीत आणले, हे 'महाराष्ट्र भाषेत ही दोहारीति नवीच' या त्यांच्या उद्गारांवरून स्पष्ट आहे. महादेवशास्त्री कोल्हटकरांनीही आपल्या बालबोध कवितांसाठी दोहा योजिला आहे. दोह्याच्या विषम चरणात तेरा व सम चरणात अकरा मात्रा असतात आणि चरणाच्या अंती गुरु आणि लघू अशी अक्षरांची योजना असते. केशवसुतांचे थोडेसे दोहे या कसोटीवर उतरतात. केशवसुत दोहा रचताना यतीचा विचार करतात, परंतु गतीचा विचार करीत नाहीत. त्यामुळे ते म्हणताना वाणीचा प्रवाह अनिरुद्ध राहात नाही.

या दोह्यांवरून केशवसुतांच्या सर्वसंग्राहक वृत्तीचा प्रत्यय येतो. संस्कृत आणि इंग्रजी या भाषांशी त्यांचा परिचय होता. परंतु इंग्रजी माध्यमातून ते Victor Hugo, Theophile Gautier, Boileau या फ्रेंच आणि Goethe या जर्मन साहित्य निर्मात्यांच्या कृतींचा आस्वाद घेतात; आणि आपल्या देशातील हिन्दी साहित्याचा रस सेवन करताना स्वतःचा मार्ग अनुसरतात. त्यांच्या कवितांचे सूक्ष्म परिशीलन केल्यास त्यांच्या व्यासंगावर अधिक प्रकाश पडण्याची शक्यता आहे.

—भवानीशंकर पंडित



## साभार-स्वीकार

**प्रासाद आम्हा बंदिशाळा** (स्मृतिचित्रे) : द. म. सुतार, सोमैया पब्लिकेशन्स, मुंबई १४; ५ रु.

**थोरला** (कथा) : मुरलीधर कुलकर्णी, सोमैया पब्लिकेशन्स, मुंबई, १४; ५ रु.

**वेगळे जग** (इंग्रजी ग्रंथ-परिचय) : सुधाकर राजे, सोमैया पब्लिकेशन्स, मुंबई १४; ७ रु.

**निवडक एकांकिका १९६५** : संपादन श्री. र. भिडे, सोमैया पब्लिकेशन्स, मुंबई १४; १२ रु.

# परीक्षणे

## मरालिका

लेखिका–**सुधा नरवणे**, देशमुख आणि कं., पुणे २; ६ रु.

'मरालिका' हा सुधा नरवणे यांचा पहिला कथासंग्रह. आज कथा, कादंबरी, नाटक, कविता असे सर्व वाङ्मय-प्रकार स्त्रिया यशस्वीपणे हाताळीत आहेत. 'स्त्रियांचे लेखन' ही काही आता केवळ नाविन्याची आणि कौतुकाची बाब उरलेली नाही. पण तरीही आपल्या पहिल्याच लेखनकृतीने महत्त्वाचे स्थान मिळविणाऱ्या लेखिका नेहमीच मोजक्या राहिल्या आहेत. 'मरालिके'मुळे सुधा नरवण्यांना अशा मोजक्या लेखिकांत स्थान मिळेल असे वाटते. मात्र या संग्रहाच्या शेवटी जोडलेल्या "मरालिकेच्या निमित्ताने" या लेखात सुचविल्याप्रमाणे सुधा नरवणे यांचा समावेश काशीताई कानिटकर, कमलाबाई टिळक, कुसुमावतीबाई देशपांडे व विभावरी शिरूरकर या मालिकेत इतक्यातच करणे धाडसाचे ठरेल. कारण सुधा नरवणे यांचे कथालेखन पूर्णपणे विकसित झाले आहे असे अजून म्हणता येत नाही.

'मरालिके'मधे समाविष्ट झालेल्या एकूण १४ कथा वाचल्यानंतर मुख्यतः याची जाणीव होते की या कथेतील अनुभव एका विशिष्ट वर्गाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या स्त्रीचे आहेत. स्त्रीसुलभ भावनोत्कटता आणि तरलता यांनी हे अनुभव परिपूर्ण आहेत. स्त्रीचे अनुभव म्हटल्यावर जी मर्यादा पडावयाची ती या अनुभवांतून जाणवली तरी या मर्यादा ओलांडण्याचा प्रयत्नही लेखिकेने अनेकदा केला आहे, याचीही जाणीव झाल्याशिवाय राहात नाही. त्याच त्याच प्रकारच्या अनुभवांचे साचे करून त्यातच ही लेखिका रमली आहे असे कुठेही दिसत नाही.

आजपर्यंतच्या मराठी लेखिकांप्रमाणे सुधा नरवण्यांच्या कथांतूनही मध्यमवर्गीय पांढरपेशा स्त्रीजीवनाचेच दर्शन घडते. कन्या म्हणून, पत्नी म्हणून, आई किंवा सासू म्हणून या स्त्रीचे व्यक्तित्व जाणवत राहते.

'ओढ' या पहिल्याच कथेतून लेखिकेने एका माहेरवासिनीच्या भावना अतिशय सहृदयतेने चित्रित केल्या आहेत. पुणे ते मद्रास या प्रवासाचाही त्यातल्या मार्मिक निरीक्षणासह करून घेतलेला उपयोग या ओढीची परिणामकारकता वाढवतो. ओढ, झोपाळा, दीपगृह यांसारख्या अनेक कथांतून त्यातल्या प्रत्ययकारितेमुळे आपण आपलीच कुटुंबचित्रे पाहात आहोत असे वाटते. आपल्या छोट्या छोकरीच्या अकाली निधनाचे दुःख एकाकीपणाने सोसत राहिलेला 'एकटा' मधील अच्युत ही व्यक्तिरेखाही अतिशय समर्थपणे साकार झाली आहे. एखाद्या पित्याचे दुःख इतक्या हळुवारपणे क्वचितच कोणी चित्रित केले असेल!

'राजहंस' आणि 'ख्रिस्तजन्म' या दोन कथा सुधा नरवण्यांच्या कथालेखनाची झेप केवढी मोठी आहे हे सिद्ध करणाऱ्या आहेत. आपल्या सगळ्या स्त्रीसुलभ भावना मारून टाकून संस्थेसाठी जगणाऱ्या रोझमेरीच्या जीवनात अचानक एक वादळ घोंगावत येते आणि तिच्या दिशाहीन, कळाहीन जीवनाच्या दर्शनाने तिचे दुःख वाचकालाही भारून टाकते. तिचा 'राजहंस' तिला कधीच मिळणार नसतो. तिची ही मूक व्यथा बोलकी करण्यात लेखिकेने दाखविलेले कसब अपूर्व आहे. 'ख्रिस्तजन्म' ही कथा तर केवळ कथा नव्हे, तर अप्रतिम भावोत्कट काव्यच आहे. ही कथाही घडते एका बंदिस्त, शिस्तीचे पक्के कुंपण असणाऱ्या कॉन्व्हेंट शाळेमधे. एक अल्लड किशोरी 'अनिता' या शाळेत प्रवेश करते आणि तिच्या जीवनात (आणि शाळेच्याही) एक वेगळेच पर्व सुरू होते. आणि शेवटी या निष्पाप मुलीच्या जीवनात ओढवलेला तो भीषण प्रसंग केवळ त्या शिक्षिकांनाच नव्हे तर वाचकालाही प्रचंड हादरा देतो, अवाक बनवितो. स्त्रीजीवनाचे इतक्या संयमाने पण इतक्या समर्थपणे दर्शन कथेच्या माध्यमातून क्वचितच कोणी दाखविले असेल. 'ख्रिस्तजन्म' ही एकच कथा सुधा नरवण्यांचे सारे कलागुण नीटसपणे प्रकट करणारी आहे.

या 'मरालिके'ने (राजहंसीने) केवळ स्त्रीजीवनाचाच प्रामुख्याने वेध घेतलेला असला तरी जीवनाचे याहून अधिक व्यापक, सर्वांगीण दर्शन घडविण्याचे सुप्त सामर्थ्य तिच्या ठायी आहे याची साक्ष हा संग्रह वाचताना पटते,

'ख्रिस्तजन्म' लिहिणाऱ्या लेखिकेकडून मराठी वाचक नेहमीच दर्जेदार कथांची अपेक्षा करीत राहील.

—गं. ना. जोगळेकर

◆ ◆ ◆

## 'हेलकावा'

लेखक :—र. गं. विद्वांस, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ६ रु.

श्री. र. गं. विद्वांस यांच्या कथांतून प्रकट होणारे त्यांचे अनुभवक्षेत्र तसे अगदीच मर्यादित आहे. पुण्यामुंबई-सारख्या महाराष्ट्राच्या मोठ्या शहरांतील पांढरपेशा समाजच आपल्या कथांतून त्यांनी पुनः पुन्हा चितारला आहे. अर्थात अनुभवक्षेत्र अतिमर्यादित आहे या कारणासाठी विद्वांसांचे यश मर्यादित ठरू नये. कारण तसे पाहिले तर य. गो. जोशी, श्री. ज. जोशी, अंबादास अग्निहोत्री किंवा वि. वि. बोकील यांसारख्या अनेक लेखकांनी केवळ पांढर-पेशांचे जग हीच प्रायः आपली मर्यादा मानली आहे. पण या लेखकांना कथाकार म्हणून जे निश्चित स्थान प्राप्त होते ते विद्वांसांच्या वाट्यास येत नाही हे खरे.

याचे मुख्य कारण असे दिसते की चाकोरीबद्ध मध्यम-वर्गीय माणसाचे साचेबंद चित्रण करण्यातच श्री. विद्वांस पुनः पुन्हा रमले आहेत. विद्वांसांनी रंगविलेली व्यक्तित्वे मराठी कथाकादंबऱ्यांतून इतक्या वेळा येऊन गेली आहेत की त्यात कोणत्या ना कोणत्या प्रकारचे नावीन्य असल्या-शिवाय त्यांचे आकर्षणच वाटेनासे झाले आहे. विद्वांसांनी उभ्या केलेल्या बहुतेक पात्रांचे माफक शिक्षण झालेले असते; कसाबसा पोटापुरता पगार या नोकरीपेशातल्या लोकांना मिळत असतो, कुठेतरी शनिवारात नाही तर नारायण पेठेत जुन्या, अडचणीच्या, कमी भाड्याच्या जागेत ही माणसे राहतात; यांपैकी बऱ्याचजणांच्या बायका सालस, टापटिपीच्या आणि देखण्या असतात; नवरा-बायकोचे किरकोळ कलह नेहमी चालू असतात. यांचे शेजारी अडीअडचणीला मदत करणारे तरी असतात किंवा वेळीअवेळी त्रास देणारे असतात; चांगला हवेशीर फ्लॅट, आधुनिक सुखसोईंनी युक्त असे विलासपूर्ण वातावरण आणि नोकरीतली बढती हीच या बहुतेकांची ध्येये असतात. चहा सिगरेटच्या कैफात यातले पुरुष सारखे मग्न असतात. ( सिगरेट न ओढणारे पुरुष-पात्र विद्वांसांच्या कथांतून शोधूनच काढावे लागेल ! ) हे सारे दृश्य इतके ठरीव ठशाचे आहे की या चौकटीतून एखाद्या वेळी तरी बाहेर पडावे असे लेखकास का वाटत नाही याचेच खरोखर आश्चर्य वाटत राहते.

'हेलकावा' या संग्रहाच्या शीर्षकावरून आणि याच नावाच्या कथेवरून विद्वांसांना असे सुचवावयाचे आहे असे दिसते की गेल्या दोन तपांच्या काळात पांढरपेशा मराठी माणसाच्या जीवनाला जो जबरदस्त हेलकावा बसला आहे, त्याच्या जीवनात जी कमालीची स्थित्यंतरे झाली आहेत, त्यांचे चित्रण या कथांतून मी करणार आहे. 'स्वस्ताईतील पिळदार पिढी आणि महागाईतील पोशाखी पिढी' यांचा संघर्ष मी रंगविणार आहे. लेखकाचा हा हेतू काही कथांतून व्यक्त होत असला तरी या कथांनी वाचकाला अस्वस्थ केले आहे, अंतर्मुख बनविले आहे असे सहसा अनुभवास येत नाही.

मात्र विद्वासांना कथालेखन मुळीच जमलेले नाही, असा याचा अर्थ नाही. वाचकाचे कुतूहल वाढीस लागून त्याला कथा शेवटपर्यंत वाचाविशी वाटेल एवढी निवेदनातली आकर्षकता त्यांनी कमावली आहे. एखाद्या व्यक्तीच्या मनातील उलटसुलट विचारांचे वादळ ते दाखवू शकतात. नव्या जोडप्यांचा रुसवाफुगवा, सुखी ( की सुखवस्तु ? ) संसाराचे त्यांचे स्वप्नरंजन ते चितारू शकतात. या त्यांच्या गुणविशेषांमुळेच 'सहानुभूति', 'बदल', 'दिन एखादा असा असावा' यांसारख्या त्यांच्या काही कथा वाचनीय झाल्या आहेत.

पण पंचवीस वर्षे कथालेखन करणाऱ्या लेखकाने केवळ 'वाचनीयतेच्या' प्राथमिक कसोटीवर उतरण्यात समाधान मानू नये. दीर्घकाळ स्मरणात राहणारी पुनः पुन्हा वाचावीशी वाटणारी किंवा वाचकाला खराखुरा 'हेलकावा' देणारी कथा विद्वासांच्या हातून लिहिली जावी अशी अपेक्षा बाळगणे चूक ठरेल काय ?

गं. ना. जोगळेकर

◆ ◆ ◆

## भ्रमरासी चारा सुगंधाचा

लेखक—शां. रा. शिंदे, साधना प्रकाशन, पुणे २; रु. ४-५०

'भ्रमरासी चारा सुगंधाचा' ही शांताराम राम-चंद्र शिंदे यांची अनेक दृष्टींनी सुरेख अशी कादंबरी आहे.



अनुक्रमणिका



विषय नेहमीचाच आहे; प्रेम आणि भावजीवन. पण ह्या विषयावर प्रत्येक वर्षी तीन–चार कादंबऱ्या लिहून अनेक लेखकांनी हा विषय बेचव करून टाकला आहे. ह्या विषयावर कलात्मकता सांभाळून प्रामाणिकपणे लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्या मराठीमध्ये फारच थोड्या आहेत. प्रस्तुत कादंबरी निःसंशय त्यांपैकी एक आहे.

अगदी सामान्य जीवन जगणाऱ्या एका तरुणाच्या जीवनात चार–पाच मुली आल्या. त्यांच्या अनुषंगाने त्याचे विकसित झालेले, घडलेले भावजीवन प्रस्तुत कादंबरीत आविष्कृत झाले आहे. तशा प्रचंड आणि भव्य, उदात्त आणि व्यापक, अती गुंतागुंतीच्या आणि मन उध्वस्त करून टाकणाऱ्या घडामोडीही तीत नाहीत. त्यामुळे कादंबरीत विषयाचे सामर्थ्य आणि समृद्धी नाही. तिचे यश तिच्या नाजूकतेत आणि देखणेपणात आहे.

कलाकृती उलगडत जाते ती काहीशा वेगळेपणाने. प्रसंगांच्या निमित्ताने ( नायक ) माधवला आठवणी स्फुरत जातात. त्यातून त्याचे भावजीवन उमलत जाते. कलाकृती अशा रीतीने उलगडत जाण्याच्या पद्धतीतून एक महत्त्वाची गोष्ट साधते. प्रत्यक्षात अनुभवलेले जीवन जसे अनेकांगांनी आणि स्वयंपूर्ण वृक्षासारखे एकदम जाणवते; तशी कादंबरीची अभिव्यक्ती वाटते. त्यामुळे तिच्यात ( फडके पद्धतीच्या प्रेमकादंबऱ्यांत जे कधीच नसते ते ) चैतन्य रसरसून आलेले आहे. अनुभूतीचा सर्वपणा पकडण्याची लेखकाची धडपड इथे यशस्वी झाली आहे; ती यामुळेच.

आणखी एक गोष्ट पूरक आणि पोषक झाली आहे. प्रेमकादंबऱ्यांत निवेदकाचे अडसरासारखे ठाण मांडून बसलेले स्वतंत्र आणि कित्येक ठिकाणी खव्यासारखे लागणार व्यक्तिमत्त्व इथे जाणवत नाही. निवेदक वेध घेत माधवच्या मनात विरघळून जातो. आणि कलाकृतीचे उमलणे मग स्वयंचलित होऊन निखळ स्वरूपात माधवचे मनच आविष्कारत राहते. आवश्यक तेथे निवेदक प्रभावी होऊन दोन तुकड्यांतील घटनात्मक, कालिक, स्थानिक इत्यादी प्रकारची सांधेजोड करतो आणि लगेच मोकळा होतो. त्यामुळे गतीत मुळीच अडथळा येत नाही. तिच्यात समानता राहते.

अंतर्मनाचा वेध घेत खोलात उतरत जाणारी लेखकाची प्रवृत्ती, तरलता मार्मिकपणे पकडण्याचे त्याचे चातुर्य, मुळातच लेखक कविप्रवृत्तीचा असल्यामुळे संवेदना प्रतिमांच्या द्वारा पकडण्याची त्याची स्वाभाविकता, अनुभूतीची लय आणि आवेग लक्षात घेऊन प्रसंगी त्रुटित, अस्फुट, सूचक, उद्गारवाची होत जाणारी त्यांची भाषा; ह्या गोष्टी लक्ष वेधून घेतात. कारण त्या औचित्य साधून एकरूप झालेल्या आहेत.

ही कलाकृती अत्यंत नाजूक आहे. देखणी आहे. ताजी टवटवीत आहे. चैतन्यपूर्ण आहे. सूक्ष्म आहे. ती मनाला उल्लास देते. प्रसन्न करून टाकते. हे तिचे यश आहे. पण मलपृष्ठावरील लेखकाचे पत्र वाचल्यावर सुजाण वाचकाची थोडी गफलत होते. पत्रात त्याने जे म्हटले आहे ते कादंबरीत व्यक्त होत नाही. तसे व्यक्त झाले असते तर कादंबरी जीवनाचाच वेध घेणारी समृद्ध कलाकृती झाली असती. देखणेपणाऐवजी तिची कलात्मक भव्यता जाणवली असती. ताजेपणापेक्षा तिचा दणकटपणा जाणवला असता. प्रसन्न करून टाकायच्या ऐवजी ‘रणांगण’ प्रमाणे तिने मन अस्वस्थ करून टाकले असते. पत्रात मतभेदाला जागा असलेले अनेक मुद्दे आहेत; पण ते इथे महत्त्वाचे वाटत नाहीत. आहे त्या परिस्थितीतही उद्गारवाचके अनेक अनावश्यक ठिकाणी जाणवतात. ‘नारायण’चे कथानकही कारणाशिवाय जास्त जागा व्यापून बसले आहे. शेवटच्या दोन प्रकरणांवरील कलात्मक पकडही थोडी ढिली झाली आहे. पण असे व्हायचेच. तेही महत्त्वाचे नाही.

आनंद यादव

◆◆◆

## शुद्धलेखन-परिचय

लेखक–मो. रा. वाळंबे, गो. य. राणे प्रकाशन, पुणे ९, किंमत ७५ पैसे.

शुद्धलेखन हा श्री. वाळंबे यांचा आवडीचा आणि अभ्यासाचा विषय आहे. प्रस्तुत पुस्तक हे त्यांनी या विषयावर लिहिलेल्या अनेक पुस्तिकांमधील अगदी अलीकडील प्रकाशन होय. साहित्य-महामंडळाने घालून दिलेल्या चौदा नियमांच्या आधारे हे लिहिलेले आहे; परंतु केवळ तेवढ्याच नियमांचे विवेचन यात डोळ्यांपुढे ठेवलेले नाही. त्या नियमांत न आलेली विरामचिन्हे, जोडाक्षरलेखन, अनेक शब्दांची शुद्धाशुद्ध रूपे इत्यादींचा

विचारही या पुस्तिकेत करण्यात आला आहे. त्यामुळे प्रस्तुत पुस्तक हे शालेय विद्यार्थ्यांस अत्यंत उपयुक्त ठरण्यासारखे आहे. महामंडळाने घालून दिलेले नियम हे लेखनविषयक काही किमान ज्ञान असणाऱ्या विद्यार्थ्यांच्या किंवा शिक्षकांच्याकरिता केलेले नियम आहेत. तत्सम आणि मराठी शब्द यांमधील भेद त्यांना कळतो, हे त्यात गृहीत धरलेले आहे; व अक्षरलेखन कसे करावे हेही त्यांना सांगावयास पाहिजे असे नाही असे त्यात समजण्यात आले आहे. त्याचप्रमाणे त्यात दिलेली उदाहरणे ही उपलक्षणार्थ येतात, त्यात सर्वच शब्दांचा उलगडा करणे शक्य नसते. विद्यार्थी आणि काही शिक्षक यांना इतर सदृश शब्द वा उदाहरणे याबाबतही कोणी स्पष्टपणे निर्णय दिलेला हवा असतो. त्यांची गरज या पुस्तकाने पुष्कळ प्रमाणात भागविली आहे यात शंका नाही.

या पुस्तकामधील विवेचन हे बहुतांशी बरोबर असले तरी काही वेळा ते चिंत्य वाटते. पर-सवर्ण-विचारामध्ये वाङ्मय, तन्मय, आम्ल, सम्राट, इन्कार इत्यादी शब्दांच्या लेखनाचा विचार खरोखर बसत नाही. येथे पर-सवर्णाऐवजी अनुस्वार किंवा अनुस्वाराऐवजी पर-सवर्ण लिहिण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही. दोन व्यंजने असलेले जोडाक्षर लिहिण्याचा हा प्रश्न आहे. ते लिहिताना संधिनियमाने होणारे फरक वाङ्मय, तन्मय या शब्दांत येतात. वाङ्मय, तन्मय यांबद्दल वांमय, तंमय असे लिहून भागणारच नाही. आम्ल, इन्कार यांत तर संधिनियमांनी होणारे विकारही नाहीत. अण्णा शब्दातही अंणा असे लिहून किंवा उच्चारून भागणार नाही. ते उच्चारानुसारी लेखन होणार नाही. तसेच चिंच, उंच, भिंग, उंट इत्यादी शब्दांतील उपान्त्य इ व उ ऱ्हस्व लिहावे हे सांगत असता वाळंबे लिहितात—" अनुस्वाराचा उच्चार दीर्घ होत असल्याने इकार व उकार यांचा उच्चार आखुड होतो." यावरून अशी समजूत होते की मुळात इकार व उकार या शब्दांत दीर्घ असून अनुस्वारामुळे ते ऱ्हस्व झाले आहेत. तसे असेल तर भांग, मांग, मांड, वांड इत्यादी शब्दांत 'आ'चाही अ व्हावयास हरकत नव्हती; किंबहुना येंब, सोंग या शब्दांतही काही ऱ्हस्वोच्चारण शिरावयास हवे होते. अशी काही चिंत्य विधाने आढळली तरी लेखनाबाबत त्यांनी दिलेले निर्णय चुकलेले आहेत असे म्हणता येत नाही. शुद्धलेखनाबाबत श्री. वाळंबे हे साहित्यपरिषदेचे आणि साहित्य महामंडळाचेच कार्य करीत आहेत, आणि म्हणून धन्यवादास पात्र आहेत; असेच म्हणावे लागेल.

**रा. श्री. जोग**

◆◆◆

## साहित्य आणि कला

लेखक–**म. ना. लोही**, व्हीनस प्रकाशन. पुणे २; किं. ३ रु.

'साहित्य आणि कला' हा, नागपूरच्या धनवटे महाविद्यालयातील मराठीचे प्राध्यापक म. ना. लोही यांच्या टीकालेखांचा संग्रह. यात तेरा लेख समाविष्ट झालेले असून यातील बरेचसे लेख, मॉडर्न आर्ट; नवकथा; ललित साहित्यातील व्यक्तिदर्शन; प्राचीन भारतीय शिल्पकला; ऐतिहासिक कादंबरी; विनोद; यांसारख्या विषयांच्या तात्त्विक चर्चेला वाहिलेले आहेत. उरलेल्या लेखांत रवींद्रनाथ टागोर; हरिभाऊ आपटे; चिं. वि. जोशी यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा व 'इंदु काळे आणि सरला भोळे' या कादंबरीचा परामर्श आलेला आहे.

तात्त्विक चर्चेच्या मानाने हे व्यक्तिपर वा रसग्रहणात्मक लेख गौणच मानावयास हवेत. त्यांचे स्वरूप काहीसे औपचारिक (टागोर), पुस्तकी (चिं. वि. जोशी) अथवा एकांगी स्तुतीचे (इंदु काळे–सरला भोळे) वाटते. हरिभाऊंच्या वाङ्मयाचा विचार करताना हरिभाऊंच्या वाङ्मयाची त्यांच्या व्यक्तिगत जीवनातील विसंगतीशी सांगड घालण्याचा लेखकाचा प्रयत्न किंवा हरिभाऊंच्या जीवनक्रमाची आगरकरांच्या जीवनक्रमाशी त्याने केलेली तुलना तर अयुक्तच मानावी लागेल.

त्या मानाने प्रा. लोही यांचे तत्त्वचर्चात्मक लेख अधिक कसदार वाटतात. त्यांत त्यांच्या सखोल जिज्ञासू वृत्तीचे प्रकटीकरण अधिक प्रमाणात झालेले आहे. त्यांच्या इतर लेखांप्रमाणे त्यांचे हे लेखही काही वेळा त्रोटक, क्वचित टिपणवजा वाटले तरी वरील कारणाने लक्ष वेधून घेतात. 'ललित वाङ्मयातील व्यक्तिदर्शन' किंवा 'ऐतिहासिक कादंबरी : काही प्रश्न' यांसारखे लेख अभ्यासू वृत्तीची साक्ष पटविणारे आहेत. प्रा. लोहींच्या या चर्चात्मक लेखांतील आजच्या घडीला तरी विशेष महत्त्वाचे वाटणारे लेख म्हणून त्यांच्या नवसाहित्यविषयक लेखांचा उल्लेख करावा लागेल.

या विषयाची चर्चा सामान्यतः अनुकूल-प्रतिकूल अभिप्रायांच्या गदारोळांनी भरलेली असते. प्रा. लोहींचे या संबंधातील विवेचन त्या मानाने सौम्यच म्हणावे लागेल. त्यात सडेतोडपणा असला तरी सहेतुक कडवटपणा नाही. त्यांच्या नवसाहित्यविषयक विवेचनाचा एकूण कल जरी नवसाहित्याच्या विरोधाकडे झुकत असला, तरी आजच्या साहित्यातील मनोविश्लेषणासारख्या काही प्रवृत्ती त्यांना स्वीकरणीय वाटतात. त्यांची नवसाहित्याबद्दल जी तक्रार आहे, ती मुख्यतः आजच्या सर्वसामान्य वाचकाच्या भूमिकेवरून होय.

प्रा. लोही यांची आजच्या साहित्याबाबत जी पहिली आणि महत्त्वाची तक्रार आहे ती त्यातील दुर्बोधतेच्या संबंधात; या बाबतीत-त्यांचे म्हणणे असे की, ज्या अर्थी हे नवलेखक आपले लेखन प्रसिद्ध करतात, त्या अर्थी ते वाचकांसाठीही लिहीत असतात, हे उघड आहे. तेव्हा हे लेखन वाचकसुगम करण्याची जबाबदारी या लेखकांवरच पडते; पण हे लेखक आत्माविष्काराच्या मुद्द्यावर ही जबाबदारी टाळतात. प्रा. लोहींच्या मते, असे करणे, हे ढोंगीपणाचे आहे.

आपल्या मनातील आशय हे नवलेखक रूढ भाषेत न मांडता, दुर्बोध भाषेतच का मांडतात ? रूढ भाषा त्यांच्या अभिव्यक्तीला नेहमीच अपुरी पडते काय ? पूर्वीच्या मोठमोठ्या लेखकांनी आपल्या गुंतागुतीचा आशय रूढ भाषेतूनच व्यक्त केला नाही का ? मग नवलेखकांनाच हे का जमू नये ? आजच्या कलेतील प्रयोगप्रवणतेचाच केवळ हा परिणाम मानावयाचा काय ? प्रयोगशीलता हा आजच्या कलेचा एक महत्त्वाचा विशेष आहे. हे मान्य केले तरी रूढ कलामूल्यांना डावलून केलेले हे प्रयोग, समाजमनाला अनाकलनीय राहात नाहीत काय ? या अनाकलनीयतेमुळे समाज त्यांचा स्वीकार कसा करणार ? त्यांच्याशी हृदयसंवाद कसा साधणार ? सौंदर्यदर्शन हे जे कलेचे प्रमुख कार्य, तेच या परिस्थितीत कुंठित होत नाही काय ? असेही प्रा. लोही विचारतात.

यावर उपाय म्हणून आजच्या कलावंताने आपल्या प्रयोगांची घोडदौड मंद करावी; सर्वसाधारण वाचकाशी थोडे जुळतेमिळते घ्यावे; त्याची आकलनक्षमता व अभिरुची हळूहळू वृद्धिंगत करावी असे ते सुचवितात. असे केल्यानेच कला व समाज यांचा अभ्युदय होईल; अशी प्रा. लोहींची धारणा आहे.

प्रा. लोही यांच्या या भूमिकेच्या तपशिलात जावयाचे झाल्यास, रूढ कला-मूल्यांची नेमकी व्याप्ती काय ? पूर्वीच्या साऱ्या कलावंतांनी आपला आशय रूढ भाषेतच खरोखर व्यक्त केला का ? सर्वसाधारण वाचकाला साऱ्या प्रकारचे साहित्य नेहमी आकलन सुलभ असते काय ? कलेचा विकास नेहमी उत्क्रांतीच्याच मार्गाने होतो का ? यांसारख्या काही मुद्द्यांचा विचार करावा लागेल. तो थोडा बाजूला ठेवला; आणि नवसाहित्यात चाललेले सर्व काही ठीक नाही; नवसाहित्य व सर्वसाधारण वाचक यात पडलेले अंतर शक्यतो भरून काढण्याचा काही प्रयत्न केला पाहिजे; हे त्यांचे म्हणणे वादातीतच असल्यामुळे स्वीकारले; तरी हे अंतर भरून काढण्यासाठी नवसाहित्यिकाने आपल्या निर्मितीपद्धतीतच वाचकसापेक्ष अशी काही मुरड घालावी; असे ते सुचवितात, ते मान्य करणे अशक्य आहे. त्यांची ही सूचना किंवा मागणी आपाततः कितीही व्यवहार्य, सुकर व समंजसपणाची वाटली, तरी ती तत्त्वतः नवनिर्मितीच्या मूळ प्रेरणेवर व प्रक्रियेवरच आघात करणारी आहे.

सर्वसाधारण वाचकांशी किंवा प्रचलित साहित्यमूल्यांशी जुळतेमिळते घेऊन गुजराण करणाऱ्या दुय्यम कलावंतांची समाजात वाण नसते; वाण असते ती आपल्या अस्सल निर्मितिमूल्यांशी अव्यभिचारी निष्ठा बाळगणाऱ्या प्रतिभावंत नवनिर्मात्याची. असा कलावंत हजारातून एखादाच असतो; पण त्याच्यावरच कलेचे उज्ज्वल भवितव्य अवलंबून असते. या कलावंताला जे काही वेगळे, नवे निर्माण करावयाचे असते, ते तो जनमर्यादेचे भान ठेवून निर्माण करू शकेल असे नाही. स्थितिशील अभिरुची व नवनिर्मितीचा आवेग यांत बळेच घडवून आणलेली तडजोड कोणाच्याच हिताची ठरत नाही. सच्चा कलावंत अशा प्रकारच्या तडजोडीला कधी मान्यताही देणार नाही.

नेहमी आपल्या प्रेरणेशी इमान ठेवणारी, आत्मवंचक न होणारी, कलाकृतीच श्रेष्ठ ठरण्याचा संभव असतो; बाकीची सारी निर्मिती कालप्रवाहात कमी-अधिक अंतराने विसर्जित होत राहते. आता स्वप्रेरणेशी द्रोह न करणारी प्रत्येक कलाकृती श्रेष्ठ ठरतेच असे नाही; पण स्वप्रेरणेशी एकनिष्ठ राहणे, ही श्रेष्ठ कलेच्या निर्मितिबाबतची जी प्राथमिक अट, तीच प्रा. लोहींच्या सूचनेने खंडित होते.

समाजाभिरुची व कलानिर्मिती या सामान्यतः परस्पराश्रयी असतात; आणि त्यांच्या स्वाभाविक संवादातून

अनुक्रमणिका

पुष्कळदा चांगली कलाकृती निर्माण होतेही; पण एखादी प्रगल्भ नवी कलाकृती या आश्रयाला झिडकारून जेव्हा पुढे धावते; तेव्हा पारंपरिक अभिरुची तिची वाट अडविण्याचा कसून प्रयत्न करते; पण तो व्यर्थ ठरतो. शेवटी समाजाभिरुचीलाच या कलाकृतीचे अनुसरण करावे लागते. अशा अनुसरणानेच अभिरुचीचा विकास होतो. कलावंताला वाचकशरण होण्यास सांगण्याने नव्हे.

वरील सिद्धान्त केवळ आत्मकेंद्रित साहित्यापुरताच मर्यादित नाही. बहुजन समाजाच्या कळवळ्याने प्रेरित झालेले संतसाहित्यही असे वाचकशरण नसल्याचा अनुभव ज्ञानेश्वर–तुकारामांच्या वाचकाला पदोपदी येतो. या साहित्याचे निर्माते व तत्कालीन समाज यात काही स्वाभाविक सांस्कृतिक अनुबंध होता; संतांच्या अंगभूत समाजाभिमुखतेमुळे या साहित्याला एक वेगळे परिमाण लाभले आहे, हा भाग वेगळा; येथे प्रश्न आहे तो तत्कालीन अभिरुचीशी तडजोड साधण्यासाठी या संत–कलावंतांनी स्वतःच्या मूलभूत निर्मितीप्रेरणेवर काही सहेतूक बंधने लादून घेतली होती किंवा काय, हा. या प्रश्नाचे उत्तर नकारार्थीच द्यावे लागेल. तुकारामासारख्याने स्वकालीन अभिरुचीशी अशी तडजोड करण्याचे ठरविले असते, तर स्वतःचे अभंग डोहात बुडविलेले पाहण्याचा प्रसंग त्याच्यावर कशाला गुदरला असता!

संतकालाच्या मानाने आजची संस्कृती कितीतरी विकीर्ण, व्यामिश्र, गतिशील व अनेकावयवी झालेली आहे. अशा संस्कृतीत वावरणारा आजचा परंपराविरोधी, प्रयोगशील नवसर्जक स्थितिनिष्ठ वाचकापासून कितीतरी दूर गेल्यासारखा झाल्यास नवल नाही. हा कलावंत समाजापासून मुद्दाम दूर जातो किंवा तो बळेच दुर्बोधतेच्या आड रानात शिरतो, असे नाही. हा सारा त्याच्या प्रवृत्तीविशेषाचा व निर्मितिप्रक्रियेचा एक स्वाभाविक परिपाक असतो.

कोणत्याही प्रकारच्या वृत्ती-प्रवृत्तींचे, निर्मितिप्रक्रियेचे जे काही अंगभूत गुणदोष असतात, ते या निर्मितीतही असतील; पण आक्षेपक मानतात, तसा यात काही मिथ्याचार नाही; आणि आत्मतृप्तीसाठी केलेले लेखन प्रसिद्ध करणे, हा ढोंगीपणाही नव्हे. हा कलावंत स्वतःचे लेखन प्रसिद्ध करतो म्हणजे तो ते समाजसुलभ करण्याची जबाबदारी पत्करतो, असे नाही. हे प्रसिद्धीकरण तत्त्वतः त्याच्या आत्मप्रकटीकरणाचे एक अंग असू शकेल; किंवा ' समानधर्मा ' शोधण्याचाही तो एक मार्ग असू शकेल. या कलावंताला चाहता रसिकवृंद मिळाला तर तो नको असतो असे नाही; आपल्याला सुजाण चाहता मिळावा, अशी कोणत्याही सच्च्या कलावंताची आंतरिक इच्छा असतेच; पण त्यासाठी विशिष्ट उंचीवरुन चाललेला आपला निर्मितिरथ उतरणीला लावण्याची त्याची तयारी नसते. वाचकानेच ही उंची परिश्रमाने का होईना पण गाठावी, अशी त्याची अपेक्षा असते. तो त्याला यासाठी आपल्या पद्धतीने पाचारणही करीत असतो. त्याची हाक कधी वाचकाच्या कानांवर जाते; कधी जात नाही. याला हाकेचा क्षीणपणा कारणीभूत आहे की श्रोत्याचा बधिरपणा; हे घाईघाईने ठरविणे अशक्य आहे. कालान्तरानेच ते ठरणार आहे. निर्णायक अशी तीच एक कसोटी आहे. आरोप-प्रत्यारोप न करता त्यासाठी थांबले पाहिजे. प्रस्तुतचा विचार वाचकसापेक्ष असल्यामुळे येथे हा सबुरीचा सल्ला वाचकालाच देणे इष्ट ठरते.

प्रा. लोही किंवा तत्सम विचारांच्या लोकांचा नवसाहित्यावर आणखी एक जो आक्षेप आहे, तो त्यातील विकृतीच्या चित्रणाबाबत; हे चित्रण या मंडळींना अश्लील व म्हणून निषिद्ध वाटते.

खरे तर आजच्या जीवनातील व साहित्यातील अश्लीलतेची समस्या तशी फार जटिल आहे. ती समाजातील साऱ्याच विचारवंतांच्या विवेचनेचा विषय झालेली आहे. परंतु या परिस्थितीला सरसकटपणे सारे नवसाहित्य जबाबदार धरणे, म्हणजे वस्तुस्थितीकडे डोळेझाक करणे होय. नवसाहित्य रूढ नीति-मूल्यांना धक्का देणारे चित्रण अनेकवार करते; याचा अर्थ ते अश्लीलच असते असे मानणे; हा एक गैरसमज आहे. आजच्या जीवनातील बकालीपणातून निर्माण झालेल्या सवंग बाजारीपणात, या अश्लीलतेची बीजे असतात; अभिरुचिहीन, अप्रौढ समाजमनाच्या ओंगळ इच्छातृप्तीसाठी तिची जाणूनबुजून निर्मिती केली जाते; या साहित्याची व आजच्या जीवनातील विकृतीची, अमंगलत्वाची, भकासपणाची बिकट प्रतीती आणून देणाऱ्या नवसाहित्याची गल्लत करणे; किंवा या साहित्यिकालाच विकृत मनोवृत्तीचा ठरविणे; योग्य नाही.

आजच्या साहित्यातील विकृतिचित्रण किंवा ' दुर्बोधता ' ही वास्तवपूर्ण जीवनदर्शनाच्या भूमिकेची व मनोविश्लेषणात्मक आविष्करणपद्धतीची अपरिहार्य परिणती आहे. मानवी मन हा जो साहित्याचा सनातन विषय, त्याचे चित्रण ठराविक साच्यातून किंवा विशिष्ट सांस्कृतिक

चष्म्यातून करण्याची पूर्वापार पद्धती हळूहळू बदलत गेली; व्यक्तिस्वातंत्र्याच्या युगातच तिला आरंभ झाला. आज या प्रथेने एक टोक गाठलेले आहे. हव्या त्या मनाचा हव्या त्या पद्धतीने छेद घेण्याचा छंद आजच्या साहित्यकाराला लागला आहे. मानवी मन, त्याचे विविध स्तर, त्यातील एखाददुसरा अणू, या अणूतून उसळणारी विविध वृत्ति-प्रवृत्तींची चित्रविचित्र कारंजी, त्यांतील सूक्ष्मातिसूक्ष्म रंगच्छटा वा तुषार-कण टिपणे, ही आजच्या साहित्याची प्रमुख प्रवृत्ती आहे. मानवी मनाचे काही वेगळे, नवलपूर्ण पण वास्तवदर्शन यामधून घडेल अशी त्याची श्रद्धा आहे.

हे दर्शन घडण्याच्या दृष्टीने, अनेक प्रकारची सामाजिक-सांस्कृतिक आवरणे घेऊन वावरणाऱ्या एरव्हीच्या सावध मनापेक्षा, या ना त्या कारणाने ही आवरणे गळून पडलेली म्हणजेच 'विकृत' ठरलेली मने किंवा मनोवस्था, त्याच्या चित्रणाचा विषय झालेली आहेत; त्याच्या आविष्करणपद्धतीतही यामुळेच बदल घडून आलेला आहे. ती 'दुर्बोध' वाटू लागली आहे. हे चित्रण सामान्यतः वाचकाला धक्का देणारे वाटत असल्यामुळे तो त्याच्यापासून दूर जाऊ इच्छितो. त्यावर अश्लीलतेचा शिक्का मारून मोकळा होतो. सामाजिक सभ्याचाराच्या नावावर, याला आवर घातला पाहिजे, असे सांगत सुटतो.

नवसाहित्यावर अश्लीलतेचा आरोप करणाऱ्या या टीकाकारांना प्राचीन शिल्पकलेतील मिथुनचित्रे चालतात. (प्राचीन भारतीय शिल्पकला : काही प्रवृत्ती हा लेख पहावा). ती सामाजिकदृष्ट्या त्यांना गर्हणीय वाटत नाहीत. सामाजिक शिष्टाचाराच्या मर्यादेच्या उल्लंघनाचा मुद्दा येथे ताणण्याची त्यांना आवश्यकता वाटत नाही. नवसाहित्यविषयक चर्चेच्या क्षेत्रात मात्र त्याचे भांडवल करावे असे त्यांना वाटते ! ही देवदेवतांची प्राचीन मिथुनशिल्पे, एका सद्हेतूतून स्फुरली असल्याचे जसे ते मानतात; तसे हे सामान्य जीवनातील आधुनिक विकृतिदर्शनही एका वेगळ्या पातळीवरून, पण मूलतः सद्हेतूनेच, स्फुरत आहे असे का मानू नये ?

आता पूर्वीच्या कलेत या चित्रणाबरोबरच अन्य प्रकारचे चित्रणही जसे विपुल प्रमाणात होत होते, तसे ते आज होत नाही; हे खरे आहे. पण यालाही पुन्हा आजचे जीवनस्वरूपच एक प्रकारे जबाबदार आहे. जीवनाला सामान्यतः श्रेयस्कर वाटणारी मूल्येच आज ढासळून पडलेली दिसत असल्यामुळे, या ढासळलेपणाचे व त्याच्या अंगोपांगाचेच चित्रण आज अधिक होणे, स्वाभाविक आहे. याहून वेगळ्या प्रकारचे चित्रण आजच्या साहित्यिकाने अधिक प्रमाणात का करू नये? या प्रश्नाचे उत्तर, संस्कृतीच्या व्यापक परिवर्तनाशी, कलावंतांच्या अंगभूत प्रवृत्तींशी आणि इतरही अनेक गौण–प्रधान घटकांशी, निगडीत आहे.

या साऱ्यांचा विचार करू जाता अनेक परस्परविरोधी व परस्परसापेक्ष, तर्कान्वित व तर्कातीत, व्यक्तिगत व वस्तुगत घटकांचे दर्शन घडू लागते. साहित्याबद्दल काही निश्चित भविष्य वर्तविणे किंवा त्याला कुठल्यातरी नियमाच्या चौकटीत बसविणे कसे अशक्य आहे, याची कल्पना येऊ लागते. प्राचीन काळातील अगदी नियमघटित साहित्याबाबतही या वस्तुस्थितीचा काही प्रमाणात प्रत्यय येतो.

आजचा काळ तर अराजकाचाच आहे. स्वातंत्र्य व बेबंदशाही, कुरूप सत्याचे दर्शन व अश्लीलता, अभिव्यक्तीचे सूक्ष्मातिसूक्ष्मत्व व अकलात्मक दुर्बोधता यांतील लक्ष्मणरेषा व्यवच्छेदकपणे दाखविणे, मुष्किलीचे झाले आहे.* बेबंदशाहीचे पारिपत्य करताना व्यक्तिस्वातंत्र्याला, अश्लीलतेचे निर्मूलन करताना कठोर वास्तवदर्शनाला, आणि दुर्बोधतेचे परिमार्जन करताना कलात्मक व्यंजकतेला, केव्हा आणि कसा फाटा मिळेल, हे सांगता येत नाही.

नवसाहित्यावरील आक्षेपकांच्या म्हणण्याचा मथितार्थ, त्यातील ग्राह्यांश व सद्हेतू मान्य करूनही, त्यांनी या अनुरोधाने कलावंतांवर काहीं बंधने आणण्याची केलेली दूरस्थ सूचनाही यामुळेच स्वीकरणीय वाटत नाही. या दिशेने कलावंताच्या निर्मितीतील वैगुण्ये दूर होणार नाहीत किंवा सर्वसामान्य वाचकाची पातळीही वाढणार नाही.

त्या ऐवजी, वाचकानेच सुजाण होण्याचा मार्ग, कितीही नागमोडी वा दीर्घसूत्री वाटला तरी, सद्यःस्थितीत योग्य वाटतो. वाचकाची अभिरुची जसजशी उन्नत होत जाईल, तसतशी ती त्याला जातिवंत–नव्या वा जुन्या–कलाकृतीजवळ घेऊन जाईल. ही जवळीक मग कलावंतालाही प्रेरक ठरेल; आणि यातूनच कलावंत आणि रसिक यांचा खराखुरा हृदयसंवाद साधेल.

**गो. म. कुलकर्णी**

* १ म. सा. परिषदेच्या वाङ्मयीन अश्लीलतेच्या निरीक्षणासाठी नेमलेल्या विद्वान व तटस्थ सदस्यांची परस्परविरोधी टीकांची मते या दृष्टीने उद्बोधक आहेत. (पाहा. म. सा. पत्रिका अंक १६१ एप्रिल-जून १९६७)

◆◆◆

## मालोजीराजे आणि शहाजीमहाराज

लेखक व प्रकाशक : **वा. सी. बेंद्रे**, लेले बंगला, पुणे ४, किं. १६ रु.

संभाजीचरित्रानंतर श्री. वासुदेवराव बेंद्रे यांनी आमच्या शिवछत्रपतींच्या वडिलांचे आणि आजोबांचे अशी दोन विचिकित्सक चरित्रे लिहिली. वार्धक्यात प्रकृती ठीक नसताही अखंड उद्योगरत राहणारे श्री. बेंद्रे हे आदर्श अभ्यासू ठरतात. त्यांचा हा गुण घेण्यासारखा आहे. त्यांनी लिहिलेल्या या जोड-चरित्राचे परीक्षण करावयाचे आहे. छत्रपती संभाजीचरित्राचेही परीक्षण करण्याचे भाग्य प्रस्तुत लेखकाला लाभले असल्याने, हा एक अलभ्य लाभ म्हटला पाहिजे. आपल्या पुस्तकावर अभिप्राय लिहिणाराबाबत श्री. बेंद्रे यांची वृत्ती रास्त नसली; किंवा परीक्षकांबद्दल त्यांनी अनुचित उद्गार काढले असले; तरी त्यांच्या ग्रंथाचे परीक्षण यावत् शक्य "इतिहास – शास्त्रीय" दृष्टीने केले पाहिजे. ही शास्त्रशुद्ध इतिहास-दृष्टी बहुतेकांना (स्वतः खेरीज) लाभलेली नाही, अशा आविर्भावाने श्री. बेंद्रे यांनी ह्या जोड-चरित्राचा प्रारंभ केला आहे, हे मुद्दाम लक्षात घ्यावे.

**ग्रंथ-स्वरूपः**—सुमारे सवासहाशे पृष्ठांचा हा विस्तार चतुर्दश प्रकरणांत विभागला आहे. भोसले वंश (पृ. २६–४७) ह्या प्रकरणातील विचिकित्सा पुढील सर्व प्रकरणांत व्यक्त झाली आहे. निरनिराळ्या ठिकाणी वंशावळी कशा आल्या आहेत, त्यांतील तपशिलातले फरक कोणते, इत्यादी विवेचन ते ते उतारे देऊन, त्यांची तुलनात्मक कोष्टके बनवून, संस्कृत उतारे (अनुवादाशिवाय) देऊन "शास्त्रशुद्ध" केले आहे, असा लेखकाचा दावा आहे.

'बाबाजी राजे आणि मालोजी राजे', हे त्या नंतरचे प्रकरण (पृ. ४८–८३) यांतही संस्कृत उतारे आहेत. तंजावरच्या वेंकट भटाने भोसले वंशावळ लिहिली, तिच्यातले उतारे पूर्वेतिहासासाठी दिले. हे घराणे "राणा" किताब लावीत होते. "मेरठ" प्रांतातील कारभार त्याकडे होता. ही माहिती सांगताना "मेरठ" म्हणजे कोणता प्रांत हे नक्की सांगितले नाही. उत्तर प्रदेशातील दिल्ली जवळच्या मीरत शहरासही "मेरठ" म्हणतात. पण हे मेरठ दाक्षिणात्य दिसते.

'मालोजी राजे व निजामशाहा', हे चौथे प्रकरण (पृ. ८४–१२३) विशेष घटनांनी भरलेले आहे. दीपाबाई मालोजीची धर्मपत्नी झाल्यावर उमाबाई झाली. तिने घृष्णेश्वराच्या अभिषेकार्थ वर्षासन दिले होते. मलिक अंबर आणि खान खानान यांची कारस्थाने, मियान मंजू (राजू) (–मियां राजू) डॅनियल (–दानियल) यांची राजकारणे ह्या गुंतागुंतीला प्रारंभ होतो. मालोजीचे मुलगे शहाजी–शरीफजी यांच्या जन्माबाबत—नामकरणाबाबत दंतकथांची ऐतिहासिक छाननी यात येते.

'मालोजी राजांची धार्मिक प्रवृत्ती', (पृ. १२४–३४) हे छोटेसे प्रकरण विशेष महत्त्वाचे आहे. घृष्णेश्वराऐवजी "घुस्मेश्वर" हा लेखन पर्याय अनेक ठिकाणी आढळतो. शिखर शिंगणापूरचे तळे बांधले. शेख महंमदाला दान दिले. श्रीगोंयास (चांभारगोंदास) मकरंदपुरा वसविला. त्याच्या घरची व्यवस्था पाहण्यास शेसव्वाशे माणसे नोकरीत होती... इत्यादी तपशिलावरून छत्रपती शिवाजीचे हे पितामह किती थोर आणि धार्मिक वृत्तीचे होते हे कळते.

सहावे प्रकरण (पृ. १३५–५९) बालपणच्या माहितीसाठी खर्ची पडले. शहाजी, शरीफजी यांचा जन्म, (स. १६०१ शहाजी, स. १६०३–४ शरीफजी) विवाह, पराक्रम, शिक्षण इत्यादिकांबद्दल तपशील प्रचलित समजुतीविरुद्ध आहेत. "दहाव्या" वर्षानंतर शहाजीचे लग्न झाले. चुलता विठोजी याने त्यास लेखन, वाचन, सर्वसामान्य व्यवहारज्ञान इत्यादी शिक्षण देण्याची व्यवस्था केली असावी. (पृ. १५२) शहाजीकाली शिक्षक शिकवीत ते संस्कृत पुस्तकांच्या आधारेच असल्यामुळे शहाजीला संस्कृत भाषाही आपोआप कळू लागली.

शहाजी व जाधवराव यांचा कुटुंबविस्तार सांगण्यासाठी ७ वे प्रकरण लागले. (पृ. १६०–९१) लखुजी जाधवरावांची बायको गिरिजा व शहाजीची आई उमा या माहेरकडून आत्या–भाच्या होत्या. तेव्हा शहाजी-जिजाबाईसंबंध मोठ्या गुण्यागोविंदाने साजरा झाला. तो जुलमाचा रामराम नव्हता, हा खुलासा कळतो. एकंदर भोसले कुटुंब विस्ताराचीही यथार्थ कल्पना येते. मूर्च्छा येऊन जावई खाली पडला तरी जाधवरावांनी संयम पाळला, त्याला ठार केले नाही. (पृ. १९१) याबद्दल जाधवरावांचे खरोखर आभार मानले पाहिजेत.

निजामशहा, इब्राहिम आदिलशहा, मोगल बादशहा, महमद आदिलशहा, अली आदिलशहा, अशा पाच शहांशी–शहांशी–शहाजीचा संबंध पाच प्रकरणांत (८–१२ पृ. १९२–५२९) सविस्तर सांगितला

चण्म्यातून करण्याची पूर्वापार पद्धती हळूहळू बदलत गेली; व्यक्तिस्वातंत्र्याच्या युगातच तिला आरंभ झाला. आज या प्रथेने एक टोक गाठलेले आहे. हव्या त्या मनाचा हव्या त्या पद्धतीने छेद घेण्याचा छंद आजच्या साहित्यकाराला लागला आहे. मानवी मन, त्याचे विविध स्तर, त्यातील एखाददुसरा अणू, या अणूतून उसळणारी विविध वृत्ति-प्रवृत्तींची चित्रविचित्र कारंजी, त्यांतील सूक्ष्मातिसूक्ष्म रंग-च्छटा वा तुषार-कण टिपणे, ही आजच्या साहित्याची प्रमुख प्रवृत्ती आहे. मानवी मनाचे काही वेगळे, नवलपूर्ण पण वास्तवदर्शन यामधून घडेल अशी त्याची श्रद्धा आहे.

हे दर्शन घडण्याच्या दृष्टीने, अनेक प्रकारची सामाजिक-सांस्कृतिक आवरणे घेऊन वावरणाऱ्या एरव्हीच्या सावध मनापेक्षा, या ना त्या कारणाने ही आवरणे गळून पडलेली म्हणजेच ' विकृत ' ठरलेली मने किंवा मनोवस्था, त्याच्या चित्रणाचा विषय झालेली आहेत; त्याच्या आविष्करणपद्धतीतही यामुळेच बदल घडून आलेला आहे. ती ' दुर्बोध ' वाटू लागली आहे. हे चित्रण सामान्यतः वाचकाला धक्का देणारे वाटत असल्यामुळे तो त्याच्या-पासून दूर जाऊ इच्छितो. त्यावर अश्लीलतेचा शिक्का मारून मोकळा होतो. सामाजिक सभ्याचाराच्या नावावर, याला आवर घातला पाहिजे, असे सांगत सुटतो.

नवसाहित्यावर अश्लीलतेचा आरोप करणाऱ्या या टीकाकारांना प्राचीन शिल्पकलेतील मिथुनचित्रे चालतात. ( प्राचीन भारतीय शिल्पकला : काही प्रवृत्ती हा लेख पहावा ). ती सामाजिकदृष्ट्या त्यांना गर्हणीय वाटत नाहीत. सामाजिक शिष्टाचाराच्या मर्यादेच्या उल्लंघनाचा मुद्दा येथे ताणण्याची त्यांना आवश्यकता वाटत नाही. नवसाहित्यविषयक चर्चेच्या क्षेत्रात मात्र त्याचे भांडवल करावे असे त्यांना वाटते ! ही देवदेवतांची प्राचीन मिथुनशिल्पे, एका सद्हेतूतून स्फुरली असल्याचे जसे ते मानतात; तसे हे सामान्य जीवनातील आधुनिक विकृति-दर्शनही एका वेगळ्या पातळीवरून, पण मूलतः सद्हेतूनेच, स्फुरत आहे असे का मानू नये ?

आता पूर्वीच्या कलेत या चित्रणाबरोबरच अन्य प्रकारचे चित्रणही जसे विपुल प्रमाणात होत होते, तसे ते आज होत नाही; हे खरे आहे. पण यालाही पुन्हा आजचे जीवनस्वरूपच एक प्रकारे जबाबदार आहे. जीवनाला सामान्यतः श्रेयस्कर वाटणारी मूल्येच आज ढासळून पडलेली दिसत असल्यामुळे, या ढासळलेपणाचे व त्याच्या अंगोपांगाचेच चित्रण आज अधिक होणे, स्वाभाविक आहे. याहून वेगळ्या प्रकारचे चित्रण आजच्या साहित्यिकाने अधिक प्रमाणात का करू नये ? या प्रश्नाचे उत्तर, संस्कृतीच्या व्यापक परिवर्तनाशी, कलावंतांच्या अंगभूत प्रवृत्तींशी आणि इतरही अनेक गौण–प्रधान घटकांशी, निगडीत आहे.

या साऱ्यांचा विचार करू जाता अनेक परस्परविरोधी व परस्परसापेक्ष, तर्कान्वित व तर्कातीत, व्यक्तिगत व वस्तुगत घटकांचे दर्शन घडू लागते. साहित्याबद्दल काही निश्चित भविष्य वर्तविणे किंवा त्याला कुठल्यातरी नियमाच्या चौकटीत बसविणे कसे अशक्य आहे, याची कल्पना येऊ लागते. प्राचीन काळातील अगदी नियमघटित साहित्याबाबतही या वस्तुस्थितीचा काही प्रमाणात प्रत्यय येतो.

आजचा काळ तर अराजकाचाच आहे. स्वातंत्र्य व बेबंदशाही, कुरूप सत्याचे दर्शन व अश्लीलता, अभिव्यक्तीचे सूक्ष्मातिसूक्ष्मत्व व अकलात्मक दुर्बोधता यांतील लक्ष्मण-रेषा व्यवच्छेदकपणे दाखविणे, मुष्किलीचे झाले आहे.* बेबंदशाहीचे पारिपत्य करताना व्यक्तिस्वातंत्र्याला, अश्लीलतेचे निर्मूलन करताना कठोर वास्तवदर्शनाला, आणि दुर्बोधतेचे परिमार्जन करताना कलात्मक व्यंजकतेला, केव्हा आणि कसा फाटा मिळेल, हे सांगता येत नाही.

नवसाहित्यावरील आक्षेपकांच्या म्हणण्याचा मथितार्थ, त्यातील ग्राह्यांश व सद्हेतू मान्य करूनही, त्यांनी या अनुरोधाने कलावंतांवर काहीं बंधने आणण्याची केलेली दूरस्थ सूचनाही यामुळेच स्वीकरणीय वाटत नाही. या दिशेने कलावंताच्या निर्मितीतील वैगुण्ये दूर होणार नाहीत किंवा सर्वसामान्य वाचकाची पातळीही वाढणार नाही.

त्या ऐवजी, वाचकानेच सुजाण होण्याचा मार्ग, कितीही नागमोडी वा दीर्घसूत्री वाटला तरी, सद्यःस्थितीत योग्य वाटतो. वाचकाची अभिरुची जसजशी उन्नत होत जाईल, तसतशी ती त्याला जातिवंत–नव्या वा जुन्या –कलाकृतीजवळ घेऊन जाईल. ही जवळीक मग कलावंता-लाही प्रेरक ठरेल; आणि यातूनच कलावंत आणि रसिक यांचा खराखुरा हृदयसंवाद साधेल.

**गो. म. कुलकर्णी**

* १ म. सा. परिषदेच्या वाङ्मयीन अश्लीलतेच्या निरीक्षणासाठी नेमलेल्या विद्वान व तटस्थ सदस्यांची परस्परविरोधी टीकांची मते या दृष्टीने उद्बोधक आहेत. ( पाहा. म. सा. पत्रिका अंक १६१ एप्रिल-जून १९६७ )

◆◆◆

अनुक्रमणिका

## मालोजीराजे आणि शहाजीमहाराज

लेखक व प्रकाशक : **वा. सी. बेंद्रे**, लेले बंगला, पुणे ४, किं. १६ रु.

संभाजीचरित्रानंतर श्री. वासुदेवराव बेंद्रे यांनी आमच्या शिवछत्रपतींच्या वडिलांचे आणि आजोबांचे अशी दोन विचिकित्सक चरित्रे लिहिली. वार्धक्यात प्रकृती टीक नसताही अखंड उद्योगरत राहणारे श्री. बेंद्रे हे आदर्श अभ्यासू ठरतात. त्यांचा हा गुण घेण्यासारखा आहे. त्यांनी लिहिलेल्या या जोड-चरित्राचे परीक्षण करावयाचे आहे. छत्रपती संभाजीचरित्राचेही परीक्षण करण्याचे भाग्य प्रस्तुत लेखकाला लाभले असल्याने, हा एक अलभ्य लाभ म्हटला पाहिजे. आपल्या पुस्तकावर अभिप्राय लिहिणाराबाबत श्री. बेंद्रे यांची वृत्ती रास्त नसली; किंवा परीक्षकांबद्दल त्यांनी अनुचित उद्गार काढले असले; तरी त्यांच्या ग्रंथाचे परीक्षण यावत् शक्य "इतिहास – शास्त्रीय" दृष्टीने केले पाहिजे. ही शास्त्रशुद्ध इतिहास-दृष्टी बहुतेकांना (स्वतः खेरीज) लाभलेली नाही, अशा आविर्भावाने श्री. बेंद्रे यांनी ह्या जोड-चरित्राचा प्रारंभ केला आहे, हे मुद्दाम लक्षात घ्यावे.

**ग्रंथ-स्वरूपः**—सुमारे सवासहाशे पृष्ठांचा हा विस्तार चतुर्दश प्रकरणांत विभागला आहे. भोसले वंश (पृ. २६–४७) ह्या प्रकरणातील विचिकित्सा पुढील सर्व प्रकरणांत व्यक्त झाली आहे. निरनिराळ्या ठिकाणी वंशावळी कशा आल्या आहेत, त्यांतील तपशिलातले फरक कोणते, इत्यादी विवेचन ते ते उतारे देऊन, त्यांची तुलनात्मक कोष्टके बनवून, संस्कृत उतारे (अनुवादाशिवाय) देऊन "शास्त्रशुद्ध" केले आहे, असा लेखकाचा दावा आहे.

'बाबाजी राजे आणि मालोजी राजे', हे त्या नंतरचे प्रकरण (पृ. ४८–८३) यांतही संस्कृत उतारे आहेत. तंजावरच्या वेंकट भटाने भोसले वंशावळ लिहिली, तिच्यातले उतारे पूर्वेतिहासासाठी दिले. हे घराणे "राणा" किताब लावीत होते. "मेरठ" प्रांतातील कारभार त्याकडे होता. ही माहिती सांगताना "मेरठ" म्हणजे कोणता प्रांत हे नक्की सांगितले नाही. उत्तर प्रदेशातील दिल्ली जवळच्या मीरत शहरासही "मेरठ" म्हणतात. पण हे मेरठ दाक्षिणात्य दिसते.

'मालोजी राजे व निजामशाहा', हे चौथे प्रकरण (पृ. ८४–१२३) विशेष घटनांनी भरलेले आहे. दीपाबाई मालोजीची धर्मपत्नी झाल्यावर उमाबाई झाली. तिने घृष्णेश्वराच्या अभिषेकार्थ वर्षासन दिले होते. मलिक अंबर आणि खान खानान यांची कारस्थाने, मियान मंजू (राजू) (–मियां राजू) डॅनियल (–दानियल) यांची राजकारणे ह्या गुंतागुंतीला प्रारंभ होतो. मालोजीचे मुलगे शहाजी–शरीफजी यांच्या जन्माबाबत–नामकरणाबाबत दंतकथांची ऐतिहासिक छाननी यात येते.

'मालोजी राजांची धार्मिक प्रवृत्ती', (पृ. १२४–३४) हे छोटेसे प्रकरण विशेष महत्त्वाचे आहे. घृष्णेश्वराऐवजी "घुस्मेश्वर" हा लेखन पर्याय अनेक ठिकाणी आढळतो. शिखर शिंगणापूरचे तळे बांधले. शेख महंमदाला दान दिले. श्रीगोंद्यास (चांभारगोंद्यास) मकरंदपुरा वसविला. त्याच्या घरची व्यवस्था पाहण्यास शेसव्वाशे माणसे नोकरीत होती... इत्यादी तपशिलावरून छत्रपती शिवाजीचे हे पितामह किती थोर आणि धार्मिक वृत्तीचे होते हे कळते.

सहावे प्रकरण (पृ. १३५–५९) बालपणच्या माहितीसाठी खर्ची पडले. शहाजी, शरीफजी यांचा जन्म, (स. १६०१ शहाजी, स. १६०३–४ शरीफजी) विवाह, पराक्रम, शिक्षण इत्यादिकांबद्दल तपशील प्रचलित समजुतीविरुद्ध आहेत. "दहाव्या" वर्षानंतर शहाजीचे लग्न झाले. चुलता विठोजी याने त्यास लेखन, वाचन, सर्वसामान्य व्यवहारज्ञान इत्यादी शिक्षण देण्याची व्यवस्था केली असावी. (पृ. १५२) शहाजीकाली शिक्षक शिकवीत ते संस्कृत **पुस्तकांच्या आधारेच असल्यामुळे शहाजीला संस्कृत भाषाही आपोआप कळू लागली.**

शहाजी व जाधवराव यांचा कुटुंबविस्तार सांगण्यासाठी ७ वे प्रकरण लागले. (पृ. १६०–९१) लखुजी जाधवरावांची बायको गिरिजा व शहाजीची आई उमा या माहेरकडून आत्या–भाच्या होत्या. तेव्हा शहाजी-जिजाबाईसंबंध मोठ्या गुण्यागोविंदाने साजरा झाला. तो जुलमाचा रामराम नव्हता, हा खुलासा कळतो. एकंदर भोसले कुटुंब विस्ताराचीही यथार्थ कल्पना येते. मूर्च्छा येऊन जावई खाली पडला तरी जाधवरावांनी संयम पाळला, त्याला ठार केले नाही. (पृ. १९१) याबद्दल जाधवरावांचे खरोखर आभार मानले पाहिजेत.

निजामशहा, इब्राहिम आदिलशहा, मोगल बादशहा, महमद आदिलशहा, अली आदिलशहा, अशा पाच शहांशी–शहांशी–शहाजीचा संबंध पाच प्रकरणांत (८–१२ पृ. १९२–५२९) सविस्तर सांगितला

आहे. शहाजी चरित्राचा हा गाभाच होय. शास्त्रशुद्ध पद्धतीने तो सांगावयाचा असल्याने निरनिराळ्या बखरींतले, तवारिखांतले आणि इतर ठिकाणचे सविस्तर उतारे पुनरुक्ती साधूनसुद्धा दिले आहेत. रियासतकारांच्या शहाजीसाठी अवघी ८७ पृ. लागली. पण ते पडले बोलून-चालून संकलनकार-गोष्टीरूप इतिहास सांगणारे! त्याच तपशिलासाठी शास्त्रशुद्ध इतिहासकारांना तीनशेहून अधिक पृष्ठे लागली. तरी थोडी कसूर राहिलीच. शास्त्रशुद्ध इतिहास म्हणजे साधने जशीच्या तशी प्रसिद्ध केली पाहिजेत. फार्सी, इंग्रजी, डच, पोर्तुगीज...इत्यादी भाषांतील साहित्य उपलब्ध करून मग हवा तर त्यांचा अनुवाद करावा. असो.

शहाजी महाराजांची विद्वत्प्रवृत्ती आणि समालोचन ही शेवटची दोन प्रकरणे. ( पृ. ५३०–५७५ ). सूची आणि संदर्भग्रंथ यांसाठी ( पृ. ५७६–६३६ ) काटसकर मुळीच केली नाही. पुस्तकांची यादी, संक्षेप या बाबतीत श्री. बेंद्रे यांची बरोबरी मराठी ग्रंथकारांत कुणालाच अद्याप साधली नाही. संभाजी चरित्राला जोडलेल्या यादीपेक्षाही मालोजी–शहाजी चरित्राला जोडलेली पुस्तकांची यादी अधिक "शास्त्रशुद्ध" आहे. सर जदुनाथ सरकार किंवा रियासतकार सरदेसाई यांचे नाव घ्यायचे नाही, असा जणू पण असल्याप्रमाणे संभाजी चरित्रातली यादी होती. प्रस्तुत यादीत उभय विद्वानांच्या अनेक पुस्तकांचा स्पष्ट उल्लेख आहे. अगदी ताज्या आवृत्तीचा उल्लेख केला आहे. अस्तु.

मालोजी आणि शहाजी यांची चरित्रविषयक माहिती इतक्या विस्ताराने, इतक्या तपशिलाने पूर्वी कोणी सांगितली नाही; म्हणून श्री. बेंद्रे यांच्या या प्रयत्नाचे कौतुक करावे तितके थोडे होईल. त्यांनी ह्या ग्रंथात पुष्कळ माहिती एकत्र केली. तीपैकी काही नव्याने सांगितली. चरित्रात एकसूत्र अनुस्यूत आहे. तीन पिढ्यांचे प्रयत्न एका ध्येयाने प्रेरित झाले. त्यांचा परिपाक म्हणजे शिवछत्रपतींची असामान्य कर्तबगारी होय; असे श्री. बेंद्रे यांनी म्हटले आहे. विशेषतः शहाजीराजांचे विजापुरी सुलतानांशी कोणत्या प्रकारचे नाते होते, यासंबंधी स्पष्टीकरण ( पृ. ५६३–६४ ) मौलिक आहे. त्याबाबत अधिक विवेचन आणि त्या विवेचनाला आधार अपेक्षित होते.

भातवडीच्या संग्रामात शहाजी हजर होता की नाही याबद्दल संशोधकांत वाद आहे. पण श्री. बेंद्रे म्हणतात, शहाजीने त्या लढाईत पुष्कळ पराक्रम गाजविला. शहाजी राजे ( त्यांचे पुत्र देखील ) संस्कृत पंडित होते "समस्या घालण्याइतके संस्कृतात (?) सामान्यतः बोलताही येत होते." ( पृ. ५३६ ) ही संस्कृतची प्रतिष्ठा पटत नाही.

आमच्या क्षत्रिय कुलावतंस छत्रपतींचे तीर्थरूप इतके संस्कृत पंडित असतील तर आम्हांसही त्यामुळे संतोष होईल. परंतु श्री. बेंद्रे सर्वस्वी विसंबून आहेत संस्कृत काव्यावर. राज-दरबाचे कवी अतिशयोक्ती करतात. त्यांच्या विधानात तथ्यांश कमी असतो. संभाजी–चंपा विवाहाबाबत श्री. बेंद्रे यांची फसगत संभाजी या नामसादृश्याने झाली–शीत ही फसगत अतिशयोक्तीमुळे होत आहे.

आणखीही बऱ्याच फसगती श्री. बेंद्रे यांच्या झाल्या असल्याचे दिसते. पहिली फसगत "खान खानन" बाबत. वास्तविक हा मोगली दरबारातला ( कोणत्याही दरबारातला ) सर्वोच्च हुद्दा. एका वेळी त्या राज्यात एकच "खान–इ–खानान" असावयाचा. प्रस्तुत चरित्रकाळात पाच खान-इ–खानानांचा संबंध येतो. पैकी दोन दिल्लीश्वराचे आणि तीन विजापूरच्या आदिलशाहीतले.

१. रहिमखान–बैरामखानाचा मुलगा ( ज. १५५६ मृ. १६२७, याचा बापही खान–इ–खानान होता.

२. महाबतखान झमान बेग, ( मृ. १६३४ ) रहिमखानानंतरचा खान–इ–खानान. हे दोघेही दिल्ली दरबारांतले.

( औरंगजेबाबरोबरही एक महाबतखान वावरत असे. तो खान-इ खानान होता की नाही, कळत नाही. पण त्याच्या नावामुळे घोटाळा होतो. )

आदिलशाहीतले तीन खान-इ-खानान :—

१. रुस्तुम जमान हबशी

२. मुस्ताफाखान ( मृ. १६४८ )

३. मुझफ्फर उद्दिन–खान महंमद सिद्दी रैहान ( मृ. १६५७ )

खान-इ-खानान या हुद्द्यामुळे कित्येक इतिहासकारांचा घोटाळा झाला. तसा तो श्री. बेन्द्रे यांचाही झाला हे विशेष. म्हणून नाम-निश्चिती, व्यक्ति-निश्चिती व्हावी; असा आमचा आग्रह.

हे "खान खानन" आणि महाबतखान एकच मानून श्री. बेन्द्रे चालले. ( पृ. ५८५ ) मियाँ मंजू आणि मियाँ राजू या दोघांना श्री. बेन्द्रे एकच समजतात. "मियान" असे ते लिहितात. पण मंजू ऐवजी कित्येक इतिहासांत अंजू असे नामांतर आढळते. दुसऱ्या बुऱ्हाणशहानंतर

गादीवर अल्पकाळ टिकलेला अहमद निजामशहा (स. १५९४–९५) हा खरा वारस नव्हे असा वाद माजला. तेव्हा वजीर मियाँ अंजू (मंजू?) अहमदचा पुरस्कर्ता म्हणून पुढे आला. त्याचा चांदबिबीशी झगडा वाढला–तेव्हा अंजू (मंजू) माघार घेऊन आदिलशाहीत नोकर झाला. (पृ. ९१). राजू हा मलिकंबरचा सहकारी मुत्सद्दी. पण पुढे तो मोंगलांस (खान-इ खानान रहिम-खान यांस) सामील झाला. अंबरशी त्याचे वैर माजले.

हमीदखानाबद्दलही थोडा कमी घोटाळा आहे. हमीद (खान) लाहोरी हा बादशहानाम्याचा लेखक. एका हमीदखानाने चांदबिबीचा खून केला (स. १६००); आणि लखुजी जाधवरावांवर छुपा हल्ला करून भर दरबारात अनेक खून पाडणारांत एक हमीदखान होता (स. १६३०).

शहानवाझखान हा खान–इ खानान रहिमखानाचा मुलगा मिर्झा इरिज. यास जहांगिरने शहानवाझखान ही पदवी दिली. वयाच्या ३३ व्या वर्षी (स. १६१९) मध्ये तो दारूच्या व्यसनापायी मृत्युमुखी पडला. अहमदनगर व बुऱ्हाणपूर लुटून "फस्त" करणारा "शाहाबाजखान" (पृ. ९०) कुणी आहे. तो शहानवाझखान आहे असे मानण्याचे कारण नाही. (पृ. ६१७) कारण मोगल दरबारचा हा शहानवाझखान स. १५९५ मध्ये अवघा ९–१० वर्षांचा बच्चा असला पाहिजे. पृ. ३१२ वर उल्लेखलेला शहानवाझखान निजामशाहीतला दिसतो आणि त्याचा उल्लेख स. १६२९ च्या नंतरचा (मोगल शहानवाझखान मेल्यानंतर १० वर्षांनंतरचा) आहे. आदिलशाहीतही एक शहानवाझखान होता असे दिसते. तो स. १६४८–९ मध्ये मृत्यू पावल्याची नोंद पृ. ३६९ वर आहे. ह्या तीन शहानवाझखानांबद्दल गफलत झाली हे उघड आहे. 'मिर्झा इरिच' म्हणून कुणी वेगळाच सरदार आहे (पृ. ११३), असे मानण्याचे कारण नाही. तो मोगलांकडील शहानवाझखान होय.

एवढ्या जाडजुड ग्रंथात आहे तरी काय? ह्या प्रश्नाचे उत्तर असे की मालोजी– शहाजी यांच्या चरित्राची साधने पुष्कळशी यात सामावली आहेत. त्यात थोडी पुनरावृत्ती असली, काही पाने संस्कृत उताऱ्यांनी व्यापिली असली, त्यांचा मराठी अनुवाद दिला नसला, एखाददुसरा दोन तीन पानांचा इंग्रजी उताराही अनुवादाशिवाय असला, तरी एकंदर माहिती एका पुस्तकात आणण्याचे हे महत्त्वाचे काम होय. "संभाजी चरित्र विषयक साधने" हे जसे संभाजीचरित्रग्रंथाचे यथार्थ नाव, तसेच प्रस्तुत ग्रंथाचे, "मालोजी शहाजी चरित्राची साधने" हे नाव अन्वर्थक होय.

स्वतंत्रपणे किंवा अनुवादात देखील अनर्थवाही, गोंधळात पाडणारे लिहिणे, हे श्री. बेंद्रे यांचे वैशिष्ट्य ठरले आहे. हे काही नमुने पाहा—त्यामुळे करमणूक खास होईल. अर्थबोध होणार नाही.

"इ. स. १६०४ त डेनियाल दौलताबाद–नासिक रस्त्याने बुऱ्हाणपुराहून अहमदनगरास आला. तेथे इब्राहिम आदिलशाहाच्या मुलीशी त्याचे पैठण येथे लग्न झाले." (पृ. ९४).

लग्नाबाबतच्या निवेदनात असा घोटाळा आणखीही एक दोन ठिकाणी झालेला दिसतो. पृ. १९१ वर निवेदन आहे:

"शहाजीने विजयराजाची जयंती संभाजीस करून, शरीफजीच्या म्हणजे विजयराजाच्या बहिणीच्या (दुर्गाच्या) नवऱ्याच्या धारातीर्थी पडल्याने जरा घटलेले संबंध वाढविण्याची इच्छा हीही त्या कालाच्या समाज–धारणेस धरून आहे."

विवाहाबाबत तिसरे उदाहरण शहाजहान बादशहाबद्दल आहे. त्या वेळी तो शहाजादा खुर्रम म्हणून वावरत होता.

"खुर्रमने एका राजाच्या विधवेशी लग्न केले आहे. काही मदत देण्याचे अभिवचन देऊन मलिक अंबरने आपली काळी मुलगी त्याच्या गळ्यात बांधली आहे." (पृ. १८१).

म्हणजे या शहाजहानची लग्ने झाली तरी किती? ते एक असो; पण ह्या वैशिष्ट्याला काय नाव द्यावे?—

"आदिलशाहीत इ. स. १५९४च्या सुरवातीस इस्मायल आदिशहास आदिलशाही तख्तावर आणण्याचा काही आदिलशाही सरदारांनी इब्राहिम आदिलशाहाविरुद्ध बेळगावास कट केला." (पृ. ११०).

ह्यापेक्षा एकही उच्चार अधिक वेळा आदिलशाहीचा ह्या वाक्यात करता येणार नाही, असे वाटते. एक विशिष्ट निवेदनपद्धती पाहा :—

"आदिलशहाला आपला बराच मुलूख मोगलाने घेतला असतानासुद्धा शहाजहानने घेतलेला सर्व आदिलशाही मुलूख व निजामशाहीचा अर्धा भाग देऊ करताच स्वाभाविकच

त्यांनी ( शहाजीराजांनी ) निजामशाहीचा उत्तरेकडील अर्धा मुलूख मोगलांस देऊन सख्य केले. ( पृ. ३६२ ).

तिचेच आणखी एक उदाहरण :--

"शहाजी भोसला याचवेळी निजामशाहीत शिरून दौलताबादेकडे गेला. ह्या हालचालीची माहिती लागताच अझमखान बीडाहून कूच करून आपल्या २०,००० स्वारांनिशी शिणगावाकडे जाऊ लागला. याच सुमारास शहाजी मागे सांगितल्याप्रमाणे अझमखानाकडे येऊन मिळाला. ( पृ. ३१५ ).

ही निवेदने अर्थवाही आहेत असे म्हणवत नाही. अर्थ समजण्यास अडचणी येतात. कित्येक शब्द--क्रियापदे--व्यर्थ आहेत असे वाटते. या वाक्यात पाहा :--

" जोराने पाठलाग होत आहे असे पाहून शहाजी तेथून त्रिंबक-त्रिंगलवाडीला जाण्यासाठी माहुलीला आला व तेथून निसटणे जड जाईल हे जाणून शहाजी माहुलीस जाऊन राहिला". ( पृ. ३५९--६० ) ह्या प्रकारची दुसरी एक तऱ्हा जरा निराळी आहे.

" ह्या वर्षांच्या उत्तम पिकामुळे जरी औरंगाबाद, गुजरात व खंबायत ह्या सुभ्यांत गेल्या दहा महिन्यांत तीस लक्ष व मलिकाच्या राज्यात दहा लक्ष लोकांवर मृत्युसंख्या गेली असली तरी त्याच्या फौजेची चांगली भर होऊ शकेल." ( पृ. ३५३ ).

ह्या वर्षाच्या उत्तम पिकामुळे गेल्या दहा महिन्यांत लाखो लोक मरतात कसे आणि ते मेले तरी फौजेत चांगली भर कशी पडणार, हे कोडे आम्हास तरी उलगडत नाही. अवघ्या एका वाक्यात देखील " कोडे " घालण्याची हातोटी ही पाहा :--

" एका भाकरीला प्राण अर्पिण्याची तयारी दाखविली तरी ती घेण्यास कोणी तयार नव्हते. " ( पृ. ३१८ ).

भाकरीला (--भाकरीसाठी ? ) प्राण अर्पिणे म्हणजे काय? आणि " प्राण घेऊन " इतरांचा काय फायदा ?

नाही तेथे गोंधळ उडविण्यासारखे लिखाण ह्या जोड चरित्रांत अनेक ठिकाणी आढळते. " आदिलशाही वजिरांनीही मुस्ताफाखानाला कैदेत टाकून खवासखानाकडे सर्व सत्ता दिली." ( पृ. ३४९ ) या छोट्या वाक्यात किती म्हणून गोंधळ असावा ? आदिलशाहीत पुष्कळ वजीर नेमण्याची प्रथा होती, ते वजीर इतर कुणाकडे तरी सत्ता सोपवीत, वजिराच्या जागी असलेल्या मुस्ताफखानाला त्यांनी कैदेत टाकले. खवासखानासारख्याच्या हाती सर्व सत्ता देणारे हे वजीर काय किमतीचे समजावे ?

वास्तविक हा सर्व समजुतीचा घोटाळा आहे. कारण मुस्ताफाखान हा तर सप्टें. १६२७ पासून आदिलशाही वजीर होता. त्याचे संपूर्ण नाव मिर्झा मुहंमद अमील लारी मुस्ताफाखान, खान बाबा. त्याच्या हातची सत्ता मध्यंतरी काही महिने ( सुमारे दोन वर्षे ) खवासखानाकडे होती. हा खवासखान म्हणजे बाटगा दौलतराव. वाममार्गाने त्याने काही महिने वजिरी सत्ता गाजविली. पण स्वतःस वजीर म्हणवून घेतले नाही. खवासखानाचा खून झाल्यावर ( स. १६३५ ) मुस्ताफा पुनः वजीर झाला तो मृत्यूपर्यंत ( नोव्हें. १६४८ ) वजिरीवर होता.

" निजामशाहीच्या अंतःस्थ कलहाच्या वहिर ( ? ) उपाधीच्या काळात मालोजीला सारखे झटत राहावे लागले." ( पृ. १२२ ) म्हणजे काय अर्थ होतो ? याच्याही पुढे आणखी गोंधळाची वाक्ये अशी :--" मालोजीच्या कार्यप्रवीणतेच्या ( ? ) कालात, निजामशाहीची घडी जी विस्कटून गेली होती, ती मलिक अंबराने थोड्याच कालात बसविली. मालोजी मात्र त्यापूर्वीच वर्ष सव्वा वर्ष स्वर्गस्थ झाला होता. " ( पृ. १२२--३ ). यावरून निष्कर्ष काय काढला ? तर, " मालोजीच्या कार्यतत्परतेचा जनमनावर बसलेल्या पगड्यामुळेच शहाजीच्या कर्तृत्वाला चांगलीच बैठक लाभली आणि स्थानिक मनुष्यबल-संपत्तीची त्याला पुढे कधीच कमतरता भासण्याचे कारण पडले नाही. ( पृ. १२३). मालोजीचा मृत्यु स. १६०६ मध्ये आणि शहाजीचा जन्म स. १६००--०१ मधला. मालोजीच्या ऐन उमेदीच्या काळात निजामशाहीची घडी विघडली, ती मलिक अंबरने थोड्याच काळात बसविली. तत्पूर्वी मालोजी स्वर्गस्थ झाला......ह्या निवेदनात मालोजीचे थोर कर्तृत्व कोणते व्यक्त झाले आहे ? " मनुष्यबल-संपत्ती " ची कमतरता होती म्हणूनच शहाजीला धरसोड करावी लागली ना ? निजामशाही सोडून आदिलशाही, आदिलशाहीतून पुनः निजामशाही--शेवटी फिरून आदिलशाही असा खेळ शहाजीला का करावा लागला ? मग " कमतरता भासण्याचे कारण पडले नाही. " ह्या म्हणण्यात स्वारस्य कोणते?

आता एक नवे वर्गीकरण पाहा : कोट, महाकोट, काळा कोट आणि अंबर कोट. मात्र हा कोट पोषाखापैकी नसून समस्त राज्याचे सार जो दुर्गकोट, त्यापैकी आहे--

" फतेखानाने निजामशाहाच्या मुलाला काळ्या कोटात नेऊन ठेवले. ही जागा साध्य करणे दुष्कर होते असे समजले जात होते. फतेखान खासा महाकोटात राहिला व अंबर-कोटात सैन्य सज्ज ठेविले. हा कोट मलिक अंबरने मोगली हल्ल्यास तोंड देण्यासाठीच बांधवला होता". ( पृ. ३२५ ).

× × ×

शास्त्रशुद्ध इतिहास लिहावयाचा म्हणजे स्थलनिश्चिती झाली पाहिजे. प्रस्तुत ग्रंथात इतकी स्थलनामे आहेत की त्यांची निश्चित जाणीव नसेल तर इतिहास नीट कळणार नाही. कंदाहार दूर अफगाणिस्तानात तसे कंधार मराठ-वाड्यांत. पण " इराण–कंधार " असे म्हटल्यावर ते अफगाणिस्थानातले कंदाहार होय. " मेरठ " चा उल्लेख चार वेळा ( पृ. ३८, ३९, ४४, ४७ ) आला. पण ते कुठे आहे हे कळले नाही. सोनपत ( पृ. ९१ ) हे पानिपत जवळचे दिसत नाही. मराठवाड्यात सोनपेठ असल्याचा पुरावा दोन अधिकृत संदर्भ ग्रंथांत मिळतो. ( इंपीरि. गॅझे-टियर–नकाशाखंड आणि सेन्सस १९६१ ची वर्णक्रमी. ) मुसलमानी रियासतीत ( ४ थी आवृत्ती खं. १ पृ. २३५ ) हुपे–सोनपेठ असा उल्लेख असून तळटीपेत " बीडच्या पूर्वेस ५० मैल " असा खुलासाही आहे. सोनपत असे श्री. बेंद्रे यांनी म्हटले आणि ते स्थल निश्चित कुठे आहे हे सांगितले नाही. प्रस्तुत ग्रंथात आम्ही अनेक स्थलनामांवर अडखळलो–त्यांपैकी काही अशी—

१. कुंद्री कंदन ( पृ. ३४१ ) कदरी कंदुरी ( पृ. २५९ ) कुंद्री कन्नूर ( पृ. २५३ ) कदरी कंजोरी ( पृ. २५१ )

ही चारी एकाच गावाची नावे दिसतात. यांपैकी खरे कोणते ? आणि ते कुठे आहे ?

२. माणिक डाऊन ( पृ. ९१ ) आणि माणिकदुर्ग ( पृ. ३१३ ) हीदेखील एकाच गावाची नावे असावी. पण पहिल्यात इंग्रजी शब्द घुसला ती चूक दिसते. माणिकदुर्गचे दुसरे नांव राजुरा असे इंपिरि. गॅझेटियरच्या नकाशात नमूद आहे.

३. तळटन–गड ( पृ. ३१९ ) हा कुठला हे कळत नाही.

४. बुगोल–भुगोल-पाबळ ( पृ. २९७–३४८ ) यांचा तपासच लागत नाही. त्याच्या बरोबरीने उल्लेखिलेले गांव बैजापुर वैझापुर हे वैजापुर ( रेल्वे स्टेशननजीक औरंगाबाद ) असावे.

५. जाफरनगर, जाफराबाद, झाफानगर ...अशा विविध स्वरूपांतले नगर नक्की कोणते, कुठले ते समजत नाही.

कित्येक वखारींच्या पत्रव्यवहारातील निर्देश सांगताना त्या त्या वखारींच्या ठिकाणांचे उल्लेख येतात. त्या वखार-वाल्या इंग्रजाला ही बातमी कळली कशी, इत्यादी चर्चा श्री. बेंद्रे करीत नाहीत. परंतु ही वखार कुठे आहे ही सामान्य माहितीही देत नाहीत. " सलाड " चे पत्र म्हणून पृ. १८० वर उल्लेख आहे. पण हे सलाड कुठले ?

कर्नाटकातल्या दहा गडांची यादी सांगताना अशीच अनिश्चितता दिसते. ओनाली, पोरलोर, परकन, पुलम्र, कर्डेलमस्त, चबकलमरवस्त... वकरकोंड... या नावावरून स्थानबोध होत नाही. ( पृ. ३८९–९० ).

ग्रामनामाबद्दल अडचणी पुष्कळ आहेत. एक तर ती बदलत गेली आहेत. कित्येक ठिकाणी त्यांचे संस्कृतीकरण झाले तसे फार्सीकरणही झाले. काहींची दोन नावे रूढ आहेत. भागानगर ( – हैदराबाद ), धाराशिव ( उस्मानाबाद ), इंदूर ( – निझामाबाद ) देवगिरी ( दौलताबाद ) खडकी ( – औरंगाबाद प्रेमगिरी– पेमगिरी, प्रेमगड– पेमगड, शाहागड, भीमगड, ) ही एकाच ठिकाणाची विविध नावे आहेत. धारूरचे धारागिरी, धारागिरीश्वर असेही स्वरूप आढळते. कृष्ण ( कर्नोल ) दुर्ग कोणता ( पृ. ३८६–३९१ ) याबद्दल खुलासा नाही. मेलगिरी पहाडातील कृष्णगिरी ( जि. सेलम, पेन्नार किनारी ? ) तर नव्हे ? जिंजीच्या अनेक नावांत एक नाव " कृष्णा " रंभी आहे. श्री. बेंद्रे यांनी स्थान–निश्चिती केली नाही, ती करावी असे त्यांना वाटले नाही. ही आमच्या संशोधनातली मोठी उणीव होय. व्यक्तिनिश्चिती आणि स्थलनिश्चिती झाली नाही तर ते संशोधन कसले समजावे ?

कुठल्या तरी फॅक्टरी रेकॉर्डातील ( बाजारी ) वातम्या ब्रह्मवाक्याप्रमाणे विश्वसनीय मानून कल्पनेचा डोलारा रचणे हे श्री. बेंद्रे यांचे आणखी एक वैशिष्ट्य.

खुर्रम बऱ्हाणपूरला पोचल्यावर मलिक अंबरने त्याच्याशी बोलणी लावून मोगलांची सर्व ठाणी परत दिली. ही एप्रिल १६२१ ची घटना ( हाऊस ऑफ शिवाजी–३ री आवृत्ती पृ. १८ ). श्री. बेन्द्रे यांनी ही घटना एक वर्ष आधी धरली आहे असे दिसते. ( पृ. २१५ ) तरी एकंदर कल्पनाचक्र त्यांनी चालविले ते असे :—

१. सुरतेच्या वखारीतील नोंदीवरून ( दि. २५ आणि २९ नोव्हें. १६२० ) "खुर्रमची सेना लाहोरहून मांडूला येऊन पोचली. निजामशाही फौजेने बऱ्हाणपूरला वेढा घातला होता."

एवढ्या सुतावरून श्री. बेन्द्रे ठामपणाने सांगतात की, "मोगली सैन्याची दख्खनमध्ये उत्तर हिंदुस्थानातून मदत येण्याचे अगोदर मलिक अंबरने मोगलाकडे त्यापूर्वी गेलेला मुलूख मराठा बारगिरांच्या साह्याने सोडवला होता, यात शंका नाही. ( पृ. २१६ )

यानंतरच्या निवेदनात जहांगिरनामा आणि वखारींचा पत्रव्यवहार यांचा आधार घेऊन काही घटनांचे तपशील ( त्या घडल्या असे निश्चित समजून ) सांगितले आहेत.

"मच्छलीपट्टणहून ॲम्सटरडॅमला दि. २९ फेब्रु. (?) १६२१ चे[1] पत्र गेले त्यातील बातमी जर आग्र्याहून अधिक मोगली सैन्य येण्याची भीती नसेल तर, बऱ्हाणपुराहून मोगली हद्दीत शिरून मलिक अंबर लूट करणार आहे." ( पृ. २१६–१७ )कुठे बऱ्हाणपूर–कुठे मच्छलीपट्टण. आणि त्यांनी ही ( बाजार ) गप्पच ऐकली–तशी लिहून कळविली. इतिहास-प्रेमी संशोधकांनी ह्या जुन्या नोंदी छापून प्रसिद्ध केल्या. एवढ्याने तो सर्व मजकूर "वेदवाक्य" मानण्याची प्रवृत्ती का व्हावी ?

आग्र्याहून इस्फाहान ( इराण ) ला अशीच खबर गेली की "मार्चमध्ये दख्खनी लोकांनी (?) मोगली हद्दीत लुटालूट करीत" आहेत. ( पृ. २१८ ). यावरून श्री. बेंद्रे तर्क चालविवात–

"बऱ्हाणपुराहून नर्मदा नदीपलीकडील स्वारी फेब्रुवारी–मार्च–एप्रिल मधील असून मलिक अंबराच्या सैन्याची माघार मे १६२१ मधील असावी." पुनः या विधानाला आधार घेतला सुरतेच्या ३ जाने. व १८ फेब्रु. ( स. १६२१ ) च्या नोंदीचा......पुढील काळातल्या घटना आधी बरोबर हेरण्याचे हे वखारवाल्यांचे अलौकिक ज्ञान फक्त श्री. बेंद्रे यांना म्हणूनच कळले.

दख्खनी ( डेक्कनी ) ह्या शब्दाचा, त्याने होणाऱ्या विशिष्ट अर्थाचा निर्देश मुद्दाम केला पाहिजे. श्री. बेंद्रे यांना तो ठाऊक नसल्याप्रमाणे त्यांनी त्याचा उपयोग प्रस्तुत ग्रंथात सर्वत्र केला आहे. त्या वेळच्या निरनिराळ्या दरबारात विविध मुत्सद्दी असत. त्यांचा निर्देश इराणी, तुराणी, पठाणी, हबशी, डेक्कनी...असा होई. डेक्कनी याचा अर्थ परकी मुसलमानांची एतद्देशीय प्रजा. ती बहुधा मुसलमानी होती. क्वचित प्रसंगी डेक्कनी, दखनी, याचा अर्थ दक्षिणेकडे ( औत्तरीयांच्या दृष्टीने ) राहणारे असा होई. डेक्कनी, दखनी किंवा दक्षिणी याचा अर्थ आज कित्येकजण "महाराष्ट्रीय" (मराठे) असा करतात. तो इतिहासकाली तरी अभिप्रेत नव्हता. हिंदुस्थान म्हणजे उत्तर हिंदुस्थान तसे डेक्कन–दख्खन म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेकडील द्वीपकल्प. तेवढ्या अर्थाने म्हणजे "दख्खनी" मुलखात राहणारे म्हणून मराठे दख्खनी ठरतात. परंतु ऐतिहासिक पत्रात दख्खनी, डेक्कनी, हा कोणत्या अर्थाने उपयोजिला आहे, हे नक्की पारखले नाही तर नीट अर्थबोध होणार नाही.

साधनचिकित्सा हा तर शास्त्रशुद्ध इतिहासाचा पाया समजतात. श्री. बेंद्रे यांनी ह्या चरित्रग्रंथात शिव–भारत, अणू (?) पुराण आणि बुसातीनुस्सलातीन या ग्रंथांतील उताऱ्यांवर दिलेला भर पाहिला म्हणजे त्यांची साधन-चिकित्सा थोडी ढिली दिसते. वास्तविक बुसातीनुस्स-लातीन हा विजापूरच्या इतिहासाला उपयोगी ग्रंथ अगदी अलीकडचा म्हणजे स. १८२४ मध्ये लिहिलेला. त्यावर विश्वास जपून ठेवावयास पाहिजे, विशेषतः मराठ्यांशी विजापूरकरांचे संबंध लक्षात घेता "बुसातीन"[1] मधील माहिती अधिक तोलून पारखून घेणे इष्ट, पण तसे काही झाल्याचा प्रत्यय येत नाही.

टीपा देण्यातही "बुसातीन"चे एक वैशिष्ट्य श्री. बेंद्रे यांनी राखले आहे, प्रस्तुत ग्रंथात पृ. २७३–९१ पर्यंत "बुसास" यातील सलग उतारे आहेत. वास्तविक एका अगर दोन टीपांत त्यांचा निर्देश करता आला असता. पण श्री. बेंद्रे यांनी १८ वेळा "बुसास" असा उल्लेख १८ टीपांत केला आहे. पृ. ३६४–६९ पर्यंत असेच "बुसास" मधील उतारे आहेत. त्यासाठी सात वेळा उल्लेख केला.

---

१. स. १६२१ ला "लीप" वर्ष कसे आले ? आदल्या वर्षाची ही नोंद आहे की तारीख चुकली ? काही तरी खुलासा हवा.

१. बुसातीनच्या मराठी अनुवादाच्या दोन प्रती श्री. बेंद्रे यांच्या संग्रही आहेत. एक नरसिंह विठ्ठल पारस-निसकृत, ११७ वर्षांपूर्वीची, दुसरी कुणाची आहे हे ठाऊक नाही. पण हे साहित्य प्रकाशित का होत नाही ?

अनुक्रमणिका

संभाजी चरित्रात बुसातीनचा संक्षेप जरा निराळा आहे. बुसापा, बुसाउ यावरून बहुधा पारसनीसकृत मराठी अनुवाद आणि अहमदमियांनी केलेला उर्दू तर्जुमा अभिप्रेत आहे असे वाटते. " बुसापा " चा निर्देश कित्येक ठिकाणी " वही ५ " " वही ६ " आणि पृ. ...असा केला असता प्रस्तुत ग्रंथात मात्र नुसती पृष्ठसंख्या सांगितली आहे. ह्या निर्देशपद्धतीत फरक का पडावा कळत नाही.

तुझुक इ–जहांगिराच्या इंग्रजी आवृत्तीवरून काही उतारे अनुवादून दिले. घटनांना " तुझुक " चे आधार घेतले (पृ. २२०–२३) पण आधार देताना कोणता खंड तो सांगण्याचे राहिले.

तुझुकचा इंग्रजी अवतार दोन खंडांचा असून श्री. बेंद्रे यांनी निर्देशलेले प्रसंग दुसऱ्या खंडातले आहेत. टीपा क्र. ३८–४८ (पृ. ३०२–१०) हे मुहमदनाम्यातले आहेत. त्याचा इंग्रजी संक्षेप ह्या टीपांत चुकीने छापला आहे. वास्तविक एका निर्देशात काम भागले असते, पण ११ वेळा ग्रंथ–पृष्ठांक निर्देश केल्याने इंप्रेशन अधिक पडते की काय ?

बखरींचा आणि बखरकारांचा (निष्कारण) उद्धार हे श्री. बेंद्रे यांचे वैशिष्ट्य संभाजी चरित्रात आढळते–त्यापेक्षा अधिक उत्कटतेने ते प्रस्तुत जोड चरित्रात आढळते. आज आपणांस उपलब्ध असलेली सर्व साधने बखरकारांनाही त्या वेळी उपलब्ध होती, अशी समजूत झाली असल्याने श्री. बेंद्रे यांची ही टीका अस्थानी ठरते. बखर लिहिणारे हे कुणी पद्धतशीर इतिहास लेखक होते, असे मानण्याचा अविचार कुणी विचारवंत करणार नाहीत. बेंद्रे यांचा बखरकारांवरील हल्ला अनाकलनीय वाटतो. कित्येक वेळा तर बखरकारांचे दोष स्वतः बेंद्रे यांच्या आधुनिक शास्त्रशुद्ध इतिहासात आढळतात, तेव्हा त्या हल्ल्याने, श्री बेंद्रे यांच्या टीकेचे हसे होते.

सारांश, हा जोड चरित्र–साधन ग्रंथ चांगला जाडजूड आहे. त्यात पुष्कळ साहित्य एकत्रित केले आहे. मात्र ते नीट जोखून–पारखून–तपासून घेतलेले दिसत नाही. व्यक्ति–स्थल–काल निश्चिती अधिक कसोशीने झाली पाहिजे आणि साधनांची, विशेषतः काव्याची, चिकित्सा कसून करणे जरूर असते. मुख्य म्हणजे " विद्या विनयेन शोभते " हे लक्षात घेऊन सहकाऱ्यांची उपेक्षा न करता, टीकाकारांचा अधिक्षेप न करता, संशोधन ही कुणा एकाची मिरासदारी नाही हे ओळखून चालणे आवश्यक आहे, एवढेच सांगावयाचे. शाहू छत्रपतींच्या शब्दांत, " मुद्दा असा " एवढे म्हटल्याने कार्यभाग व्हावा.

**श्री. रा. टिकेकर**

◆ ◆ ◆

## इतिहासाचे तत्त्वज्ञान

लेखक प्रा. सदाशिव आठवले, प्रकाशक प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई. पृ. सं. २११ किं. रु. ५.

प्रस्तुत ग्रंथात माणसाच्या मनात इतिहासाच्या वास्तविक स्वरूपासंबंधी जे अनेक ग्रह खोल दडून बसलेले असतात त्यावर जोराचा हल्ला चढविलेला आहे. लेखकाचे या विषयाचे वाचन विस्तृत असून त्यांनी अनेक पाश्चिमात्य ग्रंथांच्या आधारे व स्वतःची विचारप्रणाली मांडून दुर्ग्रहांचे निराकरण केले आहे.

प्रारंभी इतिहासाचे तत्त्वज्ञान म्हणजे काय असा प्रश्न उपस्थित करून त्याचे उत्तर ' मानवी जीवनात जे बदल घडत जातात त्यांत काही नियमबद्धता असते काय ? आजपर्यंतच्या इतिहासाच्या अवलोकनावरून माणसाला काही शिकता येण्यासारखे आहे काय ? या प्रश्नांच्या उत्तराचा शोध म्हणजेच इतिहासाचे तत्त्वज्ञान ' (पृ. १९) असे सांगून, आजपर्यंत मानवी जीवनात नियमबद्धता असल्याचे जणू काय गृहीत धरून अनेक विद्वानांनी जी इतिहासाच्या तत्त्वज्ञानाची विविध प्रकारे मीमांसा केली त्याची चिकित्सा करून त्या सर्व कशा चुकीच्या आहेत हे दाखविले आहे. पण असे करीत असता त्यांपैकी निदान काही चिकित्सा चुकीच्या असल्या तरी त्या प्रत्येकात जी काही अर्धसत्ये दडलेली आहेत ती प्रांजलपणे मांडण्यासही ग्रंथकार विसरलेला नाही. मानवी जीवन ईश्वरी सूत्राने कदाचित बद्ध असलेच तरी त्या ईश्वरी सूत्राची प्रतीती कुणासही आलेली नाही, मानवी जीवनाचे नियंत्रण व मार्गदर्शन एखाद्या वंशाकडे आहे, किंवा अमुक एक वंश श्रेष्ठ व दुसरा कोणी कनिष्ठ हा सिद्धान्तही भ्रमभूलक आहे. कारण वंशश्रेष्ठत्व शरीररचनेवर आधारलेले असून सर्व प्रकारच्या शरीरवैशिष्ट्यांचे महापुरुष जगात आजपर्यंत निर्माण झाले आहेत (पृ. ५१) असे ग्रंथकाराचे म्हणणे आहे. पुढे ग्रंथकारांनी राष्ट्रीय अवतारकार्याचे तत्त्वज्ञान यासंबंधीच्या विवेचनात हेगेलच्या सिद्धान्तांचा समाचार घेतला आहे.

हेगेलने आपल्या मीमांसेने एक प्रकारे प्रशियाच्या हुकूमशाही धोरणाला तात्त्विक अधिष्ठान दिले, परंतु पुढे प्रशियाचे काय झाले ते इतिहासास ठाऊकच आहे, असे ग्रंथकाराने सांगून हेगेलच्या विवेचनातील हेत्वाभास उघड केला आहे, इतकेच नव्हे तर प्रशियाप्रमाणे भारतालाही या जगात एक कार्य आहे ते म्हणजे मानवी जीवनास काही आत्मिक अधिष्ठान देण्याचे, असा दावा विवेकानन्द, अरविन्द बाबू इत्यादींनी मांडला परंतु भारताची ही आधिदैविक शक्ती म्हणजे नेमके काय याचा नक्की बोध कुणाला कधी झाला आहे की नाही कोण जाणे (पृ. ६७) असे म्हणून माणसाप्रमाणे राष्ट्रलाही काही स्वभाव असतो हे विधानही कसे भ्रामक आहे ते सांगण्याचा प्रयत्न केला आहे. पुढील भागात इतिहासाच्या भूगोलनिष्ठ विवरणाचा असाच समाचार घेताना. ग्रंथकार म्हणतात, ' प्राचीन इजिप्तमध्ये ज्या भौगोलिक परिस्थितीमुळे एक महान संस्कृती वाढली असे समजतात तशीच परिस्थिती जॉर्डन खोऱ्यात असूनही तेथे मात्र काहीच निर्माण होऊ शकले नाही.' (पृ. ८०) तसेच मानवी इतिहासाच्या गतीचे काही सिद्धान्त आहेत. प्रत्येक मानवी संस्कृतीस मानवी जीवनाप्रमाणे बाल्य, प्रौढ व अधोगती अशा अवस्थांतून जावे लागते या स्पेंग्लरकृत सिद्धान्ताचे परीक्षण करून पाश्चिमात्य संस्कृती ही त्या सिद्धान्ताप्रमाणे अधोगतीच्या मार्गाला लागलेली आहे हे स्पेंग्लरचे मत निखालस चुकीचे आहे; कारण ' पाश्चिमात्य संस्कृती या ना त्या स्वरूपात गेली हजार वर्षे तरी अस्तित्वात असून ती मरणाच्या पंथाला लागली आहे असे मुळीच दिसत नाही. ' (पृ. ९६) असे ग्रंथकारांनी आपले मत मांडले आहे. टॉयन्बीने मानवी संस्कृतीचे एकवीस विभाग कल्पून त्यांचे बारा खंडांत सिंहावलोकन करून काही सिद्धान्त मांडण्याचा यत्न केला त्याचाही समाचार घेऊन प्रा. आठवले पीटर गेलचे वचन उद्धृत करत म्हणतात,'टॉयन्बी हा इतिहासकार नाही, तो एक ईश्वराचा प्रेषित आहे. त्याला वाटल्यास नमस्कार करावा परंतु त्याचे इतिहासाचे तत्त्वज्ञान मात्र मानण्याचे कारण नाही. ' या खेरीज पीटर सोरोकिन याचा मानवी जीवनाचा अध्यात्मिक सिद्धान्त व प्रगतिवादी तत्त्वज्ञान्यांचा आशावादी सिद्धान्त यांचे असेच परीक्षण लेखकाने केले आहे. पुढील भागात मार्क्सचा इतिहासाचा आर्थिक अन्वयार्थ व वर्गकलह सिद्धान्त इत्यादींचे विवेचन रशियन क्रान्तीने कसे चुकीचे ठरविले-- कारण रशियन क्रान्तीही मार्क्सच्या मीमांसेनुरूप घडून आलेली नाही व खुद्द रशियन क्रान्तीबद्दलही बर्ट्रांड रसेल म्हणतो लेनिनला जर्मनीतून रशियास यावयास मिळाले म्हणूनच ती घडून आली की हे इतिहासातील आकस्मिक प्रकार लक्षात घेता इतिहासाचा आर्थिक अन्वयार्थ लावणे कसे अर्धसत्य आहे ते लेखकाने दाखविले आहे. यानंतर कार्लाइलचा सिद्धान्त इतिहास म्हणजे महापुरुषाच्या कर्तृत्वाची हकीकत याचे परीक्षण करून व तोही कसा चुकीचा आहे हे दाखवून लेखक आपल्या साऱ्या विवेचनाचे सार रसेलचा अनुवाद करून पुढील शब्दांत सांगतात.

' History can only be made to seem scientific by falsifications and omissions. ' (पृ. १४२ ) सारांश, इतिहासासंबंधी आजपर्यंत मांडण्यात आलेले सर्व सिद्धान्त चुकीचे असून इतिहासाचे स्वतःचे असे तत्त्वज्ञान सांगता येणार नाही असे लेखकाचे मत आहे. शेवटच्या दोन भागांत इतिहासाचे दुरुपयोग व उपयोग यासंबंधी विवेचन करून लेखकानी वाचकास पुढील शब्दांत इशारा देऊन आपला वाचनीय ग्रंथ संपविला आहे. ' आपण वर्तमानकाळाचे धनी आहोत.......मानवाने इतिहासाची वास्तपुस्त करावी, पण त्याच्या पाशात अडकू नये ' आपण स्वतंत्र आहोत इतिहासाचे अंकित नाही. ( पृ. १९९ )

समीक्षणाच्या मर्यादित जागेत ग्रंथकाराच्या विवेचनाचे पुरेसे स्पष्टीकरण करणे शक्य नसले तरी ग्रंथाचे स्वरूप कळण्यास ते पुरेसे आहे. एका अर्थी भावनाप्रधान दृष्टी टाकून इतिहासासंबंधी चिकित्सक व चिंतनपरवृत्ती इतिहास वाचकांच्या मनात निर्माण करण्यास लेखकाचे विवेचन फारच उपयुक्त ठरेल. परंतु या ग्रंथाबद्दल माझी मुख्य तक्रार अशी की प्रा. आठवले यांचे विवेचन वाचून केवळ सामान्य वाचकाचीच नव्हे तर कित्येक अभ्यासकांचीदेखील अशी समजूत होईल की इतिहासाला जर तत्त्वज्ञानच नाही, व त्यातून मानवाला काही बोध घेणे शक्य नाही, तसेच स्फूर्ती घेणे हेही जर भ्रममूलकच आहे किंबहुना ऐतिहासिक घटनांच्या चिंतनाने सामाजिक घटनांची वस्तुनिष्ठ मीमांसा करण्याची शास्त्रीय दृष्टी निर्माण होण्याचीही शक्यता नसेल. तर इतिहासवाचनाच्या जंजाळात पडायचे तरी कशाला ? सामान्य वाचकाला इतिहासवाचनापासून पळवून लावणारा हा ग्रंथ आहे. या ग्रंथाचे थोडक्यात सार असे की, हवे तर मनोरंजनार्थ इतिहास वाचावा. ग्रंथकाराच्या शब्दांत ' इतिहास मुक्त होऊन इतिहास

अनुक्रमणिका

वाचावा'. इतिहास का वाचावा तर 'अनर्थकारी इतिहासापासून समाजाला वाचवावे म्हणून.' (पृष्ठ १९८). तर मग हा इतिहास कसा लिहावा? अर्थात पूर्वग्रह टाळून. पण असा पूर्वग्रह टाळून लिहिलेल्या इतिहासाचे एकही उदाहरण प्रा. आठवल्यांना दाखवता आले नाही.

दुसरा मुद्दा असा की, मानवी जीवनात प्रगतीची काही वाटचाल आहे असे म्हणणे चुकीचे आहे का? पूर्वी इतिहासात वैयक्तिक प्रेमप्रसंगावरून किंवा वैषयिक आसक्तीवरून युद्धप्रसंग झाले. उदा. हेलेन–युलिसिस किंवा अलाउद्दीन–पद्मिनी. आता यापुढे अशा प्रेमप्रकरणावरून राष्ट्राराष्ट्रांत युद्धप्रसंग घडण्याचा संभव आहे काय? पूर्वीच्या काळी इतिहासात रानटी टोळ्यांनी सुधारलेल्या मानवी जीवनाचा विध्वंस केला. आता तसा संभव राहिलेला नाही–आता सुधारलेले लोकच एकमेकांवर कुरघोडी करू पाहात आहेत ही गोष्ट वेगळी. पूर्वी धर्मकारणावरून अनेक युद्धे झाली आता धर्मकारण हे मानवसमूहातील युद्धप्रसंगास तसे कारणीभूत होईल काय? मानवी जीवनसमूह हा 'स्वातंत्र्य' संपादनाच्या दृष्टीने वाटचाल करीत आहे हे खरे नाही का? मानवाची प्रगती म्हणजे स्वतःच्या सुखासाठी निसर्गशक्तीचे उत्तरोत्तर यशस्वी होत गेलेले नियमन असे म्हणता येईल की नाही? मानवी जीवनाची वाटचाल विश्वबंधुत्वाची आवश्यकता पटवून देण्याकडे होत आहे की नाही? या दृष्टीनी इतिहासाकडे पाहिल्यास इतिहासाचा अभ्यास करण्याची प्रवृत्ती वाढून उपलब्ध पुराव्यावरून व अर्थशास्त्र, मानसशास्त्र, समाजशास्त्र इ. शास्त्रांचा आधार घेऊन सामाजिक घटनांचे सावधगिरीने पृथक्करण करण्याची व सत्यसंशोधनाची प्रवृत्ती वाचकाच्या मनात उत्पन्न होईल. पण ते करण्याऐवजी मानवी जीवनास तत्त्वज्ञानच नाही असा आभास लेखकाने आपल्या विवेचनाने निर्माण केला तर कोण कशाला इतिहासाच्या वाचनाकडे वळेल?

पण एका अर्थी प्रा. आठवले यांचा मराठी वाङ्मयातील हा ग्रंथ योग्य वेळी पुढे आला आहे. किंबहुना इतिहासाच्या आजपर्यंतच्या सिद्धान्तांचे समालोचन करून वाचकाच्या मनात काही अस्वस्थता व शंका उत्पन्न करणारा हा पहिलाच ग्रंथ आहे. यापूर्वी मराठीत विष्णुशास्त्री चिपळूणकर, राजवाडे, दत्तोपंत आपटे, पुणतांबेकर यांनी आपापल्यापरी हा विषय विवेचिला आहे. त्या त्या कालास अनुसरून प्रत्येकाचा दृष्टिकोण वेगळा आहे. महाराष्ट्रातील इतिहासलेखकाच्या विचारांचे समीक्षण हा वेगळाच विवेचनाचा विषय होईल. परंतु प्रस्तुत समीक्षणापुरते म्हणावयाचे तर विद्यमान मराठी वाङ्मयात बुद्धिप्राधान्य, वास्तवता इत्यादी गुणांस असाधारण महत्त्व प्राप्त झाले आहे. आणि अनेक लेखक आपापल्या लेखण्या सरसावून आपापल्या विषयापुरते भ्रमनिरासाच्या पाठीमागे लागले आहेत. राजकारणातही ध्येयवादी पण स्वप्नाळू अशा नेहरू युगाचा आता अस्त झाला असून विद्यमान भारतीय राजकारणावर वास्तववादाची छाया पडू लागली आहे. प्रा. आठवले यांचा ग्रंथ असा इतिहासविषयक अनेक भ्रमांचा निरास करणारा आहे. याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करून हे समीक्षण संपवितो.

—रा. वि. ओतुरकर

◆ ◆ ◆

## हेगेल : जीवन आणि तत्त्वज्ञान

ले. दि. के. बेडेकर, पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे ७; १५ रु.

**ग्रंथाचे स्वरूप व भूमिका :**

हेगेलचे तत्त्वज्ञान समग्रपणे मांडावयाचे तर त्याची ग्रीक व युरोपीय पार्श्वभूमी विशद करणे आवश्यक ठरते. त्याचप्रमाणे, हेगेलच्या पूर्ववर्ती, समकालीन आणि उत्तरकालीन तत्त्वज्ञांच्या भूमिका सांगणे युक्त ठरते. परंतु बेडेकरांनी आपल्या ग्रन्थाचे विवेचन हेगेलपुरतेच मर्यादित ठेवले आहे. त्यामुळे त्याचे स्वरूप हेगेलच्या तत्त्वज्ञानाची जिज्ञासू वाचक व विद्यार्थी यांना फक्त रूपरेखा समजावून देणे, त्याच्या तत्त्वचिंतनाचा परिचय करून देणे एवढेच मर्यादित झाले आहे. अर्थात, "हेगेलच्या तत्त्वज्ञानाचं अध्ययन, मंडन किंवा खंडन आणि साधा परिचयही मराठी सुशिक्षितांच्या विचारक्षेत्रात आजवर सामावलेला नाही" ही बेडेकरांची तक्रार व व्यथा (पृष्ठ ३८) अगदी सार्थ आहे. त्या दृष्टीने त्यांनी आपल्या प्रदीर्घ अभ्यासाने व चिंतनाने हेगेलच्या तत्त्वज्ञानाचा सविस्तर परिचय करून देण्याची केलेली अतिशय अवघड व किचकट कामगिरी बहुमोल स्वरूपाची आहे.

**मराठी भाषेतील आजचे तत्त्वज्ञानात्मक साहित्य आणि बेडेकरांच्या ग्रंथाचे महत्त्व :**

तत्त्वज्ञान विषयाच्या विविध, मूलभूत प्रश्नांची आणि विचारप्रवाहांची सविस्तर व सुस्पष्ट कल्पना आणून

देण्याच्या दृष्टीने मराठी भाषेतील प्रसिद्ध झालेली ग्रन्थ-संपत्ती पाहिली तर ती अगदीच अपुरी, त्रोटक व असमाधानकारक आहे. भारतीय दर्शनपद्धतींचा चिकित्सक अभ्यास बऱ्याच व्यक्तींनी मांडलेला आहे. परंतु, पाश्चात्त्य तत्त्वज्ञ, तत्त्वग्रंथ आणि तत्त्वज्ञानात्मक विचारप्रवाह यांची माहिती विस्तृत आणि व्यवस्थितपणे प्रसिद्ध झालेली नाही. झालेले काही प्रयत्न अगदी प्राथमिक स्वरूपाचे आहेत. प्लेटो, ॲरिस्टॉटल, कान्ट, विल्यम जेम्स, जॉन ड्यूई, व्हाइटहेड, रसेल, आयर, विट्गेन्स्टाइन, सार्त्र इ. जगद्विख्यात विचारवंतांचा नीटस परिचय मराठी वाचकाला ( मातृभाषेतून ) झालेला नाही. तसे ग्रंथ ही सुशिक्षित व जिज्ञासू वाचकाची आजची गरज आहे. त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील सहा विद्यापीठांतून तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणारे विद्यार्थी आणि इतर वाचक विशेषतः भाषाविषयाचे अध्यापक–प्राध्यापक, वक्ते आणि विचारवंत यांना युरोपीय व अमेरिकन, फ्रेंच आणि जर्मन ( चिनी आणि रशियनसुद्धा ) तत्त्वचिंतनाचा परिचय करून देईल असा " जागतिक तत्त्वज्ञानाचा इतिहास " आज आवश्यक आहे. मानसशास्त्र व तत्त्वज्ञान यांच्या विविध तत्त्वांची आणि विचारप्रवाहांची अधिकृत ओळख झाल्यास, भाषाशास्त्र, सौंदर्यशास्त्र, आणि साहित्यमीमांसा यांविषयीचे आज मराठी वाङ्मयात होणारे चिंतन व विचारप्रदर्शन, अधिक ढोळस, सकस आणि उपयुक्त स्वरूपाचे होईल, असा विश्वास वाटतो. त्या दृष्टीने बेडेकरांनी हेगेलचे जीवन व तत्त्वज्ञान यांचा करून दिलेला परिचय ही निःसंशयपणे स्वागतार्ह घटना आहे. बेडेकरांसारख्या व्यासंगी, परिपक्व समीक्षकामार्फत हे काम पूर्ण करविल्याबद्दल पुणे विद्यापीठास मनःपूर्वक धन्यवाद. पुणे विद्यापीठ आणि त्याचा तत्त्वज्ञान व मानसशास्त्र विभाग यांनी जागरूकता व क्रियाशीलता दाखवून, मराठी साहित्यातील शास्त्रीय व वैचारिक ग्रंथांच्या संदर्भातील दारिद्र्य दूर करावे आणि विद्यार्थी व जिज्ञासू वाचक यांना ' डोळस ' करण्याच्या विधायक कामात प्रेरक व पोषक धोरणे आखावीत ही विनम्र सूचना.

### ग्रंथातील प्रतिपाद्य विषय :—

विषयप्रवेशाच्या पहिल्या प्रकरणात, ज्ञान, विश्व अंतिम सत्ता व जीवनमूल्ये यांविषयीच्या हेगेलच्या, मतांचा विश्लेषणात्मक व तुलनात्मक परिचय करून दिलेला आहे. दुसऱ्या प्रकरणात हेगेलच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू विशद केलेले आहेत. तिसऱ्या प्रकरणात विश्वचेतनसिद्धान्त ( Doctrine of spirit ) समजावून सांगितलेला आहे. चौथ्या प्रकरणामध्ये हेगेलच्या सुप्रसिद्ध समावर्तनपद्धतीचे ( Dialectical Method ) स्वरूप सांगितले आहे. पाचव्या प्रकरणाचे दोन विभाग आहेत. दोन्ही विभागांत मिळून मानवी प्रज्ञेच्या साहाय्याने तयार होणारी, आविष्कृत व विकसित होणारी विश्वाच्या रचनेसंबंधीची संकल्पनात्मक प्रणाली ( Conceptual System )- जिला बेडेकरांनी ' परिभाव्व्यूह ' म्हटले आहे, व ज्याला हेगेलचे लॉजिक म्हणतात, त्या विषयी विवेचन आले आहे. सहाव्या, सातव्या प्रकरणांत, वैयक्तिक व सामाजिक (संस्थात्मक) नीतिमूल्याविषयीची हेगेलची मीमांसा सांगितलेली आहे. आठव्या प्रकरणात, हेगेलचा कलाविषयक दृष्टिकोण अथवा हेगेलचे सौंदर्यशास्त्र विशद केले आहे. शेवटच्या दोन प्रकरणांत, हेगेलची इतिहास-मीमांसा आली आहे.

या सर्व प्रकरणांतून, हेगेलच्या तत्त्वज्ञानाची मूलतत्त्वे, त्यांचा विस्तार आणि व्यक्ती, समाज व विश्व याबद्दलचे, हेगेलचे तत्त्वचिंतन यांचा यथार्थ परिचय करून देण्याचा कसोशीचा प्रयत्न बेडेकरांनी केला आहे.

या सर्वांमधून ( १ ) चिद्वाद ( Idealism ) ( २ ) विश्वाची स्वसंवेद्यता ( ३ ) श्रेयोगर्भता ( ४ ) प्रज्ञागर्भता ( ५ ) सर्जनशीलता व विकासक्षमता, ही हेगेलची प्रमेये, बेडेकरांनी क्रमशः समजावून दिली आहेत.

### प्रतिपादनाचे काही विशेष

बऱ्याच ठिकाणी हेगेल व त्याचे तत्त्वज्ञान या विषयींचे गैरसमज बेडेकरांनी स्पष्टपणे खोडून काढले आहेत. शिवाय त्याच्या मूलभूत प्रमेयांच्या व तत्त्वज्ञान पद्धतीच्या संदर्भात अनेक युक्त स्वरूपाचे खुलासे व बदल त्यांनी सुचविले आहेत— ज्यामुळे हेगेल समजण्यास अधिक मदत होते. त्याबद्दल बेडेकरांच्या चिकित्सक समीक्षा-पद्धतीचा जरूर गौरव केला पाहिजे. दोन महत्त्वाची उदाहरणे पुढील प्रमाणेः—

( १ ) हेगेलच्या समावर्तन पद्धतीचे ( Dialectics ) विश्लेषण करताना बेडेकरांनी तिचा अन्वयार्थ अधिक समर्पकपणे व नव्या दृष्टिकोणातून मांडला आहे. ते म्हणतात, " दोन वस्तूंच्या परस्परांशी होणाऱ्या संघर्षातून एका वस्तूचा नाश होतो व दुसरी वस्तू विकसित होते.

असा नेहमीचा अनुभव आहे. संघर्षातून किंवा विरोधातून विकास होण्याच्या या प्रक्रियेला 'विरोध–विकासाचे' तत्त्व म्हणता येईल, हेच तत्त्व हेगेल व त्याचा शिष्य मार्क्स याने सांगितले आहे व हाच डायलेक्टिक्सचा अर्थ होय, असे प्रतिपादन बऱ्याच मराठी लेखकांनी केले आहे."

मात्र डायलेक्टिक्सचा हा प्रचलित अर्थ अत्यंत विपर्यस्त अर्थ असून, संघर्ष वा विरोध या गोष्टी, डायलेक्टिक्सचे प्राणतत्त्व नाही; हा मुद्दा विशद करताना आणि हेगेल व मार्क्स यांच्या विवेचन पद्धती-संबंधीच्या गैरसमजाचे निराकरण करताना व त्यांचे यथार्थ स्वरूप स्पष्ट करताना बेडेकर म्हणतात,

"भाव (Thesis), अभाव (Antithesis) व समुद्भाव (Synthesis) यांच्या आधारे तयार होणाऱ्या डायलेक्टिक्सचा किंवा समावर्तन प्रक्रियेचा गाभा, एकात्मता आहे, हे ध्यानात घ्यावयास हवे ...... एकात्मतेचे तत्त्व ढळू न देता डायलेक्टिक्सच्या पद्धतीमध्ये एक त्रयीभाव हेगेलने सांगितला आहे. मार्क्सने या त्रयीभावाला क्रान्तीचे सूत्र म्हणून गौरविले आणि लौकिकार्थाने क्रान्तीमध्ये जो संघर्ष असतो तोच त्रयीभावाचा आशय होय असे आपल्याकडे मानले गेले, यात नवल नाही. परंतु एखाद्या वस्तूला विरोध करणारी दुसरी वस्तू असते व त्या दोन वस्तूंच्या होणाऱ्या संघर्षातून एकीचा नाश व दुसरीचा विकास होतो, या धोपटक्रमाला त्रयीभाव मानणे म्हणजे हेगेलच्या प्रमेयाचे विडंबनच आहे. पण असे विडंबन मराठीमध्ये बऱ्याच प्रमाणावर झाले आहे व विरोध विकासवाद हा डायलेक्टिक्सला रूढ झालेला प्रतिशब्द याच विडंबनाचे शब्दरूप प्रकटवीत आहे."

हेगेलच्या त्रयीभावाचे रहस्य बेडेकरांच्या मताने "दोन स्वतंत्र वस्तूंच्या संघर्षात नसून परस्पर सापेक्ष अशा दोन कलांच्या समावेशनात आहे." बेडेकरांनी लावलेला हा हेगेलच्या तत्त्वज्ञानपद्धतीचा अर्थ मान्य केला तर, विरोध विकासवादी क्रान्ती तत्त्वज्ञानाचा तात्त्विक पायाच ढासळू लागतो. कारण संघर्ष, अशान्तता, द्वेष, विरोध या नकारात्मक व विध्वंसक साधनांचा व पद्धतींचा अवलंब, सामाजिक पुनर्रचनेसाठी करणे हे क्रान्तिवादी जीवनदृष्टीचे मूळ प्रमेय मूळच्या तात्त्विक व तार्किक सिद्धान्तातून (हेगेल व मार्क्स यांना मान्य असलेल्या!) सिद्धच होत नाही.



(२) हेगेलची समावर्तनपद्धती आणि त्रिपद परिवर्तनाचा आग्रह यांच्यामुळे मानवी जीवन व त्याचे तत्त्वचिंतन, तसेच त्याचे तत्त्वज्ञान, साचेबंद झाले आहे. हेगेल व मार्क्स यांचे दृष्टिकोण ऐतिहासिक नियतिवादावर आधारित आहेत. उभयतांच्या मते विश्वाची रचना व मानवी जीवन हे विराट यंत्राप्रमाणे निर्जीव, पूर्वनियत, अपरिहार्यतेने बांधले गेले आहे. हे त्यांचे दृष्टिकोण बंदिस्त समाजरचना (Closed society) व हुकूमशाही यांना पोषक ठरतात; नव्हे, हेगेल व मार्क्स हे सर्वाधिकारशाहीचे प्रवक्ते आहेत; असे अनेक गैरसमज हेगेल व मार्क्स यांविषयी प्रचलित आहेत. Open Society and Its Enemies आणि Poverty of Historicism या ग्रंथांमधून कार्ल पॉपर सारख्या विचारवंतानी हे आक्षेप उपस्थित केले आहेत.

या आक्षेपांचे निराकरण करताना बेडेकर लिहितात, "असा नियतिवाद हेगेलच्या भूमिकेतही नाही व मार्क्सच्या भूमिकेतही नाही. हेगेल चिद्वादी आहे व मार्क्स जडवस्तूवादी आहे, परंतु दोघांनीही समावर्तन पद्धतीच स्वीकारली आहे. या पद्धतीचा गाभा सर्जनशीलता हा आहे. ही सर्जनशीलता खैर नाही, तर श्रेयोन्मुख आहे. मानवाची श्रेयोन्मुखता स्वातंत्र्यासाठी डोळसपणे केलेली खडतर साधना आहे व ही युगायुगांतून चालत आली आहे. मानवी प्रज्ञेची ही गौरवशाली श्रेयसाधन-कथा कोणा तत्त्वज्ञाने प्रथम सांगितली असेल तर ती हेगेलने. मानव जातीच्या एका गौरवशाली श्रेयसंपन्नतेचे स्वप्न प्रथम कोणी रंगवले असेल तर ते मार्क्सने. दोघेही तत्त्वज्ञ मानवतेचे व स्वातंत्र्याचे उद्गाते आहेत."

या भूमिकेतून हेगेलच्या तत्त्वचिंतनाचे मूल्यमापन करताना बेडेकर पुढे म्हणतात, "मानवी प्रज्ञेचा गौरव करून स्वातंत्र्याच्या तत्त्वाचे सूत्र आपल्या तत्त्वमीमांसेतून प्रगट करीत जाणारा हेगेल, नियतिवादी ठरावा किंवा फॅसिझमच्या राक्षसी प्रवृत्तीचा तो प्रेरक होता असेही लांछन त्याला लावले जावे, हा मला तरी एक आंधळेपणा वाटतो."

मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा आधार घेऊन झालेली सोव्हिएत क्रान्ती आणि त्यामधून निर्माण झालेली स्टॅलिनची किंवा माओची हुकूमशाही किंवा हिटलरचे सत्तापिपासू तत्त्वज्ञान यांना मार्क्स किंवा हेगेल जबाबदार आहेत काय? या प्रश्नाचा विचार करताना बेडेकरांनी म्हटले आहे,

" हेगेल व मार्क्सच्या भूमिकांचे नीट परिशीलन केल्यास असे दिसू लागते की उभयतांच्या भूमिका भिन्न असल्या ( हेगेल हा चिद्‌वादी तर मार्क्स हा जडवस्तुवादी ) तरी मानवी व्यक्तीचे व समूहाचे स्वातंत्र्य व सर्जनशीलता यांना त्यांनी नुसती मान्यताच दिलेली नाही, तर या दोन कल्पनांना त्यांच्या तत्त्वव्यूहामध्ये गौरवाचे स्थान आहे. हिटलर व स्टॅलिन यांच्या वर्तनांचे बीज त्यांच्या वैयक्तिक घडणीत व त्यांच्या महत्त्वाकांक्षेला पोसणाऱ्या विशिष्ट घटनांत पाहिले पाहिजे. ते हेगेलच्या किंवा मार्क्सच्या समावर्तनपद्धतीत शोधणे अयोग्य ठरेल."

बेडेकरांचे या संदर्भातील विवेचन अतिशय मूलग्राही, साक्षेपी व समतोल झाले आहे. आयुष्याच्या पूर्वार्धातील बेडेकरांची राजकीय मूल्यदृष्टी लक्षात घेता हे विवेचन अधिकच महत्त्वाचे ठरते. मार्क्सवाद व प्रस्थापित कम्युनिझम यांच्याकडे साचेबंद, पोथीनिष्ठ, संप्रदायनिष्ठवृत्तीने पाहणाऱ्या व्यक्तींनी व पक्षांनी ( त्यांचे डावे-उजवेपण विसरून ! ) स्वातंत्र्य व सर्जनशीलता यांना प्राणभूत समजणाऱ्या मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचे आणि हेगेलच्या तत्त्वचिंतनाचे पुनरावलोकन जरूर केले पाहिजे. त्या दृष्टीने फेरवाद किंवा सुधारणावाद ( Revisionism )ही आजची सैध्दान्तिक गरज आहे. अन्यथा मार्क्सिझम-लेनिनिझमच्या उद्‌घोषात मूळच्या प्रमेयांचा व प्राणभूत विचारप्रवाहांचा विसर पडेल. We should not blame electricity for the electric chair.

## हेगेल आणि भारतीय विचारवंत

काही ठिकाणी हेगेल व भारतीय तत्त्वज्ञान यांमधील साम्य स्थळे बेडेकरांनी दाखवली आहेत. त्यासाठी वेदान्त, सांख्यदर्शनांच्या भूमिकांची तुलना हेगेलच्या दृष्टिकोनाशी केली आहे. त्याचप्रमाणे हेगेल व आधुनिक भारतीय विचारवंत ( उदा. राजा राममोहन रॉय, न्या. महादेव गोविंद रानडे ) यांची तुलना व विचारसाम्ये बेडेकरांनी दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचे या संदर्भातील विवेचन मात्र असमाधानकारक आहे. ग्रंथाची प्रकरणे थोडी वाढली असती, पण बेडेकरांनी तौलनिक मूल्यमापनाचा विषय सविस्तरपणे व सयुक्तिक पुराव्यानिशी मांडावयास हवा होता. एका स्वतंत्र प्रकरणात त्यांना हेगेल व युरोपीय तत्त्वज्ञ, हेगेल व मार्क्सवाद यांबद्दलचे तौलनिक मूल्यमापन करता आले असते आणि दुसऱ्या स्वतंत्र प्रकरणात हेगेल व भारतीय तत्त्वज्ञान, हेगेल व आधुनिक भारतीय विचारवंत यांबद्दलचे तौलनिक मूल्यमापन करता आले असते. इतिहासाच्या व तत्त्वज्ञानाच्या तौलनिक मीमांसेला त्याची अधिक मदत झाली असती. शिवाय, विसाव्या शतकातील काही ज्वलंत राजकीय विचारप्रवाहांवर अधिक प्रकाश टाकला गेला असता.

बेडेकरांचे विचार अपुरे, संदिग्ध व वादग्रस्त ठरतील, पण जे चिंतनीय आहेत त्यांची दोन उदाहरणे पुढील प्रमाणे :—

( १ ) ख्रिश्चन धर्म व बायबल यांच्यासंबंधी हेगेलची मते विशद करताना आणि राजा राममोहन रॉय यांच्याशी तुलना करता ( पृष्ठ ४७–४८ ) बेडेकर म्हणतात,

" एका दृष्टीने दोघांना ख्रिस्ती सांप्रदायिकतेशी जो सामना द्यावा लागला त्यात विलक्षण साम्य आहे.... ... ब्राह्मो धर्म व ब्राह्मो समाजाची चळवळ बंगालच्या व पर्यायाने भारताच्या प्रबोधनाची मुख्य प्रेरणा ठरली; याचे हेच रहस्य आहे की, ख्रिस्ती जीवनातील खरे रहस्य ओळखून आणि त्याचा आपल्या आध्यात्मिक परंपरेशी समन्वय साधून एका मानव धर्माची उज्ज्वल प्रेरणा राममोहन यांनी भारताला दिली. राष्ट्रीयत्वाच्या जाणिवेला अशी आध्यात्मिक व नैतिक आधारशक्ती आवश्यक आहे, ही धर्मप्रवण भूमिका राममोहन रॉय यांनी घेतली. युरोपच्या समाजक्रांतीच्या प्रक्षुब्ध युगात हेगेलनी तशीच भूमिका घेतलेली दिसते. मानवी जीवनाच्या अंतिम श्रेयाचा मार्ग चोखाळताना राममोहन रॉय, न्यायमूर्ती रानडे प्रभृतींचा मार्ग आणि हेगेलचा मार्ग एकच वाटतो, तो या धर्मप्रवण मूलप्रेरणेमुळे."

( २ ) जर्मनीवर हल्ला करणाऱ्या सत्तापिपासू, महत्त्वाकांक्षी, पराक्रमी व आक्रमक नेपोलियनचा उल्लेख हेगेलने " विश्वचेतनाचेच हे अश्वारूढ रूप " असा गौरवपूर्ण भाषेत केला आहे. स्वार्थी सरदारशाहीच्या जुलमी सत्तेला आव्हान देणारा नेपोलियन ( जर्मन राष्ट्राच्या स्वातंत्र्यावरील ते आक्रमण व संकट असूनही ) हेगेलला नियतीचा वरदहस्त वाटला. अर्थात त्याच्या समकालीन देशभक्त बांधवांना हेगेलचे गौरवोद्गार बिलकूल आवडले नाहीत. या प्रसंगाची तुलना न्यायमूर्ती रानडे यांच्याशी करताना बेडेकर लिहितात,

" इंग्रजी राज्य आले ही एक ईश्वरी योजनेतील घटना होती, असे म्हणताना न्यायमूर्ती रानडे यांना जो अभिप्राय व्यक्त करावयाचा होता तोच किंवा तसाच अर्थ हेगेलच्या नेपोलियनच्या संदर्भातील उद्गारांत दिसतो." ( पृष्ठ ४९ )

हेगेलचे विचार व रानड्यांचे विचार यांचे तात्त्विक अधिष्ठान डायलेक्टिकल पद्धतीचेच आहे असे मत प्रतिपादन करताना बेडेकर लिहितात.

"इंग्रजपूर्व स्वातंत्र्यात नंतरच्या पारतंत्र्याची बीजे पाहणे आणि वर्तमान पारतंत्र्यात भावी स्वातंत्र्याची प्रेरणा व सिद्धीची अनुकूलता पाहणे हा दुहेरीपणा रानडे यांच्या विचारात ठाण मांडून बसलेला दिसतो...इंग्रजी अमलाखालील पारतंत्र्य हे ईश्वरी अनुग्रहाप्रमाणे आम्हाला ज्ञान व राष्ट्रीय ऐक्याचे सामर्थ्य देणारे आहे असे त्यांनी म्हटले आहे. जुन्या स्वातंत्र्यात त्यांनी पारतंत्र्य पाहिले व वर्तमान पारतंत्र्यातच आधुनिक भारताच्या नव्या स्वातंत्र्याची बीजे त्यांना दिसली. रानड्यांचे हे विचार हेगेलच्या परिभाषेप्रमाणे डायलेक्टिकल पद्धतीचे आहेत हे स्पष्ट होते." (पृष्ठ ९५)

हेगेल व रानडे यांच्या डायलेक्टिकल पद्धतीमध्ये आणि त्यांच्या प्रज्ञाव्यापारामध्ये द्रष्टेपणाची बीजे असतीलही परंतु नेपोलियन किंवा ब्रिटिश सरकार यांसारख्या आक्रमकांचे स्वागत नियतिवादी भूमिकेतून, ऐतिहासिक अपरिहार्यतेच्या भूमिकेतून करण्यातील धोका स्पष्ट करावयास नको काय? या भूमिकांमुळे प्रत्यक्ष व्यावहारिक राजकारणात दैववाद, गुलामी मनोवृत्ती, आक्रमकाविषयी पूज्यताबुद्धी वाढण्यामुळे देशभक्ती व स्वातंत्र्यप्रेम या मूल्यांकडे होणारी डोळेझाक, स्वदेश व स्वसंस्कृती यांविषयीच्या अस्मितेवर येणारी काजळी, उदासीनता इ. धोके स्पष्ट व्हावयास हवेत. बेडेकर लिहितात,

"इतिहासात व्यक्त होत जाणारी 'ईश्वरी सूत्रे' किंवा 'विश्वचेतनाची रूपे' म्हणजे शेवटी हाडामांसाची माणसे किंवा त्यांची कृत्ये....नेपोलियन, हिटलर व स्टॅलिन अशी ही माणसे इतिहासाला वळण देणारी खरी, पण ते वळण 'ईश्वरी सूत्रानुसार' होते म्हणावयास जीभ कचरते अशी या माणसांची भीषण कर्तबगारी डोळ्यापुढे येते...पण तत्त्वज्ञांना जे काही पाहावयाचे असते ते सत्य...असे सत्य बोलून दाखवणारा तत्त्वज्ञ मग साध्या माणसांच्या रोषाला सहजपात्र होतो, देशबांधवाना अप्रिय होतो व त्याच्या अलिप्त व स्थितप्रज्ञ भूमिकेचा विपर्यास केला जाऊन त्याच्यावर आग पाखडली जाते." (पृष्ठ ५०)

हेगेलने केलेले नेपोलियनचे स्वागत, रानडे यांनी व्यक्त केलेला "इंग्रजांचे राज्य हा ईश्वरी अनुग्रह" हा दृष्टिकोण यामधून उभयतांची स्थितप्रज्ञता, द्रष्टेपण जरूर व्यक्त होत असेल. द्रष्टा हा काळाच्या पुढचे पाहतो म्हणून समकालीनात पराभूत ठरतो, अविश्वासाई ठरतो; दुबळा ठरतो. हे सत्य गांधी, विनोबा इ. व्यक्तींच्या संदर्भातही खरे असेल. परंतु या सर्व द्रष्ट्यांनी ऐतिहासिक अपरिहार्यता मान्य करून स्थितिप्रिय मनोवृत्ती वाढवावयाची, आक्रमकाचे स्वागत नियतिवादी भूमिकेतून करावयाचे की सामान्यांना चेतना यावयाची, आक्रमण व अन्याय यांविरुद्ध बंड करावयाचे? सामान्य लोकांनी तयार होणाऱ्या लोकसमूहाचे राजकीय, आर्थिक प्रश्न सोडवण्यास स्थितप्रज्ञ कितपत योग्य व उपयुक्त ठरतो? त्याने अलिप्त राहावे की राजकारणाचे तत्त्वचिंतक भूमिकेतून अध्यात्मीकरण (!) करावे? असे बरेच प्रश्न इथे उपस्थित होतात. तत्त्वचिंतनातून निर्माण होणारा आदर्शवाद आणि विविध मनोवृत्तींच्या व्यक्तींनी तयार होणाऱ्या लोकसमूहाचे प्रश्न सोडवण्यास पुढे येणारे वस्तुनिष्ठ, वास्तववादी समाजकारण व राजकारण, यांमधील हा संघर्ष आहे.

"हेगेलचा परिभावव्यूह" (प्रकरण ५ भाग १, २) आटोपशीरपणे सांगून स्वतंत्र मूल्यमापनात्मक प्रकरणात वरील प्रश्नांसारख्या महत्त्वाच्या समस्यांची चिकित्सा बेडेकरांना शक्य होती.

त्यांनी लिहिलेली हेगेलच्या नीती, कला, इतिहास मीमांसेवरील प्रकरणे सर्वसामान्य जिज्ञासू वाचकांच्या दृष्टीने अतिशय सरस उतरली आहेत. त्यामधून विवाह कुटुंब, संपत्ती, एकात्म राष्ट्रजीवन, धर्मसंस्था, आंतरराष्ट्रीयत्व, विश्वधर्म आणि कलानिर्मिती यांविषयीची हेगेलची प्रमेये वाचकाला समजतात. तसेच पौर्वात्य व युरोपीय संस्कृतींच्या विकासक्रमांची मीमांसा त्याला समजते. आणि या सर्व विवेचनातून, "विश्वाचा इतिहास ही विश्वचेतनाची स्पंदने होत, स्वातंत्र्य, सृजनशीलता या मूल्यांची ती विकासगाथा आहे", या हेगेलच्या मूलभूत दृष्टिकोणाचा त्याला स्पर्श होतो. ज्ञान, अनुभव, अस्तित्व व मूल्यमापन यांना एक व्यापक, विश्वात्मक अधिष्ठान आहे, परिमाण आहे हे त्याला समजू लागते. जसा जसा हेगेल अधिक समजू लागतो, त्याप्रमाणात जिज्ञासूचे मन विविध प्रकारच्या द्वंद्वातून मुक्त होते. विश्वातील वस्तू, व्यक्ती, घटना व मूल्ये यांच्या स्वरूपाचा व परस्पर संबंधांचा अंतर्वेध त्याला घेता येऊ लागतो. मानवी प्रज्ञा अथवा श्रेयश्चक्षू (conscience) आणि विश्वमन यांच्या एकात्म संवादातून

व्यक्तीला स्वतःच्या, समूहजीवनाच्या मर्यादा करूं लागतात कारण त्याची जाणीवकक्षा विश्वरूप होऊ लागलेली असते.

### ग्रंथाची परिभाषा :—

ग्रंथातील परिभाषा अनेक ठिकाणी क्लिष्ट, संदिग्ध झाली आहे. अर्थात हेगेलचे तत्त्वज्ञान मराठीत आणणे हे कार्यच मुळी इतके विकट आहे की, बेडेकरांनी स्वप्रयत्नाने परिभाषा तयार केली आणि वापरली याबद्दल धन्यवाद दिले पाहिजेत. परिभाषेबद्दल ते स्वतःच लिहितात की, "या बाबतीत मी जो प्रयत्न केला आहे तो मलाच समाधानकारक व यशस्वी वाटत नाही." अशा परिस्थितीत त्या परिभाषेकडे वाचकांनी प्रायोगिक भूमिकेतून पाहणेच युक्त ठरेल. मात्र पुढच्या आवृत्तीच्या वेळी परिभाषेच्या दृष्टीने मूलभूत स्वरूपाचा पुनर्विचार व सुधारणा होणे अगत्याचे व महत्त्वाचे वाटते. ग्रंथाला जोडलेल्या पारिभाषिक शब्द व संदर्भग्रंथ सूची अभ्यासकांना उपयुक्त आहेत.

हेगेलचे जीवन व तत्त्वचिंतन यांचा बेडेकरांनी करून दिलेला परिचय इंग्रजी भाष्यकारांना व भाषांतरकारांना 'वाट पुसत' करून दिला आहे. त्यामुळे विवेचनास दिलेले पुरावे अप्रत्यक्ष स्वरूपाचे आहेत. जर्मन, फ्रेंच भाषेतील विचारवंतांचे विचारधन त्यांच्या भाषेचा प्रत्यक्ष व सुव्यवस्थित परिचय असणाऱ्या व्यक्तीकडून करून दिला गेला तर त्या ग्रंथाचे मराठीतील रूप अधिक जिवंत व प्रमाणभूत ठरेल. परंतु मराठी साहित्यातील लेखकांची 'अन्य भाषांच्या परिचयाचा अभाव' ही सार्वत्रिक मर्यादा आहे. ती लवकर दूर होणे हिताचे ठरेल.

बेडेकरांनी इंग्रजी ग्रंथकारांच्या साहाय्याने जर्मन भाषेतला हेगेल समजावून घेतला, आणि त्याचा परिचय मराठीत करून दिला म्हणून काही स्वाभाविक मर्यादा पडल्या असल्या तरी, त्यांच्यासारख्या साहित्य, राजकारण व तत्त्वज्ञान या क्षेत्रांतील चिकित्सक, समीक्षक व व्यासंगी रसिकव्यक्तीने तो परिचय करून दिला आहे त्यामुळे, वाचकांना होणारे हेगेलचे दर्शन प्रत्ययकारी वाटते. त्यामुळेच एका महान व्यक्तीचे मन आपल्या मनाला स्पर्श करते व उजळून टाकते हा हेगेलच्या अभ्यासात बेडेकरांना आलेला अनुभव वाचकालाही जरूर यावा.

ज. वा. जोशी

◆◆◆

## 'ताळमेळ'

लेखक – रा. रं. बोराडे, व्हीनस प्रकाशन, पुणे २. किं. ४॥ रु.

'ताळमेळ' हा श्री. रा. रं. बोराडे यांचा दुसरा कथासंग्रह. ह्यात बऱ्याच विनोदी आणि काही गंभीर अशा बारा तेरा कथा आहेत. वाचनानंतर मनावर कलात्म स्वरूपाचा कोणताही परिणाम न करणाऱ्या अशा ह्या कथा. बोराडे यांचा 'पेरणी' हा कथासंग्रह काही ज्येष्ठ ग्रामीण कथाकारांच्या छटाच्छायेत वाढलेला वाटत असला, तरी त्यात बोराडे यांची निराळी वाट शोधण्याची धडपड निश्चित आणि प्रभावीपणे जाणवते. पण प्रस्तुत संग्रहात तेही नाही. खरे तर तीन-चार कथा सोडल्या तर कथासंग्रह अत्यंत सुमार आहे.

प्रस्तुत संग्रहातील बऱ्याच कथा उघड उघड शंकर पाटील, द. मा. मिरासदार यांच्या कथाविश्वाच्या प्रेरणांतून आणि दोघांच्या एकत्रीकरणाच्या बुद्धिवंत अनुकरणातून निर्माण झालेल्या दिसतात. हे अनुकरणसुद्धा चमक दाखविणारे नाही. मंद स्वरूपाचे आहे.—मिरासदारांच्या विनोदी कथांतून एक तंत्र सिद्ध झाले आहे. व्यंकूची शिकवणी, माझ्या बापाची पेंड, ड्रॉइंग मास्तरचा तास इत्यादी मिरासदारांच्या कथांतून ते दिसून येते. श्री. बोराडे यांच्या विनोदी कथांतून हेच तंत्र बाह्यरूपाने आल्याने त्या कथा अत्यंत सांकेतिक आणि स्थूल झाल्या आहेत. त्यातील विनोद अपेक्षित आणि पूर्वनियोजित वाटतात. श्री. बोराडे यांची शैली अत्यंत साधी आणि निरलंकृत, कधी कधी तर बाळबोध अशी वाटते. ती सरळपणे चाकोरीतून जाते. त्यामुळे त्यांना कथेतील प्रसंगावरच भर देऊन विनोद निर्माण करावा लागतो. केवळ प्रसंगनिष्ठ विनोदाने विनोदी कथा अशी किती फुलणार ? ती त्यामुळे एकपदरी आणि दळहीन होते. तिला तजेला अगर टवटवी प्राप्त होत नाही.

तंत्राच्या बाबतीत त्यांनी जसे मिरासदारांचे अनुकरण केले तसेच त्यांच्या कथांचे विषयही मिरासदार-पाटील ह्यांच्या कथा-विषयांच्या आसपास रेंगाळताना दिसतात. 'हुलकावणी', 'नाटक', 'मांत्रिक', 'आदत' इ. बोराडे ह्यांच्या कथा वाचताना मिरासदार पाटील ह्यांच्या अशाच विषयांवरच्या अनेक कथा आठवू लागतात.

ह्याचबरोबर 'बाई' संबंधीच्या भानगडी आणि सेक्स हा विषय बोराडे पुनः पुनः अत्यंत सांकेतिकपणे हाताळतात. त्यांच्या ह्या सांकेतिकतेमुळे त्यांच्या कथांचा शेवट काय होणार हे एकदोन पाने वाचल्यावर लगेच स्पष्टपणे

करू शकते. मग पुढची सारी कथा यांत्रिकपणे पुढे जाऊ लागते. अपेक्षित ठिकाणी येऊन थांबते. वास्तविक अनपेक्षितता ही विनोदाची मूळ कळ आहे. पण वर दिलेल्या कारणांमुळे नेमकी तीच ह्या कथांतून हरवली आहे.

वास्तविक अशा प्रकारच्या कथा बोराडे यांनी गंभीरपणे लिहिल्याही नसतील. कथांतून तरी असे कुठे दिसत नाही. अशा कथांचा एक वाचकवर्ग आहे. मेनका, मोहिनी, पैंजण, बुवा,जत्रा, इत्यादी मासिके तो मोठया आवडीने वाचतो. बाई, तिच्या भानगडी, सेक्स ह्यांसारखे विषय त्याच्या भावना चाळवतात. तेवढे त्याला पुरे असते. तसेच कोणत्याही पातळीवरचे विनोद-हास्य त्याला चालते. भुता-खेतादी अद्‌भुत आणि चमत्कारिक वातावरणाने तो आकृष्ट होतो. केवळ करमणुकीसाठी त्याला ह्या कथा (?) वाचायच्या असतात. साहित्य अगर कलाकृती म्हणून त्याला त्या कथांकडे मुळीच पाहायचे नसते. मग बोराडे तरी त्या कथांकडे तसे का पाहतील ? आणि अर्थात आपले तरी त्यांकडे ' कलाकृती ' म्हणून पाहण्याचे प्रयोजन काय ?

असे असले तरी ह्या संग्रहात ' बाई माणूस ', ' आफत', ' नातं ' ह्यासारख्या काही चांगल्या कथा आहेत. ' बाई माणूस ' ही कथा अत्यंत स्वाभाविकपणे विकसित होत गेलेली आहे. 'नातं' ही त्यांच्या आवडीच्या 'सेक्स' संबंधीची असूनही घाटाचा मनःपूर्वक विचार करून लिहिली गेली आहे. त्यामुळे तिच्यातील ताकदीवर बोराडे यांचे लक्ष केंद्रीभूत झाले आहे. ' आफत ' ही विनोदी कथाही त्यांनी प्रसन्नपणे कुठेही वाहवत न जाता लिहिली आहे. त्यामुळे ती मोठी खुललेली आहे. अशा वेळी बोराडे यांची निरलंकृत साधी भाषा विषयाशी एकरूप होऊन जाते. वजनदार आणि दमदार होते. ह्या कथांनी प्रस्तुत संग्रहाचा व्यावहारिक तोल साधला आहे, हे नक्की.

**आनंद यादव**

◆◆◆

## हिंदुसमाज–संघटना आणि विघटना

लेः– डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, कॉंटिनेन्टल प्रकाशन, पृ. २६६, किं. ६.

जानेवारी १९६५ मध्ये प्रयाग येथे विश्व हिंदुपरिषद भरली होती. त्या परिषदेच्या प्रचाराच्या निमित्ताने जुलै १९६५ ते सप्टेंबर १९६६ या काळात प्रा. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी वसंत मासिकात जे लेख लिहिले होते ते या पुस्तकात एकत्रित करण्यात आले आहेत. या लेखमालेत प्रा. सहस्रबुद्धे यांनी इ. स. पू. ४ हजार ते इ. स. १ हजार या प्रदीर्घ कालखंडातील हिंदुधर्माचे समालोचन केले असून त्यातील संघटना आणि विघटना यांच्या प्रवाहांचे दिग्दर्शन केले आहे. पहिला प्रवाह समता, स्वातंत्र्य, प्रवृत्तिवाद, बुद्धिनिष्ठा, परिवर्तनीयता, गुणनिष्ठ चातुर्वर्ण्य इत्यादी तत्त्वांचा असून दुसरा विषमता, दूरीभाव, निवृत्तिवाद, शब्दप्रामाण्य, अपरिवर्तनीयता, जन्मनिष्ठ, जातिभेद इ. तत्त्वांचा होता. १० व्या शतकाच्या सुमारास सनातन हिंदुधर्माला अवकळा प्राप्त झाली. तिचे कारण विघटनेच्या प्रवाहाचे प्राबल्य वाढले आणि हिंदुसमाजाचा सर्व बाजूंनी अधःपात झाला. या " सर्वांगीण अधःपातास या अर्वाचीन काळात येथल्या शास्त्री-पंडितानी सनातन हिंदुधर्माला जे हीन व विकृत रूप दिले तेच प्रामुख्याने कारणीभूत झाले, असा या प्रबंधाचा मुख्य सिद्धान्त आहे. " असे लेखकानेच सांगितले आहे. त्याच्या मते " नंतरचे धर्मशास्त्रकार हे अगदी मूढ, अविवेकी व दृष्टिशून्य असे होते. त्यांनी जे धर्मशास्त्र सांगितले त्यामुळेच ही अवकळा आणि त्यामुळेच या भूमीलाही अवकळा आली. "

या अधोगतीची मीमांसा करताना लेखकाने रजपूत, विजयनगरचे सम्राट, मराठे आणि शीख यांनी हिंदुधर्माच्या रक्षणाचे जे कार्य केले त्याचा परामर्ष घेतला असून त्यांच्या हातून हिंदुधर्म आणि हिंदुसंस्कृती यांच्या रक्षणाचे कार्य होऊ शकले; याचे कारण प्राचीन धर्मातील काही उत्कर्षकारक तत्त्वांचा अवलंब त्यांनी केला होता हे होते. त्यामुळेच विजयनगर आणि मराठे हे काही अंशी धर्मक्रांती करू शकले असे लेखकाचे प्रतिपादन आहे. ८ व्या-९ व्या शतकात अरबांच्या आक्रमणातून भारताला वाचविण्याचे श्रेय सर्वस्वी रजपुतांना आहे. तरीपण पुढे समाज संघटित राखावयाला ते असमर्थ ठरले. राजस्थानचे एकछत्री राज्य करणे त्यांना शक्य झाले नाही. स्वराज्य आणि स्वधर्म यांचा संबंध असतो याची कल्पनाही त्यांना नव्हती. रजपुतांच्या या अपयशामुळे विजयनगर साम्राज्याचे कार्य उठून दिसते. विजयनगरच्या सम्राटांनी स्वधर्म आणि स्वराज्य यांचा संयोग करून धर्मक्रांती केली. त्यामुळेच ते साम्राज्य स्थापू शकले आणि हिंदुधर्माचे रक्षण करू शकले. मराठ्यांनीही तेच केले. तीनशे वर्षांच्या पारतंत्र्यानंतर शिवछत्रपतींना स्वराज्याची स्थापना करण्यात यश आले ते समर्थादिकांनी

आधी धर्मक्रांती घडवून आणली त्यामुळेच. " स्वराज्य आणि स्वधर्म यांचा संयोग घडवून धर्माला समाजसंघटनेचे तत्त्व " मानल्यामुळे मराठे क्रांती करू शकले असे लेखकाचे म्हणणे आहे. ' मराठा तितुका मेळवावा ' या मराठ्यांच्या संघटनातत्त्वासारखे स्फूर्ती देणारे तत्त्व महाराष्ट्राखेरीज अन्यत्र कोठेही आढळत नाही. मराठ्यांनी ' हिंदवी स्वराज्या'चे स्वप्न पाहात पाहात मुस्लिम सत्ता भारतातून निःशेष केली. गुरू नानकाने स्थापन केलेल्या शीख धर्मानेही धर्मक्रांती केली. त्या धर्मात प्रारंभापासूनच जातिभेद, वर्णभेद, जन्मसिद्ध उच्चनीचता यास विरोध होता. सर्व जातींचे लोक त्यात समाविष्ट झाले होते. शीखांच्या पृथगात्म भावनेचा मोठा गौरव करून त्या भावनेमुळे शीख समाज उन्नत झाला; असे लेखकाने सांगितले आहे. शीखांच्या कार्याचे मूल्यमापन करताना लेखक सांगतो की, " पंजाबातील अखिल हिंदुसमाजात उठाव करण्यात शीखांना यश आले नाही. त्यांनी धर्मक्रांतीची तत्त्वे उपदेशिली. पण ती शीख समाजापुरतीच राहिली. शिवसमर्थांनी अखिल महाराष्ट्र जागृत केला होता तसा पंजाब शीखांना जागृत करता आला नाही......पूर्व परंपरेचा जाणूनबुजून त्यांनी विच्छेद केल्यामुळे हिंदुसमाजाचे नेते अशी भूमिका यशस्वीपणे प्राप्त करून घेताच आली नाही." त्यामुळे मुस्लिमांच्या विरुद्ध त्यांची शक्ती तोकडी पडली. गुरू गोविंदसिंग, बंदावैरागी यांसारखे शूर पुरुष निर्माण करूनही शीखांना त्यांची परंपरा निर्माण करता आली नाही. हे शीखांचे संघटन तत्त्व होऊ शकले नाही. शीख समाजही तो संघटित करू शकला नाही. रणजितसिंगाच्या पराक्रमामुळे पठाणांच्या आक्रमणापासून पंजाबचे रक्षण झाले. पण एकंदरीत शीखांचे यश फार मर्यादित आहे असा लेखकाचा निष्कर्ष आहे.

शेवटच्या प्रकरणात लेखकाने गेल्या १००–१२५ वर्षांतील भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्याचा विचार करताना असे प्रतिपादन केले आहे की राजा राममोहन रॉयपासून महात्मा गांधींपर्यंत होऊन गेलेल्या समाजधुरीणांनी बुद्धिप्रामाण्य, प्रवृत्तिवाद, समता, गुणनिष्ठा, समसंधी या प्राचीन धर्मतत्त्वांचा अवलंब केला. त्यामुळे अपूर्व अशी क्रांती झाली आणि स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याइतके सामर्थ्य भारतीय समाजात आले. पण स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मोठा अपेक्षाभंग झाला आहे. " आपली लोकशाही, आपले स्वातंत्र्य, आपली संस्कृती, आपली अस्मिता यांचे रक्षण करण्यास आपण अजूनही असमर्थच आहोत असे घोर दृश्य दिसू लागले. " येथे लोकसत्ता आली आहे; पण तिची जबाबदारी घेण्यास समर्थ असे ' लोक ' च येथे नाहीत. लेखकाच्या मते यावर उपाय म्हणजे पाश्चात्त्य मिशनऱ्यांच्या धर्तीवर भारतीय बहुजनात मिसळून धर्मशास्त्रकारांच्या विकृत धर्माचे जनमनावर झालेले संस्कार पुसून टाकून वर सांगितलेल्या समाजधुरीणांनी प्रारंभिलेली सर्वांगीण क्रांती पूर्ण करण्याकरिता भारतीय तरुणांनी पुढे आले पाहिजे. तसेच येथल्या मागासलेल्या समाजाला जागृत व संघटित करून विसाव्या शतकात आणण्याकरिता विद्यापीठातील विद्यार्थ्यांनी झटले पाहिजे. मिशनरी धर्तीने कार्य करणाऱ्या काही संस्थांचे व व्यक्तींचे दाखलेही लेखकाने दिले आहेत. सेवेच्या आणि धर्मनिष्ठेच्या बळावर बहुजन समाजावर नवे संस्कार घडविण्याचे कार्य करणारे असंख्य तरुण उभे करण्याचे कार्य विश्व हिंदुपरिषदेने हाती घ्यावे अशी लेखकाची अपेक्षा आहे.

विश्व हिंदुपरिषदेच्या प्रचाराच्या निमित्ताने ही लेखमाला लिहिली असल्यामुळे या पुस्तकाला प्रचारकी थाट आला आहे. लेख वेळोवेळी लिहिले गेल्यामुळे विवेचनात विस्कळितपणा आला आहे तशीच पुनरावृत्तीही आली आहे. आणि संगतीचे अवधान न राहिल्याने विसंगतीही अनेक ठिकाणी निर्माण झाली आहे. केवळ हिंदुत्वनिष्ठेच्या दृष्टिकोणातून सर्व लेख लिहिल्यामुळे विवेचन एकांगी, सदोष आणि काही ठिकाणी अनैतिहासिक किंवा इतिहासाचा विपर्यास करणारे झाले आहे. क्रांती ( Revolution ) पुनरुज्जीवन ( Revival ), समाज ( Society ) राष्ट्र ( Nation ), स्वधर्म, स्वराज्य या कल्पनांची ( Concepts ) गल्लत लेखकाने केलेली दिसून येते. धर्म हे समाजसंघटनेचे तत्त्व आहे आणि स्वराज्य आणि स्वधर्म यांचा संयोग झाल्याने क्रांती होते अशी लेखकाची एकंदरीत श्रद्धा दिसते.

प्रारंभी हिंदुसमाज समाज आहे काय असा प्रश्न उपस्थित करून समाजाची जी लक्षणे देण्यात आली आहेत ( पान ३ ) ती राष्ट्र या कल्पनेला लागू पडणारी आहेत. तसेच पुढे राष्ट्रनिष्ठेचा जो भावार्थ दिला आहे ( पान ३२ ) त्यावरून लेखकाला अभिप्रेत असलेल्या राष्ट्रकल्पनेत कडवेपणा अधिक असून त्यामुळे साचेबंद आणि अखबंद समाज निर्माण होण्याचीच अधिक शक्यता आहे. तसेच विजयनगर, मराठे आणि शीख यांनी धर्मक्रांती केली हेही म्हणणे

योग्य नाही. धर्मक्रांती हा शब्द लेखकाने फार सैलपणे वापरलेला आहे. या तिघांनी केलेल्या कार्याला धार्मिक पुनरुज्जीवन म्हणणे यथार्थ होईल. युरोपखंडात झालेल्या धर्मसुधारणेशी ही त्यांची तुलना करता येणार नाही. त्यांनी जुना धर्म बदलून त्या ठिकाणी नवीन धर्म आणला नाही. विजयनगरच्या साम्राज्याच्या काळी जुन्या ब्राह्मणीधर्माचे पुनरुज्जीवन झाले. तसेच मराठ्यांचा संत संप्रदाय आणि शीखांचा धर्म हे जुन्या भक्तिधर्माचे त्यांच्या कालानुरूप पुनरुज्जीवन होते. त्यात क्रांती अशी नव्हतीच. विजयनगरचे साम्राज्य हे हिंदूंचे साम्राज्य होतें. पण लेखकाला अभिप्रेत असलेले संघटना तत्त्व प्रस्थापित करण्यात ते यशस्वी ठरले नाहीत. कारण लेखकालाच पुढे कबूल करावे लागले आहे की एकही हिंदू सरदार विजयनगरच्या हिंदू राजांना मिळाला नाही किंवा एकाही पंडिताने विजयनगरपासून स्फूर्ती घेतली नाही. ( पान १४५ ) याचा सरळ अर्थ असा की विजयनगरचे साम्राज्य किंवा त्यांनी केलेली ' धर्मक्रांती ' हिंदूंना आकर्षित करून एकत्र आणण्याला असमर्थ ठरली. बाहेरची गोष्ट सोडून द्या. पण त्यांच्या साम्राज्यातही अखिल हिंदूंना एकत्र आणण्याचे कार्य ते करू शकले नाहीत. असा एक प्रवाद आहे की मुसलमानांबरोबरच्या युद्धात त्यांच्याच राज्यातील लिंगायत पंथाचे लोक अगदी अलिप्त होते. त्यांच्या ब्राह्मणी धर्मामुळे लिंगायत पंथीयांना साम्राज्याबद्दल आपुलकी वाटत नव्हती. तीच गोष्ट शीखांची. हिंदू समाजाला एकत्र आणण्यात शीख अयशस्वी ठरले हे लेखकानेच सांगितले आहे. खुद्द शीख समाजातही खालसा धर्म ऐक्य करू शकला नाही. संघटनातत्त्वावर भर देणाऱ्या स्वधर्म आणि स्वराज्य यांच्या संयोगाचा पुरस्कार करणाऱ्या लेखकाने शीखांच्या पृथगात्मतेची, अखंडात खंड निर्माण करण्याची प्रशंसा गावी ( पान १८३ ) याचे आश्चर्य वाटते. या पृथगात्मतेतच खालसा धर्माच्या अपयशाची बीजे होती हे त्या धर्माच्या लेखकाने केलेल्या विवेचनावरूनच दिसून येते. मराठेशाहीतही सर्व हिंदू एकत्र येऊन संघटित झाल्याचे दृश्य दिसत नाही. शिवाजीला स्वकीयांच्या विरोधाला तोंड द्यावे लागले आणि मराठेशाहीच्या इतिहासात मनसबदाऱ्या आणि जहागिरी यांच्या मागे लागून मुस्लिम सत्तेला मिळालेल्या मराठा सरदारांची नावे काही थोडीथोडकी नाहीत. एकंदरीत रजपूत, विजयनगर, मराठे आणि शीख यांच्या इतिहासाचे पर्यालोचन केले म्हणजे संघटनतत्त्वाऐवजी विघटनतत्त्वच अखेरीस प्रभावी ठरले असे म्हणण्याची पाळी येते. मराठ्यांनी मुस्लिम सत्ता भारतात निःशेष केली हे लेखकाचे विधान इतिहासाला धरून नाही. मुस्लीम सत्ता भारतात शेवटपर्यंत विखुरलेल्या होत्या. शेजारच्या निजामालाही मराठ्यांना निःशेष करता आले नाही. मराठ्यांचे सर्वांत मोठे श्रेय म्हणजे इस्लामचे आक्रमण थोपवून धरणे हे होय. हिंदुधर्माचे रक्षणकर्ते म्हणून यांचा हिंदूंना दिलासा वाटत होता. पुरीच्या जगन्नाथासारखी देवस्थाने त्यांच्यामुळे शाबूत राहिली. त्या देवळाचे प्रवेशद्वार बाळाजी बाजीराव पेशव्याने बांधले हे तेथील लोक आजही गौरवाने सांगतात. पण समता, बुद्धिप्रामाण्य अशा तत्त्वांचा त्यांनी पुरस्कार केला असे म्हणता येणार नाही. मराठ्यांचे कार्य धर्मक्रांतीच्या सदरात घालता येणार नाही. लेखकालाच म्हणावे लागले आहे की, " अवश्य ती धर्मक्रांती व मानसिक क्रांती मराठ्यांनी केली असती तरच ब्रिटिश आक्रमणापासून भारताचे संरक्षण त्यांना करता आले असते. " ( पान १७३ ).

युरोप ख्रिस्तधर्मीय असूनही एक राष्ट्र होऊ शकले नाही; पण प्राचीन भारतीयांच्या एकीकरणाला यश आल्यामुळे एक देश व एक राष्ट्र ही जाणीव भारतीयांच्या मनात दृढ झाली ( पान २४ ) हे लेखकाचे विधानही पटण्यासारखे नाही. भारत हा हिंदुधर्मी असला तरी भूतकालात ते राष्ट्र होते असे म्हणता येत नाही. भारताला एकराष्ट्रीयत्व देण्याचे श्रेय ब्रिटिशांना दिले पाहिजे. तोपर्यंत राष्ट्र, राष्ट्रीयत्व, राष्ट्रनिष्ठा या कल्पनांचा उदय किंवा वाढ भारतात झाली होता असे म्हणता येणार नाही. १५ व्या शतकापर्यंत युरोप आणि भारत यांची परिस्थिती सारखीच होती. दोन्हीही मध्ययुगीन अवस्थेत होते. पण त्यानंतर युरोपात निरनिराळी राष्ट्रे आणि राष्ट्रसत्ता निर्माण होऊन वाढीला लागल्या. भारतात ते होऊ शकले नाही. युरोपात नवे युग निर्माण झाले तसे येथे झाले नाही. राष्ट्रीयत्व बीजरूपाने काही अंशी मराठ्यांमध्ये होते असे फार झाले तर म्हणता येईल. राज्ये, साम्राज्ये ही त्या त्या राज्यकर्त्यांच्या दौलतीच्या स्वरूपाची होती. राष्ट्र ही भावना त्यात होती असे म्हणणे धाष्टर्याचे होईल. म्हणून वैदिक आर्यांनी, श्रीकृष्णाने किंवा चंद्रगुप्ताने एकराष्ट्र निर्माण केले हे लेखकाचे गृहीत कृत्य इतिहासाला धरून आहे असे म्हणता येत नाही. वैदिक आर्यांनी लेखकाने म्हटल्याप्रमाणे आर्यधर्माचा प्रसार केला; पण राष्ट्रधर्माचा नव्हे, ज्याला आपण आज Nation आणि Natonalisation म्हणतो त्या अर्थाने नव्हे. चंद्रगुप्ताने साम्राज्य स्थापन केले, त्याने राष्ट्र निर्माण केले असे म्हणता येत नाही.

मॅसिडोनियाचे राजे किंवा सीझर यांनी स्थापन केलेल्या साम्राज्यांशी त्याच्या साम्राज्याची तुलना करता येईल. प्राचीन गणराज्यातून त्यांनी साम्राज्ये निर्माण केली. त्याप्रमाणे चंद्रगुप्ताने मगध प्रदेशातील गणराज्यांच्या ठिकाणी साम्राज्य उभे केले. दोन्ही ठिकाणी जुन्या गणराज्यांचे कार्य संपुष्टात आले होते. त्यातूनच राजे आणि सम्राट निर्माण झाले. अखिल भारताचे एकराष्ट्र निर्माण करण्याचे कार्य श्रीकृष्णालाही करता आले नाही. श्रीकृष्णाच्या वेळी भारत एक राष्ट्र असल्याचे दिसून येत नाही. किंवा कौरव-पांडवांचे युद्ध हे एक राष्ट्राकरिता झालेले युद्ध किंवा दोन राष्ट्रांतील युद्ध असेही स्वरूप त्याला नव्हते. ते भावाभावांतील युद्ध होते आणि त्यात आप्तेष्टांनी आपापल्या सोयीनुसार पक्ष घेतले होते. तसेच त्या युद्धसमाप्तीनंतर भारताचे एक राष्ट्र होण्याचे बाजूलाच राहिले, पण भारत मात्र कायमचा खिळखिळा झाला. यापेक्षाही श्रीकृष्णाची शोकांतिका म्हणजे त्याचे यादवकुल यादवीतच खलास झाले. त्यांच्या भांडणामुळेच यादवी हे नाव रूढ झाले आणि तिचा शाप भारताला कायमचा भोवत आला आहे. पण पुढे पुराणकारांनी श्रीकृष्णाला देवत्व देऊन भागवतधर्माचा संस्थापक बनविले. त्यामुळे हिंदुधर्म पुढच्या काळात सावरण्याला साहाय्य झाले यात शंका नाही.

लेखकाने विवेचनाच्या सोईकरिता इ. स. पू. ४००० ते इ. स. १००० हा सबंध कालखंड जणू काही सलग आणि एकप्रवाही होता असे गृहित धरले आहे. या प्रदीर्घ कालखंडात हिंदुधर्मात आणि हिंदुसमाजात जी अनेक स्थित्यंतरे झाली ती लक्षात घेतली नाहीत. या प्रदीर्घ काळात हिंदू अनेक अवस्थांतून आणि युगांतरातून गेले आहेत. त्यांची दखल लेखकाने घेतली नाही. हिंदुधर्माचे स्वरूपही वेळोवेळी बदलत आले आहे. प्राचीन भारताच्या इतिहासात जी एक महान घटना घडली आणि पुढच्या सबंध इतिहासावर जिचा परिणाम झाला तिचा परामर्ष या पुस्तकात घेण्यात आला नाही. ती घटना म्हणजे महाभारतीय युद्ध होय. डॉ. इरावती कर्वे म्हणतात त्याप्रमाणे हे युद्ध म्हणजे युगान्त होय. या युद्धात तत्कालीन साऱ्या हिंदुसमाजाची आहुती पडली. त्यात झालेल्या भयानक संहाराने हिंदुधर्म आणि समाज मोडकळीस आले. आणि त्या मोडकळीतून हिंदुसमाज पुनः पूर्णपणे सावरला गेलाच नाही. ती मोडकळ शतकानुशतके टिकून राहिली. बुद्ध आणि त्याचा धर्म हेही हिंदुसमाजाची चांगल्या प्रकारे पुनःस्थापना करण्यास अपेशी ठरले. भारतीय समाजाच्या विघटनेची बीजे त्या युद्धात झालेल्या विध्वंसनात शोधता येतील. भारतात धर्मक्रांती जर कोणी केली असेल तर ती बुद्धाने केली असे म्हणता येईल. धर्मक्रांतीच्या संदर्भात बुद्धधर्माचे मूल्यमापन होणे अवश्य आहे. पण लेखकाच्या हिंदुत्वनिष्ठेच्या चौकटीत ते बसणारे नाही.

आणखी एक गोष्ट खटकते, ती म्हणजे महाभारतकालानंतर बुद्धकाळापर्यंत भारतीय समाजात विचारांची आणि तत्त्वज्ञान पद्धतींची जी आंदोलने झाली त्यांची दखल घेतली नाही. बुद्धिप्रामाण्य, परिवर्तनीयता, प्रवृत्तिवाद इत्यादी तत्त्वांवर पुस्तकात पुनः पुनः भर देण्यात आला आहे. पण चार्वाक, कणाद, कपिल, गौतमादी महान विचारवंतांनी ज्या प्रगल्भ आणि गहन तत्त्वपद्धती निर्माण केल्या त्यांची दखल लेखकाने घेतली नाही. हिंदूंचा धर्म आणि समाज यांच्या इतिहासाचा विचार करताना त्यांना दुर्लक्षून चालणार नाही. संघटना-विघटना तत्त्वांत त्या कोठे बसतात हे पाहणे बोधप्रद ठरेल.

हिंदुसमाजात प्राचीन कालापासून जे दोन परस्परविरोधी प्रवाह वाहात आले आहेत त्याचे दिग्दर्शन लेखकाने यथार्थतेने केले आहे. पण लेखकाने त्यांची कालक्रमानुसार विभागणी केली आहे तशी करणे कठीण आहे. उलट असेही म्हणता येईल की हिंदुसमाजाचा इतिहास हा या प्रवाहाच्या सतत संघर्षांचा इतिहास आहे. प्राचीन आर्यांनी समतेच्या, समसंधीच्या तत्त्वावर समाजाची उभारणी केली या लेखकाच्या विधानाला इतिहासात आधार सापडत नाही. हिंदुसमाजाची रचनाच मुळी चातुर्वर्ण्यावर भेदाभेदांवर, उच्चनीचतेच्या कल्पनेवर आधारलेली आहे. त्यातच पुढे जातिभेद आणि पोटभेद यांची सतत भर पडत गेली. अगदी प्रारंभी ब्राह्मण वर्गाचे वर्चस्व होते. नंतर क्षत्रियांचे वर्चस्व प्रस्थापित झाले. महाभारतकाळी क्षत्रियांचे प्रभुत्व होते आणि ब्राह्मण त्यांचे आश्रित होते. महावीर आणि बुद्ध यांच्या काळी वैश्यवर्ग पुढे सरलेला दिसतो. क्षत्रियवैश्यांच्या प्रभुत्वाचा तो काळ होता. व्यापाराच्या निमित्ताने जगभर हिंडणारा व्यापारीवर्ग नवे आणि पाखंडी विचार आणू शकतो म्हणून मनूसारख्या स्मृतिकारांनी समुद्रपर्यटन निषिद्ध ठरवून टाकले. वैश्यांच्या वर्चस्वाला पायबंद घालण्यासाठी स्मृतिकारांनी ब्राह्मणवर्चस्व प्रस्थापित केले. या सगळ्या काळात शूद्र हा शूद्रच राहिला,—एकलव्य हा एकलव्यच राहिला. त्यांच्या जोडीला अतिशूद्र येऊन

बसला. अशा समाजात समता आणि समसंधी कशी प्रस्थापित व्हावयाची ? ऐक्याची आणि संघटनेची भावना कशी निर्माण व्हावयाची ? भारतीय समाज टिकून राहिला तो ग्रामसंस्था आणि जातिसंस्था यांच्या आधारावर. हिंदुधर्म हा रूढींचा धर्म आहे. या रूढींची परंपरा या दोन्ही संस्थांत पसरलेली होती. या सर्व बंधनांनी बांधलेला हिंदुधर्म बंदिस्त स्वरूपाचा होता. या बंदिस्त समाजात कोपर हालविण्याला वाव मिळावा म्हणून मागाहूनची भक्तिसंप्रदायाची आंदोलने झाली. पण ती सर्व चौकटीत राहूनच. "हिंदुधर्म हा व्यक्तिनिष्ठ धर्म आहे. त्याला समाजधर्माचे, राष्ट्रधर्माचे रूप जोपर्यंत येत नाही, तोपर्यंत तो स्वधर्मीयांना संघटित करू शकणार नाही." (पान १७४) हे लेखकाने केलेले हिंदुधर्माचे निदान बरोबर आहे. किंबहुना हिंदुधर्मातून नवा समाजधर्म, नवा राष्ट्रधर्म निर्माण होण्याची अपेक्षा धरणे हे चुकीचे होईल. हिंदुधर्म भविष्यावर प्रकाश टाकू शकला नाही म्हणून देशाला अवकळा प्राप्त झाली. म्हणून हिंदुधर्माची कास धरून देशाचा उद्धार होईल, क्रांती करता येईल ही आशा फोल ठरणार आहे.

हिंदुसमाजाच्या भवितव्याचा विचार करताना लेखकाने काही मननीय विचार मांडले आहेत. भारतात लोकशाही आली, पण तिचा भार पेलण्याला समर्थ असे 'लोक'च अजून निर्माण झाले नाहीत, हे सत्य आहे. ते निर्माण करण्यासाठी ध्येयनिष्ठ समाजसेवकांची संघटना उभी करणे अवश्य आहे, या बाबतीत लेखकाशी कोणीही सहमत होईल. तसेच राममोहन राय यांनी सुरू केलेल्या सर्वांगीण क्रांतीचे अपुरे राहिलेले कार्य पुरे केले पाहिजे यात शंका नाही.

लेखकाने अर्वाचीन काळच्या धर्मशास्त्रकारांवर जो सर्वस्वी दोष टाकला आहे तो तितकासा योग्य वाटत नाही. हिंदुसमाजाच्या अधःपतनाला तेच सर्वस्वी कारणीभूत होते असे नव्हे. त्यांनी नवीन असे काय सांगितले ? समाजात जे रूढ होते तेच त्यांनी एकत्र केले; आणि त्यातही त्यांनी प्राचीन काळच्या स्मृतिकारांचीच री ओढली होती. त्यांना दोष द्यायचा तर तो मन्वादिक स्मृतिकारांनाही द्यायला पाहिजे. इ. स. ८०० ते १००० हा काळ सुवर्णयुग असे लेखकाने म्हटले आहे. पण या तथाकथित सुवर्णयुगाचे प्रतिबिंबच शास्त्रीपंडितांच्या शास्त्रातून उतरले होते हे विसरता येणार नाही. परंतु त्याबरोबरच लेखक म्हणतो त्याप्रमाणे, या शास्त्रीपंडितांच्या विकृत धर्माचे संस्कार जनमनावरून साफ पुसून काढले पाहिजेत हेही निर्विवाद आहे.

हे पुस्तक समग्र वाचल्यानंतर मला असे वाटले की, प्रा. सहस्रबुद्धे हे हिंदुधर्म आणि त्याची संघटना यांची नवी मिथ (Myth) निर्माण करू इच्छित आहेत. पण ही मिथ भविष्याच्या कामी येईल की नाही याबद्दल जबरदस्त शंका वाटते. आधुनिक काळात धर्म ही प्रेरक–प्रचोदक शक्ती होऊ शकणार नाही. ते दिवस भूतकाळात जमा झाले आहेत.

एकंदरीत या पुस्तकाने निराशा केली असे म्हणणे भाग आहे. प्रा. सहस्रबुद्धे हे विद्वान, व्यासंगी, बहुश्रुत विचारवंत आहेत. त्यांच्याकडून उच्च विचारधनाची अपेक्षा असते म्हणून ही निराशा बोचक वाटते. त्यांचा आगामी 'महाराष्ट्र संस्कृति' हा ग्रंथ अशी निराशा करणार नाही अशी अपेक्षा आहे.

**बा. रं. सुंठणकर**

◆◆◆

## साभार–स्वीकार

**प्रकाशन–डायरी १९६८ :** (१९६८ मधील ग्रंथसूची, लेखक, प्रकाशन यांचे पत्ते इत्यादी उपयुक्त माहिती) प्रकाशक–र. बा. क्षीरसागर, १४९३ क, सदाशिव, पुणे २; मूल्य ३ रु.

# सारसंकलन*

### साहित्य संमेलन कुणाचे ?

साहित्य संमेलन 'आपले' म्हणजे नेमके कुणाचे? साहित्यिकांचे, कलावंतांचे, अभ्यासकांचे, की 'एकेरी भाडे अन् दुहेरी घोडे' या सवलतीमुळे जमलेल्या गर्दीचे? आज गेली पाचसहा वर्षे भरणारी साहित्य संमेलने पाहून असे वाटते, की ही दुसऱ्या प्रकारची गर्दीच तिथे अधिक प्रमाणात जमत आहे. त्यामुळे साहजिकच असे होते, की संमेलनाची धुरा वाहणारे कार्यकर्ते, काही ठराविक ठरावांनिशी हजर झालेले चार चळवळ्ये, साधारण तितकेच भोळेभाळे साहित्यिक, मराठी घेऊन नुकतेच एम्. ए. झालेले किंवा होऊ घातलेले काही होतकरू तरुण, आणि आपापल्या भगतगणाला बरोबर घेऊन आलेली चार जुनाट खोडे, यांखेरीज संमेलनाच्या साहित्य-विभागात कुणालाच स्वारस्य नसते. त्यांचे पाहणे निराळेच असते! मग त्यांत कुणी साड्यांची पेठ पाहायला निघतात, कुणी गावातील आप्तेष्टांच्या भेटीगाठी घेण्यात रमून जातात, तर कुणी ते गाव ओले की सुके याचा कानोसा घेतात. अशा परिस्थितीतही साहित्य संमेलन भरते हेच एक मोठे आश्चर्य आहे! ××

### मराठी संशोधनाची सद्यःस्थिती

संशोधन म्हणजे केवळ अज्ञाताचा शोध नव्हे; तर जे ज्ञात आहे त्याचेही संशोधन होऊ शकते. किंबहुना या दुसऱ्या गोष्टीचीच आज अधिक जरूरी आहे. कारण मराठीच्या दृष्टीने अज्ञाताचा शोध लावण्याचे काम पूर्ण झालेले नसले तरी बरेचसे झालेले आहे ही गोष्ट मान्य केली पाहिजे.

पण प्रश्न आहे तो हा, की या धनाचे आपण काय केले? आणि त्याचे उत्तरही स्पष्ट आहे, की आपल्याला ते धड संभाळताही आले नाही; मग त्यात भर घालण्याचे तर दूरच राहिले! राजवाडे आणि देव यांनी अक्षरशः जन्मभर पायपिटी करून जी जुनी कागदपत्रे आणि पोथ्या गोळा केल्या त्यांतले बरेचसे अमोल साहित्य आज एक तर काळाच्या उदरात गडप तरी झाले आहे किंवा पुण्याच्या भारत इतिहास किंवा धुळ्याच्या राजवाडे संशोधन, नाहीतर समर्थवाग्देवता यांपैकी एका मंदिरात उपेक्षित अवस्थेत पडून तरी आहे. कोणी आस्थेने विचारपूस करणारा येईल आणि आपल्या अंगावर साचलेली धूळ झटकील या आशेने या तीन मंदिरांतील शेकडो हस्तलिखिते गेली अनेक वर्षे अशीच दप्तरी पडून आहेत. त्यांत काहींना तर पायही फुटले असतील. आज त्यांच्या साध्या याद्या मिळणेसुद्धा दुरापास्त होऊन बसले आहे. पुणे विद्यापीठाने काही वर्षांपूर्वी धुळ्याच्या समर्थवाग्देवता मंदिराबाबत काही प्रयत्न करून पाहिला. मूळ संस्था कोणीच हलवू शकत नाही. तेव्हा केवळ धुळ्याचेच नव्हे तर साऱ्या खानदेशाचे भूषण असलेली ही संस्था आहे तिथेच राहावी, फक्त पुणे विद्यापीठाने ती काही अटींवर चालवायला घ्यावी हा साधा प्रस्तावही कायद्याच्या कोंडीत बसू शकला नाही, आणि देवांनी मोठ्या सायासाने वाढवलेले हजारो हस्तलिखितांचे हे मंदिर त्यांच्या पश्चात सुने ते सुनेच राहिले आहे.

आम्ही काही वर्षांपूर्वी अप्रकाशित प्राचीन मराठी ग्रंथांचे प्रकाशन व्हावे म्हणून पुणे विद्यापीठातर्फे एक 'माला' काढली. त्या मालेत महामहोपाध्याय पोतदारांच्या कल्पक विचाराने महानुभावांचे एक काव्य त्याच्या सांकेतिक लिपीतील ठशांसह छापण्याचे ठरले. हेतू हा, की अभ्यासकांची सोय व्हावी, त्यांनी सांकेतिक लिपी शिकावी आणि महानुभावांचे इतर ग्रंथ उजेडात आणावे. त्याप्रमाणे डॉ. कोलत्यांनी फार मेहनत घेऊन रवळो बासाचे 'सह्याद्रिवर्णन' संकेतांच्या ठशांसह आणि स्पष्टीकरणासह संपादित केले आणि विद्यापीठानेही ते हजारो रुपये खर्च करून छापले. पण पोतदार आशावादी हेच खरे! कारण या संधीचा लाभ करून घेणारा एकही अभ्यासक पुढे आला नाही, येत नाही आणि डॉ. कोलत्यांनी उपलब्ध करून दिलेली सांकेतिक लिपीच्या वाचनाची ही सर्व सामग्री तशीच पडून आहे.

* पुणे येथे दि. २८–२९ ऑक्टोबर १९६७ रोजी भरलेल्या पहिल्या विभागीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या भाषणातून.

प्रश्न असा, की असे का व्हावे ? उत्तर एकच, पोटतिडीक नाही. कदाचित ती आमच्यातच नसेल. कारण सारे जगच जिथे पोटार्थी बनले आहे तिथे बिचारा शिक्षक तरी त्याला अपवाद कसा ठरेल ? विद्यापीठे, संशोधनमंदिरे, सरकारी अनुदाने, मायक्रोफिल्मिंगसारखी किंवा टेपरेकॉर्डिंगसारखी शास्त्रीय साधने ही सारी आज उपलब्ध असूनही व्यर्थ असल्याप्रमाणे आहेत. याचे कारण ही उपेक्षा किंवा औदासीन्य. ××

## संशोधन कुणासाठी ?

संशोधनाविषयी आणखी एक लहानसा प्रश्न. आपण, म्हणजे संशोधक, संशोधन करतो ते कुणासाठी ? काही वेचक अभ्यासकांसाठी की सर्वसामान्य वाचकांसाठी ? मला असे वाटते, की सत्य या दोन टोकांमध्ये कुठेतरी सापडेल. संशोधन किंवा कोणत्याही प्रकारचा अभ्यास ही जशी 'जनते'साठी नाहीत तशीच ती केवळ 'डेक्कन क्वीन'वाल्यांसाठीही नाहीत. तर ती बहुश्रुतांसाठी आहेत. चांगल्या सुबुद्ध आणि अभ्यासू वाचकांसाठी आहेत, संशोधनाने जसे जाणत्यांचे समाधान झाले पाहिजे, तसेच जे, अभ्यासू आहेत त्यांना मार्गदर्शन केले पाहिजे अन् होतकरूंना स्फूर्ती दिली पाहिजे, त्यांची जिज्ञासा चाळवली पाहिजे. जे अव्वल दर्जाचे आहे ते हे सारे करते. उदाहरणार्थ म्हणून मी भाव्यांचे ' महाराष्ट्र-सारस्वत ', राजवाड्यांच्या ' ऐतिहासिक प्रस्तावना ', रानड्यांचे 'उपनिषद्रहस्य ' किंवा लाडांचे दुर्दैवाने अपुरे राहिलेले ' तुकारामचरित्र ' ह्यांसारख्या ग्रंथांकडे बोट दाखवीन. पण अलीकडे पाहावे तो लोकांना, विशेषतः विद्वानांना, सोपा विषय कठीण करून सांगण्याची सवय लागलेली दिसते.

याच्या उलट पाश्चात्त्यांकडे पाहावे तो त्यांचे शास्त्रज्ञ आपले शोध शक्य तेवढ्या सोपेपणाने अन् मनोरंजकतेने सांगताना दिसतात. साहजिकच त्यांच्याकडे संशोधक हा आदराचा, कुतूहलाचा विषय आहे, तर आपल्याकडे तो क्वचित थट्टेचाही विषय होऊन बसतो. राजवाडे किंवा डॉ. केतकर यांच्यासारख्या श्रेष्ठ संशोधकांचा उपहास तेव्हाच्या समाजाने ' तेलातुपाची कागदपत्रे चिवडणारे ' आणि ' ज्ञानकोशाची रद्दी डोक्यावर घेऊन गावभर विकणारे ' या शब्दांत केल्याचे आपल्याला ठाऊकच आहे. तेव्हा विद्वानांनीसुद्धा आपण आपला उद्योग कोणासाठी करतो हे सतत ध्यानात वागवून आपले लिखाण शक्य तेवढे सरळ, सोपे आणि सुलभ करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. जगाकडे पाठ फिरवून एकांडेपणाने शिलेदारी करण्याचे ते राजवाडे-युग आता गेले याची जाणीव आमच्या संशोधकपंडितांना जितक्या लवकर होईल तितके त्यांच्या परिश्रमांचे फळ त्यांच्या पदरात अधिक पडेल. ××

## ' उपेक्षित ' मराठी

संशोधनाविषयी आणखी एक विचार मांडावा असे माझ्या मनात आहे. तो म्हणजे उपेक्षित मराठीच्या अभ्यासाचा. हे 'उपेक्षित मराठी' चे प्रकरण काय आहे असे आपण विचाराल. त्याला माझे उत्तर असे, की ज्या मराठीची अभ्यासकांकडून सतत उपेक्षाच होत आहे ती ' उपेक्षित मराठी ' होय. अधिक स्पष्ट शब्दांत सांगायचे म्हणजे महानुभाव ग्रंथकारांची मराठी, दासोपंतांची मराठी, परधर्मीयांची मराठी किंवा खेडुतांची मराठी, यांना मी उपेक्षित मराठी हे नाव देतो. याचे कारण असे, की या वाङ्मयाची जरी आपण थोडीफार दखल घेतलेली असली तरी ते ज्या भाषेत लिहिले किंवा रचले गेले; तिच्या अभ्यासाविषयी आपण अजूनपर्यंत उदासीनच आहो. अजूनही यादवकाळ म्हटला की आपल्या डोळ्यांपुढे एक ज्ञानेश्वरीच तेवढी उभी राहते आणि मग ज्ञानेश्वरांची शब्दसृष्टी किंवा अलंकारसृष्टी, किंवा त्यांनी केलेला रसपरिपोष यांसारख्या त्याच त्याच विषयांवर तेच तेच लेखक पुनः पुन्हा लिहून आपली लेखणी शिणवतात. त्यांच्या डोळ्यांपुढे 'लीळाचरित्रा' सारखा सर्वांगसुंदर ग्रंथ येतच नाही. ज्ञानेश्वरीच्या सर्वश्रेष्ठत्वाबद्दल वाद कोण घालील ? पण ज्ञानेश्वरीत जे नाही ते ' लीळाचरित्रा ' त किंवा ' स्मृतिस्थळा ' त आहे असे मात्र मी निःशंकपणाने म्हणेन. महानुभाव पंथाच्या या दोन गद्यग्रंथांत तत्कालीन समाजाचे जे सर्वांगीण दर्शन घडते त्याची पुसट छटासुद्धा कुठे ज्ञानेश्वरीत किंवा अमृतानुभवात दिसून येत नाही. मला तर असे वाटते, की ' लीळाचरित्र' हे केवळ चक्रधरस्वामींचेच नव्हे तर त्यांच्या वेळच्या महाराष्ट्राचेही चरित्रचित्र आहे. इतके त्या समाजाचे जीवन त्यात स्पष्टपणाने उमटलेले आहे. जी गोष्ट सामाजिक जीवनाची तीच भाषेची. ज्ञानेश्वरी ही वागीश्वरी खरी; पण किती झाले तरी शेवटी ते काव्यच. आणि काव्य म्हटले की थोडीफार कृत्रिमता आलीच. ज्ञानेश्वरांसारखा शब्दप्रभूही त्याच्या यमकादी बंधनांतून सुटू शकत नाही. पण तेच ' लीळाचरित्रा ' कडे पाहा, म्हणजे म्हाइंभटांनी आपल्या वेळची मराठी बोली किती यथातथ्यापणे टिपली आहे ते कळून येईल.

भाषा, भाषाशैली, व्यक्तिदर्शन, समाजदर्शन इत्यादी अनेक गुणांनी युक्त अशा या महानुभावांच्या स्मृतिग्रंथांची दखल आपण आजवर किती घेतली ? फारच थोडी, जवळ-जवळ नाहीच ! अजूनही मला मराठीचा एखादा प्राध्यापक असा भेटतो, की ज्याच्या मनात 'एकांक' म्हणजे 'लीळाचरित्रा' च्या एक क्रमांकाचा भाग हे समीकरण पक्के बसून गेले आहे आणि त्यात चक्रधरांच्या चरित्रातील एकाकी अवस्था चित्रित केलेली आहे ही कल्पना त्याच्या गावीही नाही ! म्हणूनच 'उगवलं, पण सूर्य कुठे आहे ?' या प्रश्नाच्या धर्तीवर महानुभावांचे वाङ्मय उजेडात आले, पण त्याचे अभ्यासक कुठे आहेत, हा प्रश्न मला विचारावासा वाटतो ! या पंथातले सध्याचे कितीतरी महंत आपल्याला अभ्यासात मदत करायला तयार आहेत. पण आपलीच तशी इच्छा नाही त्याला ते तरी काय करणार ? आपल्या पुण्याजवळ, त्याला लागून सांगवीला महानुभावांचा एक मठ आहे हे आपल्यापैकी कितीजणांना ठाऊक आहे ? 'जे महानुभावांचे तेच दासोपंतांचे.' त्यांच्या त्या प्रचंड 'गीतार्णवा' विषयी आपण पुष्कळदा बोलतो, पण प्रत्यक्षात करीत मात्र काहीच नाही. आता तर त्याला पायही फुटू लागले असतील आणि मागेपुढे कदाचित तो नामशेषही होऊन जाण्याची भीती आहे. क्रिस्ती आणि इस्लामी धर्मीयांनीही मराठीची सेवा काही थोडीथोडकी केली नाही. एक प्रियोळकरांनी उजेडात आणलेले ख्रिस्ती मिशनऱ्यांचे वाङ्मयच कितीतरी भरेल. आमचे त्याचे ज्ञान मात्र अद्यापिही 'जैसी हरळांमाजि रत्नकिळा' इत्यादी मराठी भाषेची थोरवी गाणाऱ्या दोन ओव्यांच्या पलीकडे जाऊ शकत नाही. असे का व्हावे ? या प्रश्नाचे उत्तर एकच, आमचे औदासीन्य !

## बाह्यांगाबरोबरच अंतरंगाचीही काळजी घ्या

मित्रहो, आणखी एक विचार सांगून मी आपले भाषण संपवणार आहे. हा विचार लेखक आणि त्यांचे प्रकाशक या दोघांनाही अनुलक्षून आहे.

विवेचनात्मक ग्रंथांना एकच नव्हे, तर अनेक प्रकारच्या सूची अवश्य पाहिजेत याविषयी अभ्यासक्रमात एकमत होईल असे वाटते. सूची ( Index ) वाचून ग्रंथ आंधळा आहे या गोष्टीची जाणीव आमच्या कित्येक ग्रंथकारांना अजूनही झालेली नाही. सूचीकरण हेसुद्धा एक शास्त्र असल्याने ग्रंथांना केवळ 'सूची' पाहिजे इतकेच नव्हे तर ती शास्त्रशुद्ध पद्धतीने तयार केलेली पाहिजे. मुख्य म्हणजे, 'सूची' ही ग्रंथाची केवळ शोभा नाही, तर त्याचे एक अंगच आहे, या गोष्टीची जाणीव झाली पाहिजे. कोणताही ग्रंथ झाला तरी तो अनेक प्रकारच्या वाचकांसाठी असतो त्याच्या वाचकांत जसे काही तज्ज्ञ असतात, तसेच काही अज्ञही असतात. या सर्वांची सोय ग्रंथकाराने पाहिली पाहिजे. वाचकांची सोय पाहणे म्हणजे ग्रंथाला शक्य तिथे संदर्भ, आकृती, नकाशे, तक्ते, चित्रे आणि सूची यांची जोड करून देणे. पण आपल्याकडे या बाबतीत फारच कसूर होते असे दिसते. मी असे कितीतरी चांगले ग्रंथ काढून देईन, की, त्यांत ना संदर्भ ना सूची, ना चित्रे ना तक्ते ! त्यांचे बाह्यांग मात्र पाहून घ्यावे !

इतर भारतीय भाषांतील प्रकाशनांच्या मानाने मराठीची प्रकाशने सरस आणि सुबक, असतात यात शंकाच नाही. अपेक्षा इतकीच, की प्रकाशकांनी आपल्या ग्रंथांच्या बाह्यांगाबरोबर त्यांच्या अंतरंगाकडेही लक्ष पुरवावे.

◆◆◆

# परिषद वार्ता

( दि. २१-१२-१९६७ पर्यंत )

**साहित्यचर्चा मंडळ** : मंडळाच्या वतीने तीन मासिक बैठकी झाल्या. वक्ते व त्यांच्या टिपणांचे विषय पुढीलप्रमाणे होते : १९ ऑक्टोबर, श्री. मो. रा. वाळंबे : ' महामंडळाचे शुद्धलेखन : अडचणी, उणिवा व अपेक्षा ' २३ नोव्हेंबर, डॉ. मु. ग. पानसे : ' भाषा आणि साहित्य ' २१ डिसेंबर, श्री. वि. शं. पारगावकर : 'श्री. ना. पेंडसे यांची कादंबरी.'

**कै. माधव जूलियन स्मृतिदिन** : बुधवार दि. २९ नोव्हेंबरला सायंकाळी प्रतिवर्षीप्रमाणे कवी कै. माधव जूलियन यांचा स्मृतिदिन साजरा झाला. या प्रसंगी सोलापूरचे कवी आणि टीकाकार प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांचे साहित्यातील ' सत्याचा शोध ' या विषयावर व्याख्यान झाले.

**भाषासल्लागार मंडळाची भेट** : महाराष्ट्र राज्य-सरकारच्या भाषासल्लागार मंडळाची बैठक पुणे येथे १९ नोव्हेंबरला भरली होती. मंडळाची भूमिका आणि कार्य यांचा परिचय व्हावा यासाठी परिषदेने मंडळाच्या सदस्यांना या दिवशी सायंकाळी परिषदेला भेट देण्याची विनंती केली होती. या विनंतीला मान देऊन मंडळाच्या सदस्यांनी सायंकाळी परिषदेला भेट दिली. मंडळाच्या वतीने डॉ. वा. ना. पंडित यांनी भूमिका विशद केली. त्यानंतर परिभाषेसंबंधीच्या व्यावहारिक व तात्त्विक प्रश्नांची उपस्थितांबरोबर चर्चा झाली. चर्चेत प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. गं. बा. सरदार, श्री. मो. ज्ञा. शहाणे, श्री. स. मा. गर्गे, आचार्य वि. प्र. लिमये, डॉ. अशोक केळकर, श्री. श्रीपाद जोशी, श्री. मो. रा. वाळंबे इत्यादींनी भाग घेतला. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी प्रारंभी मंडळाचे स्वागत केले. डॉ. मु. ग. पानसे यांनी शेवटी आभार मानले.

**भाषाविषयक व्याख्यानमाला** : शिक्षणाचा वाढता प्रसार, मराठी माध्यमाचा स्वीकार, मराठीला प्राप्त झालेला राजभाषेचा दर्जा, तिचा वापर करताना शासनाला येणाऱ्या अडचणी इत्यादी गोष्टी लक्षात घेऊन, सामान्य-जनांना भाषाव्यवहाराचा स्थूलमानाने परिचय व्हावा यासाठी परिषदेने यंदा एक भाषाविषयक व्याख्यानमाला योजनापूर्वक घडवून आणली. या मालेत नोव्हेंबर–डिसेंबर मध्ये एकूण सात व्याख्याने झाली. १४ नोव्हेंबरला डॉ. मु. म. कत्रे यांनी मालेचे औपचारिक उद्घाटन केले. मालेतील व्याख्याने व विषय येणेप्रमाणे होते.

१४ नोव्हेंबर : डॉ. ना. गो. कालेलकर : ' भाषा : नव्या जबाबदाऱ्या. '

१५ नोव्हेंबर : प्राचार्य भा. शं. भणगे : ' सामाजिक शास्त्रे आणि भाषा. '

३० नोव्हेंबर : डॉ. प्रभाकर मांडे : ' साहित्यातील ग्रामीण बोली. '

२ डिसेंबर : श्री. ल. ना. गोखले : ' वृत्तपत्रांची भाषा. '

४ डिसेंबर : प्रा. ग. प्र. प्रधान : ' शासनव्यवहार आणि मराठी भाषा. '

९ डिसेंबर : प्रा. दि. के. बेडेकर : ' भाषेतील निषिद्धता. '

२२ डिसेंबर : प्रा. अ. गं. मंगरूळकर : ' मराठी कवितेची भाषा. '

## विभागीय संमेलन

परिषदेचे पहिले विभागीय मराठी साहित्य संमेलन पुणे येथे दि. २८ व २९ ऑक्टोबरला देवी रमाबाई सभा-गृहात डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या अध्यक्षतेने भरले होते. या संमेलनाचा वृत्तान्त येणेप्रमाणे—

### पूर्वेतिहास—

२७ जून १९६५ रोजी म. सा. परिषदेची जी वार्षिक साधारण सभा भरली होती, त्या सभेने परिषदेच्या कार्यकारी मंडळाला विभागीय संमेलन भरविण्याबाबत आदेश दिला.

अनेक अडचणींमुळे सदर संमेलन १९६५ सालात होऊ शकले नाही. १९६६ जुलैच्या म. सा. पत्रिकेच्या अंकात सर्व सभासदांना उद्देशून जाहीर विज्ञापना करण्यात आली आणि संमेलनासंबंधी माहिती देण्यात आली.

अनुक्रमणिका

१९६६ ऑगस्टमध्ये स्वागत मंडळाचे सभासद होण्याविषयी विनंतीपत्रक प्रसिद्ध करण्यात आले, संमेलनाच्या अध्यक्षांची निवडणूक २८ ऑक्टोबर १९६६ रोजी झाली, आणि डॉ. शं. गो. तुळपुळे अध्यक्ष निवडून आले.

१९६७ च्या एप्रिलमध्ये संमेलन भरवावे असे १९६६ च्या ऑक्टोबरमध्ये संमेलनाच्या कार्यकारी मंडळाने ठरविले.

परंतु भोपाळच्या संमेलनाच्या तारखा आणि विभागीय संमेलनाच्या तारखा यांच्यामध्ये फारच थोडे अंतर असल्यामुळे संमेलन १९६७ च्या ऑक्टोबरमध्ये भरविणे सोईचे होईल असे डॉ. तुळपुळे यांचे पत्र ९-३-६७ रोजी आल्यामुळे संमेलन ऑक्टोबर १९६७ पर्यंत लांबणीवर टाकण्यात आले.

दरम्यान सदर विभागीय संमेलन घटनाबाह्य असल्याने ते भरविण्यास परिषदेला मनाई करावी अशी फिर्याद श्री. अंबिके यांनी मे. दामलेसाहेब यांच्या कोर्टात दाखल केली. सदर फिर्यादीची सुनावणी झाल्यानंतर श्री. अंबिके यांनी २५-८-६७ रोजी फिर्याद दुरुस्तीचा अर्ज केला. दुरुस्त फिर्याद मे. दाऊद साहेब यांच्या कोर्टात दाखल झाली. २४ ऑक्टोबर १९६७ रोजी मे. दाऊदसाहेब यांनी निकाल देऊन फिर्याद खर्चासुद्धा काढून टाकली.

अगोदर ठरल्याप्रमाणे २८ व २९ ऑक्टोबर रोजी संमेलन सर परशुरामभाऊ कॉलेजच्या देवी रमाबाई हॉलमध्ये साजरे झाले. नियोजित स्वागताध्यक्ष पुण्याचे महापौर श्री. नानासाहेब गोरे यांना आदल्या दिवशी अतिशय महत्त्वाच्या कामासाठी मुंबईस जाणे भाग पडल्यामुळे म. म. डॉ. दत्तो वामन पोतदार यांनी स्वागताध्यक्षांची जबाबदारी पत्करली, आणि संमेलनाचे कार्य यथासांग पार पाडण्यास बहुमोल साहाय्य केले.

२८ ऑक्टोबर रोजी अध्यक्ष डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे भाषण झाल्यानंतर संध्याकाळी ७-३० पासून पुढे विषयनियामक समितीची बैठक झाली, आणि ठरावांच्या मसुद्याची चर्चा झाली.

२९ ऑक्टोबर रोजी सकाळी ८॥ ते १२ पर्यंत "मराठीची लिपी, लेखन पद्धती आणि साहित्याची भाषा" या विषयावर परिसंवाद झाला. या परिसंवादात श्री. शं. रा. दाते, डॉ. वा. गो. परांजपे, प्रा. य. र. आगाशे, प्रा. अ. गं. मंगरूळकर प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर, श्री. देवीसिंग चौहान, डॉ. द. ह. अग्निहोत्री, श्री. म. ना. गोगटे आणि प्रा. श्री. के. क्षीरसागर या श्रेष्ठ विद्वानांनी भाग घेतला.

याच दिवशी दुपारी ३ ते ६ पर्यंत " ललित लेखकावरील सामाजिक जबाबदारी " या विषयावर परिसंवाद झाला. या परिसंवादात प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. वसंत दावतर, श्री. ग. ल. ठोकळ, प्रा. स. शि. भावे, श्री. दिलीप चित्रे आणि सौ. सुशीलाबाई आठवले यांनी भाग घेतला.

संध्याकाळच्या परिसंवादानंतर सर्व उपस्थित श्रोत्यांना अल्पोपाहार देण्यात आला.

यानंतर दोन ठरावांवर खुल्या अधिवेशनात चर्चा झाली. एक ठराव लेखनासंबंधी महामंडळाला काही सूचना करण्यासंबंधी होता, आणि दुसरा माध्यमासंबंधी होता. दोन्ही ठराव बहुमताने संमत झाले. ( शेवटी ठराव पाहावेत. )

रात्री ९-३० पासून कवि-संमेलनाचा कार्यक्रम सुरू झाला. या कार्यक्रमाच्या वेळी श्री. सोपानदेव चौधरी आणि श्री. गोपीनाथ तळवलकर यांचा सत्कार करण्यात आला. कविसंमेलनाच्या कार्यक्रमाचे नियंत्रण श्री. ग. ल. ठोकळ यांनी केले. कविसंमेलनात श्री. ग. ल. ठोकळ, सोपानदेव चौधरी, गोपीनाथ तळवलकर, श्रीपाद जोशी, सुधाकर भोसले, नारायण सुर्वे, वसंत नलावडे, गं. ना. जोगळेकर, सौ. संजीवनी मराठे, सौ. पद्मा गोळे, सौ. सरिता पदकी, डॉ. सरोजिनी बाबर, प्रा. व. के दीक्षित, वसंत शा. वैद्य, लोककवी मनमोहन आणि दिलीप चित्रे यांनी भाग घेतला.

रात्री १२-३० वा. सदर कार्यक्रम संपला. सर्व कवींना श्रीफल आणि गुच्छ देण्यात आले. अशा प्रकारे पहिल्या विभागीय संमेलनाचा सोहळा मोठ्या उत्साहाने आणि ठरलेल्या बेताप्रमाणे पार पडला.

प्रस्तुत संमेलन अनेक अडचणींतून पण अखेर यशस्वी रीतीने पार पडले. संमेलनाच्या यशात स्वागतमंडळाचे सदस्य, देणगीदार, संमेलनाचे कार्यकारी मंडळ, वृत्तपत्र प्रतिनिधी, स. प. कॉलेजचा अधिकारी वर्ग, मंडप कॉन्ट्रॅक्टर श्री. दाते, सजावटकार श्रीमती अवाबेन देशपांडे, दूरध्वनी व्यवस्थापक श्री. गुप्ते इत्यादींनी आपुलकीने साहाय्य केले. संमेलनकार्याच्या आरंभी श्री. वि. त्र्यं. शेटे ( माजी चिटणीस ) यांनी जे कार्य केले त्याची आवर्जून नोंद केली पाहिजे. न्यायालयीन प्रकरणी श्री. के. एन. फडके यांनी केलेल्या कामगिरीचाही उल्लेख करणे जरूर आहे. या सर्वांचे, तसेच ज्यांनी ज्यांनी संमेलनाशी सहकार्य केले त्या सर्वांचे परिषद मनःपूर्वक आभार मानीत आहे. ◆ ◆ ◆

R. N. 6398 / 57




प्रकाशक व मालक म. सा. परिषदेतर्फे : **श्री. मो. रा. वाळंबे**, चिटणीस, म. सा. परिषद, टिळक-रस्ता, पुणे २.
मुद्रक : **द. वा. आंबेकर**, आर्यभूषण मुद्रणालय, ९१५।१ शिवाजीनगर, गोखले मार्ग, पुणे ४.


अनुक्रमणिका